# स्त्रियांची परवशता.

जॉन् स्टुअर्ट मिल् कृत

'सब्जेक्शन् ऑफ् वुइमेन्'

या इंग्लिश ग्रंथाचें भाषान्तर

**गोविंद वासुदेव कानिटकर**

बी. ए. एल्. एल्. बी. सबजज्ज;

...रिस्सेन,' 'मोक्षमूलरकृत धर्मविषयक व्याख्यानें,' 'अकबर बाद...

'नारायणराव पेशवे यांचा वध,' 'कृष्णाकुमारी,' 'संमोहलहरी

वगैरे गद्यात्मक व पद्यात्मक ग्रंथांचे कर्ते

यांनीं केले

ते

**बाबाजी सखाराम आणि कंपनी,**

यांनीं

**मुंबईत**

"तत्त्वविवेचक" छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केलें.

---

सन १९०२.

---

किंमत १॥ रुपया.

# अर्पणपत्रिका.

अपत्ये यत्तादृग्दुरितमभवत्तेन महता
विषक्तस्तीव्रेण व्रणित हृदयेन व्यथयता ।
पटुर्धारावाही नव इव चिरेणापि हि न मे
निकृन्तन् मर्माणि क्रकच इव मन्युर्विरमति ॥

पूरोत्पीडे तडागस्य परीवाहः प्रतिक्रिया ।
शोकक्षोभे च हृदयं प्रलापैरेवधार्यते ॥

उत्तररामचरितम.

जिच्या आत्यंतिक, अकालीन, दुर्वह दुःखापासून माझ्या मनास त्र्या वैराग्याचा थोडासा बोध किंवा स्पर्श झाला असें वाटून माझें लक्ष अध्यात्मविषयाकडे पूर्वींपेक्षां कांहींसें अधिक लागलें;

जिची दिव्य, सौम्य, पवित्र, मंगलमय मूर्ति व जिचे अनेक रमणीय सद्गुण वारंवार स्मृतिपथावर उभे राहून, माझें हृदय दारुणदुःखसंवेगानें पीडित करितात;

जी बालपणापासून वाग्देवीची धात्री, काव्यप्रतिभेची प्रेरयित्री, उदात्त कल्पनांची जनयित्री, रसात्मकतेची पोषयित्री, व करुण रसाची प्रत्यक्ष मूर्ति अशी मला वाटत होती;

जिच्या योगानें मला हा नितांत दुःखमय व कष्टमय जीवलोक प्रसंगविशेषीं क्षणमात्र सुखमय व आनंदमय असा भासत असे;

जी आपल्या सदैवमधुरभाषणानें, व परमशुद्ध आचरणानें स्वकीयांप्रमाणेंच परकीयांसही अत्यन्त प्रिय झाली होती;

जी आपल्या पित्याच्या व श्वशुराच्या—उभय कुलांतील मनुष्यांस पूर्वसुकृतफलाप्रमाणें व गृहलक्ष्मीप्रमाणें आनंददात्री असे;

जिची निधनवार्ता ऐकून एका भगवद्भक्त महाशयानें 'ती पूर्वींची कोणी योगभ्रष्ट असून दैववशात् इहलोकीं अल्प-काल वास करण्याच्या उद्देशानें अवतरली होती; ती आपली लावण्यमयी छाया, सर्वंकषा कुशाग्रबुद्धि व भक्तिश्रद्धामय प्रेमल अंतःकरण त्या चिद्रूप अमिताभ कोटिसूर्यसमप्रभ पुराण-पुरुषाच्या चरणकमलीं अर्पण करून भृंगायमान झाली व निर्वाणपद पावली' अशा आशयाचा उद्गार काढून मला आश्वासन दिलें व माझें समाधान केलें;

त्या माझ्या परम प्रिय ज्येष्ठ कन्येस—

## कै. सौभाग्यवती कृष्णाबाईस—

एका विख्यात आँग्लभौम महाशय स्त्रीजनवत्सल ग्रंथ-काराच्या सुंदर ग्रंथाचें यथाशक्ति मराठींत उतरलेलें हें प्रतिबिंब, माझ्या दुःखित अंतःकरणास अत्यल्प समाधान समजून व तिच्या अनेक स्मारकां पैकीं एक अल्पसें स्मारक ह्मणून, मी सप्रेम अर्पण केलें आहे.

*

# विषयोपन्यास.

क्व तावानानंदो निरतिशयविश्रंभबहुल: ?
क्व तेऽन्योन्यं यत्ना: क्व च नु गहना: कौतुकरसा: ?
सुखे वा दु:खे वा क्व नु खलु तदैक्यं हृदययो: ?

* * * * *

उत्तररामचरितम्.

उतघा नेमो अस्तुत पुमाँ इति ब्रुवे पणि:

ऋग्वेद मं ५ सू, ६१.

जायापत्योर्मिलित्वैककार्यकर्तृत्वादेक एव पदार्थ: अर्धशरीर भार्येत्यादि स्मृते:

ऋक्संहिताभाष्ये सायणाचार्यं

"We are told that at the very beginning of creative work, when humanity was to be produced, the creator divided himself into two halves. One half male, and the other famale. This division of the Divine into two, marks, as it were, the basis of our theory. Both sexes are equally divine, each is one half of God, both sexes have their parts to play in human evolution, and in the evolution of the world as a whole." *Annie Besant on Womanhood* in "*Ancient Ideals*".

'There are thousands now
Such women, but convention beats them down:
It is but bringing up; no more than that:
You men have done it: how I hate you all!
Ah, were I something great! I wish I were
Some mighty poetess, I would shame you then,
That love to keep us children!'

*From the Prologue to Tennyson's Princess.*

'Dear, but let us type them now
In our lives, and this proud watchword rest
Of equal; seeing either sex alone
Is half itself, and in true Marriage lies
Nor equal, nor unequal: each fulfils
Defect in each, and always thought in thought,
Purpose in purpose, will in will, they grow,
The single pure and perfect animal,
The two-cell'd heart beating, with one full stroke,
Life.'

* *

'O we will walk this world,
Yoked in all exercise of noble end,
And so thro' those dark gates across the wild
That no man knows.'

*From Tennyson's Princess*

# स्त्रियांची परवशता.

## प्रस्तावना.

प्रस्तुतचा ग्रंथ इंग्लंडांत जॉन् स्टुअर्ट मिल् या नांवाचा जो एक प्रसिद्ध तत्ववेत्ता व ग्रंथकार कांहीं वर्षांपूर्वीं होऊन गेला त्याच्या Subjection of Women नांवाच्या ग्रंथाचें भाषान्तर होय. या ग्रंथाच्या योग्यतेसंबंधानें एक दोन नामांकित विद्वानांचे अभिप्राय व इतर कांहीं उपयुक्त उतारे ग्रंथाचे शेवटीं पूरणिकेंत दिले आहेत. ते वाचनीय आहेत.

मिल् साहेबांची पत्नी (मिसेस् टेलर्) या बाई फार विद्वान् होत्या, ही गोष्ट बरीच प्रसिद्ध आहे. मिल् साहेबांनीं आपलें चरित्र लिहिलें आहे. त्यावरून ( पृष्ठें २४४,२६५ व २६६ पहा ) त्या बाईंची योग्यता केवढी मोठी होती हें कळून येतें.

डा० बेन या नांवाचे एक प्रसिद्ध ग्रंथकार व मि. मिल् यांचे परममित्र हे आपल्या "J. S Mill. A Criticism" या नांवाच्या ग्रंथांत ह्मणतातः—"असें सांगतात कीं, Subjection of Women ( स्त्रियांची परवशता ) हा ग्रंथ मि० मिल् व त्यांची पत्नी या उभयतांमध्यें स्त्रियांच्या स्थितिविषयीं बरीच जो ऊहापोह होत होता त्याचें फल होय. या ग्रंथरचनेच्या मांत त्यांची मुलगी ( मिस् हेलन् टेलर ) ही मदत करीत ते. या ग्रंथाचा विषय त्यांच्या पत्नीच्या विशेष आवडीचा

होता, यांत संशय नाहीं. त्या बाईनीं जर एकाद्या विषयाच्या संबंधानें, प्रथम **मि० मिल्** यांच्या विचारावर व त्यांच्या द्वारें सर्व जगाच्या विचारावर आपल्या मताचा कांहीं विशेष परिणाम घडवून आणिला असेल तर तो खचित याच विषयाच्या संबंधानें होय. स्त्रीपुरुषांची समता, याविषयाबद्दल **मि० मिल्** यांची जीं मूळचीं मतें होतीं, तीं **मिसेस् टेलर** या बाईचा व त्यांचा जो अपूर्व योग घडून आला तो आला नसता तर कदाचित् तशींच कायम राहतीं. परंतु त्या मतांचे मोठ्या उत्साहपूर्वक समर्थन करण्यांत आपल्या आयुष्याचा त्यांनीं जितका व्यय केला तितका केला नसता."

'न स्त्रीस्वातंत्र्यमर्हति' 'न स्वातंत्र्यंक्वचित् स्त्रियाः' हा सिद्धांत, किंवा हें शास्त्र आमचे देशात सर्वविश्रुत आहे. **मि० मिल्** यांनीं या मताचा उत्तर पक्ष धरून सन १८६१ सालीं आपल्या पत्नीच्या सहानुभूतीनें एक लहानसा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला व त्याचें नांव त्यानीं Subjection of Women (स्त्रियांची परवशता अथवा स्त्रीदास्य) असें ठेविलें. तो प्रथम त्यांनींच सन १८६९ सालीं प्रसिद्ध केला. पुढें सुमारें ४ वर्षांनीं त्यांचें देहावसान झालें.

मूळ ग्रंथाची भाषा मार्मिक, रसाळ व अर्थप्रचुर आहे. जो पक्ष त्यांनीं स्वीकारला त्याचें समर्थन त्यांनीं फार उत्तम प्रकारें केलें आहे. यांत 'अधिकाराचा दुरुपयोग' या विषयावर इतिहासांतील व व्यवहारांतील उदाहरणें देऊन बरीच चर्चा केली आहे. याशिवाय जे मुख्य मुख्य सिद्धांत स्थापित केले आहेत ते

असे:—व्यवहारिक, राजकीय, सामाजिक, व गृहकार्यविषयक अशा सर्व संबंधांत स्त्रिया व पुरुष यांची समता मानिली पाहिजे. ह्मणजे, उभयांस हक्क सारखे ठेवून हल्लींचा त्यांचा सेव्यसेवक संबंध मोडून नवा समानाधिकारयुक्त असा संबंध स्थापिला पाहिजे. अत्यन्त उपयुक्ततेच्या दृष्टीनें हें समतेचें तत्व मान्य करणें आवश्यक आहे. पुराव्याचा बोजा नास्तिकपक्षावर, ह्मणजे अशी समता मान्य करणें योग्य नाहीं असें प्रतिपादन करणाऱ्यांवरच, नेहमीं राहिला पाहिजे. समाजांतील सर्व व्यक्ति न्यायदृष्टीला सारख्या मानिल्या पाहिजेत. त्यांत वैषम्य मानणें योग्य होणार नाहीं. इतिहासावरून असें दिसतें कीं, ज्या मानानें 'बळी तो कान पिळी' हा पूर्वींचा न्याय किंवा स्वामिसेवकभाव कमी होत गेला, व समतेचें तत्व अधिक अमलांत येत गेलें त्या मानानें मनुष्यांची व राष्ट्राची उन्नत्ति अधिकाधिक होत गेली. ह्मणजे, निव्वळ जुलुमाचा प्रकार जसजसा नष्ट होत गेला, तसतसा मनुष्यस्वभावांत सत्वगुणाचा अंश अधिकाधिक व्यक्त होत गेला.

'बळी तो कान पिळी' या तत्वाचा परित्याग **इंग्लंड** देशांत इतर सर्व बाबतींत किंवा संबंधांत ज्या अर्थीं करण्यांत आला आहे त्या अर्थीं तें तत्व स्त्रीपुरुषांच्यासंबंधापुरतें तेवढेंच कायम ठेवणें योग्य होणार नाहीं.*

या सिद्धांतांचें किंवा मतांचें खंडन बऱ्याच पंडितांनीं व टीकाकारांनीं केलें आहे, हें येथें सांगणें अवश्य आहे. विशेषतः

---

* See J. S. Mill, by W. P. Courtney (Great Writers) p. 162

**सर फिटझ् जेम्स स्टीफन्** या नांवाच्या पंडितांनीं Liberty, Equality, Fraternity ( स्वातंत्र्य, समता, बंधुत्व ) या नांवाच्या ग्रंथांत **मि॰ मिल्** यांच्या “स्वातंत्र्य” नांवाच्या ग्रंथावर व प्रस्तुत ग्रंथावर एक टीकात्मक ग्रंथ लिहिला. त्यांत **मिल**साहेबांच्या या दोन्ही ग्रंथांतील मुख्य सिद्धांतांचें खंडन जोरदार भाषेनें करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्तुतस्थळीं माझे विद्वान् मित्र **रा॰ रा॰ नारायण लक्ष्मण फडके बी. ए.** यांनीं **मिल**साहेबांच्या '**लिबर्टी**' (स्वातंत्र्य) नामक ग्रंथाचें केलेलें भाषान्तर १८९२ सालीं प्रसिद्ध झालें, त्याचा उल्लेख केल्याशिवाय माझ्या-च्यानें राहावत नाहीं. **रा॰ फडके** यांचा इंग्लिश ग्रंथांचीं भाषान्तरें करण्याचा व्यासंग अखंडित असून त्यांनीं **मिल्**, व **स्पेन्सर** ह्या दोन अत्यन्त प्रसिद्ध अशा पाश्चात्यग्रंथकाराचे महत्वाचे लेख प्रति-बिंबरूपानें स्वभाषेंत आणून महाराष्ट्र वाङ्मयांत भर पाडून जन्मभाषेचें व जन्मभूमीचें बरेंच ऋण फेडिलें, असें ह्मणणें अतिशयोक्तीचें होईल असें मला वाटत नाहीं. महाराष्ट्र भाषेचा उर्जित काल पुढें येवो वा न येवो. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' ही भगवदुक्ति ध्यानांत ठेऊन विद्वान् लोकांनीं जन्मभाषेच्या संबंधाचें आपलें पवित्र कर्तव्यकर्म उत्साहपूर्वक करणें हीच मुख्य गोष्ट आहे. करितां **रा॰ फडके** यांच्या स्तुत्य उद्योगाचें मनःपूर्वक, प्रेमपूर्वक व विनयपूर्वक मी प्रस्तुतस्थळीं अभिनंदन करितों. हा अभिनंदन करण्याचा योग किंवा संधि मला केव्हां तरी साधावयाचा होता. तो आजपर्यंत साधला नाहीं. ह्मणून प्रस्तुत

प्रसंगीं तो साधून घेतला. त्याबद्दल **रा० फडके** हे मला क्षमा करितील अशी आशा आहे. ‘कधींच न करण्यापेक्षां उशिरा केलेलें बरें’ अशा आशयाची इंग्रेजी भाषेंत एक ह्मण आहे. ‘स्वातंत्र्य’ ह्या ग्रंथांत **रा० फडके** यांनीं **मिल्**साहेबांचे बारीक टाइपाचें ३६ पृष्ठांचें ‘संक्षिप्त’ चरित्र, साहेब मजकूर यांनीं स्वतां लिहिलेल्या ‘आत्मचरित्र’ Autobiography नामक ग्रंथाच्या आधारें लिहिलें आहे. तेंही चागलें आहे. तें या ग्रंथाच्या वाचकांनीं मुद्दाम वाचावें. त्यांत विशेषेंकरून **मिसेस् टेलर** बाई वीस वर्षांच्या स्नेहानंतर **मिल्** साहेबांची धर्मपत्नी कशी झाली; विलक्षण बुद्धि, परिपक्क विचार, मानवी स्वभावाचें तिचें पूर्णज्ञान; व्यावहारिक गोष्टींत तिचें शहाणपण, तिची न्यायप्रीति, वगैरे त्या बाईचे अंगीं असलेल्या अनेक गुणांमुळें **मिल्**साहेबांचे ग्रंथ किंवा लेख यांत त्या पतिपत्नींच्या दोन विचारौघांचा कसा संगम होऊन राहिला, वगैरे वृत्तान्त फार बोधप्रद व मनोरंजक आहे. ‘स्त्रियांची परवशता’ या ग्रंथाची रचना १८६१ सालीं झाली ह्मणून वर सांगितलेंच आहे. पुढें तो ग्रंथ तसाच ठेवून वेळोवेळीं सुधारून अतिशय उपयोग होईल अशावेळीं तो प्रसिद्ध करावा असा **मिल्** साहेबाचा प्रथम हेतु होता. तथापि वर सांगितल्याप्रमाणें सुमारें आठ वर्षांनंतर, ह्मणजे १८६९ सालातच तो त्यांनीं छापून प्रसिद्ध केला. या ग्रंथांत जें जें कांहीं फार खोल व चित्तवेधक आहे तें तें ह्याच्या बायकोचेंच आहे. **मिल्** साहेब आपल्या चरित्रांत ह्मणतातः—

“जेव्हां दोन माणसांचे विचार व कल्पनातरंग सर्वांशीं एक

होतात; जेव्हां बौद्धिक किंवा नैतिक, अशा संबंधाचे विषय घेऊन त्यांचा दररोज होईल तितका खल तीं करीत असतात; जेव्हां एकाच तत्वाचा आधार घेऊन त्याजवर विचार करून एकच प्रकारचे सिद्धांत तीं ठरवितात; तेव्हां विशेष कल्पना प्रथम दोघां-पैकीं कोणाच्या डोक्यांतून निघाली ह्या प्रश्नाचा निकाल, ती कोणाच्या लेखणींतून खालीं आली, ह्यावरून फारसा करिता येत नाहीं. अशा वेळीं असा संभव असतो कीं, त्या कल्पनाना लेखनरूपी शृंखलेनें बद्ध करण्यांत त्या दोघांपैकीं ज्या माणसाचें साहाय्य अगदीं कमी असेल, त्याचें कल्पना [illegible] कामीं अतिशय असेल. अशा स्थितींत अमुक भाग अमक्याचा व अमुक दुसऱ्याचा असा बरोबर विभाग करणें सरासरी अशक्य होय. या दृष्टीनें पहातां माझा व तिचा प्रथम अत्यंत स्नेहसंबंध व पुढें शरीरसंबंध झाला असतां जे जे ग्रंथ मी छापून प्रसिद्ध केले त्यांत जितका माझा संबंध तितकाच तिचाही होता."

**मिल्** साहेबांनीं आपल्या पत्नीविषयीं आपली पूज्य बुद्धि व कृतज्ञताबुद्धि अनेक प्रसंगीं प्रदर्शित केली आहे. "माझ्या ग्रंथांत जें जें कांहीं चांगलें व उदात्त असें आढळेल त्याचा उगम ती होय." "सद्गुणाची जी तिची उन्नत कल्पना तीच माझी मुख्य प्रेरणा होय. तिची पसंती हेंच माझें उत्तमोत्तम बक्षिस!" याप्रमाणें **मिल्** साहेबांनीं आपल्या पत्नीसंबंधानें अनेक स्थळीं प्रेमळ उद्गार काढिले आहेत. विस्तार भयास्तव येथें अधिक देतां येत नाहींत.

**मि० फ्रेडरिक् ह्यारिसन्** यानीं थोड्या वर्षांपूर्वी '**नाइन्टीन्थ सेंचरी**' नांवाच्या प्रसिद्ध सर्वमान्य मासिकांत **मि० मिल्** याच्या चरित्रास व ग्रंथांस उद्देशून एक फार सुंदर निबंध लिहिला आहे. त्यांतही **मिल्** साहेबांच्या कांहीं मतांचें खंडन करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला आहे. तो निबंधही ज्यांस वाचावयास मिळेल त्यांनीं अवश्य समग्र वाचावा.

आमचे इकडे बरेच दिवसांपासून प्रहसनकारांनीं, नाटिकाकर्त्यांनीं, व कांहीं कांहीं वर्तमानपत्र कर्त्यांनीं 'स्त्रियांची परवशता' या विषयाची अगदीं फजिती उडवून टाकण्याचा जणुं विडाच उचलला होता व आहे, ही गोष्ट भाषान्तरकाराच्या ध्यानांत नाहीं असें नाहीं. तथापि, या विषयाचें महत्व लक्षांत आणून त्याचें प्रतिपादन शांत व गंभीर रीतीनेंच होणें इष्ट आहे, असें त्याचें मत असल्यामुळें यापूर्वीच प्रसिद्ध झालेल्या व पुढें प्रसिद्ध होणाऱ्या टीकात्मक लेखांची भीति न बाळगतां **मिल्**साहेबांच्या मूळग्रंथाचें हें प्रतिबिंब मराठी वाचकांचेंपुढें मांडण्याचें त्यानें एक प्रकारें धाष्टर्यच केलें आहे. हें भाषान्तर कांहीं वर्षांपूर्वीं पुणें येथें प्रसिद्ध होत असलेल्या '**मनोरंजन आणि निबंधचंद्रिका**' या नांवाच्या लोकप्रिय मासिकांत थोडथोडें छापवून प्रसिद्ध केलें होतें. त्यास बरीच वर्षें झालीं. त्यांत बरीच सुधारणा करून हल्लीं तें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे.

'स्त्रियांची परवशता' हा विषय उपहास करण्यासारखा नाहीं. '**अर्ध** भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा। भार्या मूलं त्रिवर्गस्य' **अशा**सारख्या **श्रीव्यासा**दिकांच्या उक्ति आहेत. 'नारियोंकूं निंदो

नही, नारी नरकी खान। जिस खानीसे पैदा हुवे **भीष्म राम हनुमान्**' असे **कबीरा**सारख्या भगवद्भक्तांनीं स्त्रीजातीबद्दल उद्गार काढिलेले आहेत. **सीता, द्रौपदी, वाचक्नवी, याज्ञवल्क्य** यांची **मैत्रेयी, जनक**राजाशीं संवाद करणारी **सुलभा** इत्यादि पवित्र व थोर स्त्रियांची नांवें इतिहास मानिलेल्या आमच्या पवित्र ग्रंथांतून आढळत आहेत. तेव्हां स्त्रियांची परवशता योग्य आहे, न्याय्य, आहे, हितावह आहे, असें मानणाऱ्या व प्रतिपादन करणाऱ्या लोकांचा जसा एक पक्ष तसाच उलट बाजू प्रतिपादन करणाऱ्यांही दुसरा पक्ष असावा यांत नवल काय? **स्त्रियांची परवशता** सर्वथा अन्याय्य, अहितकर व अनिष्ट आहे असें जरी सिद्ध झालें तरी तो शास्त्रार्थ किंवा सिद्धांत घेऊन आज आमच्या एकंदर स्त्रिया पुरुषांविरुद्ध बंड करितील, किंवा एकदम सर्वजणी उठून 'आमचें स्वराज्य, आमचें स्वातंत्र्य आह्मांस द्या. नाहीं तर आह्मी सर्व स्त्रिया एक जुटीनें पुरुषांचें राज्य झुगारून देऊं!' ह्मणून पुरुषांस दटावतील, किंवा आपलें ह्मणणें अमलांत आणतील, अशी भीति प्रतिपक्षास बाळगण्याची मुळींच गरज नाहीं. ज्या रूढीची व समजुतीचीं पाळेंमुळें समाजरूप भूमींत फार खोल गेलीं आहेत, त्यांचें उन्मूलन किंवा उत्पाटन केवळ शास्त्रार्थानें किंवा वादविवादानें क्षणमात्रांत होणार, अशांतली गोष्ट नाहीं. **बृहस्पतीनें** ह्मटलें आहे: 'केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो हि निर्णयः। युक्तिहीने विचारे तु धर्महानिः प्रजायते.'

सर्व व्यवहारशास्त्राचा पाया रूढ आचारावर रचलेला असतो.

कालवशात् किंवा परिस्थितिवशात् रूढि बदलत जातात. ह्मणजे शास्त्रही बदलत जातें. धर्महानि, ह्मणजे अर्थात् सुखहानि होण्याचें कारण 'युक्तिहीन विचार'. कै. परमपूज्य महर्षि न्यायमूर्ति **माधवराव रानडे** याच्या व्याख्यानांतून व खासगी भाषणांतून अशा आशयाचा नेहेमी उद्गार निघे कीं, आह्मी इतके 'कॉन्झरव्हेटिव्ह' ह्मणजे मागून चालत आलेल्या गोष्टींचे अभिमानी व नव्याचे द्वेष्टे आहों कीं, आह्मांस कोणी एखादा आकाशांत भराऱ्या मारणारा सुधारक आपल्या नव्या विचारांनीं एकदम फरपटींत ओढून नेऊन एखाद्या नवीन मार्गास लावील अशी भीतिच नको! आमचा समाज ह्मणजे शिशासारख्या एखाद्या जड धातूचा एक प्रचण्ड गाडा! त्याला दोन पावलें तरी आपल्या मूळच्या जागेवरून पुढें ढकलणें, या कामास लागणारी वाफ किंवा शक्ति आह्माजवळ इतकी थोडी व अपुरी आहे कीं, तिचा जोर एकाएकीं वाढेल व ती, ज्याचा हांकणारा नाहींसा झाला आहे अशा एखाद्या राक्षसी इंजिनाप्रमाणें हा गाडा रुळावरून भलतीकडेच ओढून नेऊन तो एखाद्या भयंकर खड्डयांत घालील, अशी भीति बाळगण्याचें अगदींच कारण नाहीं!*

---

* माधवरावजीनी प्रस्तुत भाषान्तरकारास सन १८९० सालीं फेब्रुवारी ता० २ चें एक पत्र पाठविलें होतें त्यांत त्यांनीं आमच्या सामाजिक स्थितीस उद्देशून ह्मटलें आहे —

"Authority is supreme in settling the smallest details of our life in all departments. In such a state of society, the expectation that each individual will possess sufficient independence to work out his destiny by the higher law within us is of course anticipating events by decades. In the mean while the fringe of society may be able to help itself, but it is after all a fringe and the mass is inert and spell-bound."

केवळ इतिहासदृष्ट्या व बुद्धिवादानें प्रस्तुत ग्रंथांतील विषयाचा विचार केला असतां, अमुक सिद्धांत निघतात किंवा अमुक गोष्टी लक्षांत येतात, हें जगापुढें मांडावें अशा उद्देशानें हा ग्रंथ मूळग्रंथकारानें लिहिला. त्याचें भाषान्तर करून लोकांपुढें ठेविलें आहे. जुन्या [illegible] लोकांनीं मूळच्या ग्रंथकारावर किंवा भाषान्तरकारावर रोष करूं नये, किंवा टीकाकारांनीं केवळ विकारवश होऊन अथवा उपहास करण्याची बुद्धि धरून टीकात्मक लेख लिहून तुटून पडूं नये! तर त्यांनीं कृपादृष्टिकरून स्वस्थ चित्तानें व दुराग्रहाचा त्याग करून ग्रंथकाराचें ह्मणणें काय आहे तें ऐकावें एवढीच त्यांस विनंति आहे. **मिल्** साहेबांच्या शांत वृत्तीचा असा एक चमत्कार सांगतात कीं, त्यांस कोणच्याही वादांत उलट पक्षापेक्षां आपल्या स्वतांच्याच पक्षांतील दोष अधिक ठळक दिसत व ते **शंकराचार्यां**प्रमाणें पूर्वपक्षाचें ह्मणणें त्यास उत्तर देण्याचे अगोदर चांगल्या रीतीनें समजून घेत. माझ्या मतानें **मिल्**साहेबांनीं स्त्रियांच्या पक्षाचें समर्थन जितक्या उत्तम शब्दांनीं व युक्तींनीं करणें शक्य आहे असें त्यांस वाटलें तितकें केलें आहे. सुमारें ४०–५० वर्षांपूर्वी **इंग्लंडांतील** स्त्रियांची स्थिति कशी होती हें या ग्रंथावरून बरेंच चांगलें लक्षांत येण्यासारखे आहे. **इंग्लंडांतील** स्त्रियांच्या त्या स्थितींत व हल्लींच्या स्थितींत अर्थात् पुष्कळच अंतर पडलें आहे. हें अंतर पडण्यास ज्या अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या, त्यांपैकीं प्रस्तुत ग्रंथ हा एक कारण होय. **मि० फ्रेडरिक् हॅरिसन्** हे

आपल्या **मिल्** वरील निबंधांत ह्मणतातः—"स्त्रियांची परवशता" या ग्रंथाचा कायद्यांवर, लोकाचारावर व लोकमतावर फार महत्वाचा परिणाम घडून आला. पुष्कळ बाबतींत स्त्रियांच्या संबंधाचा कायदा बदलला. लोकांचा केवळ दुराग्रह, अथवा औदासिन्य, किंवा निवळ हलगर्जीपणा यांच्या योगानें स्त्रियांच्या वाजवी हक्कांची जी एकसारखी पायमल्ली होत होती, सार्वजनिक कामें करण्याविषयीं त्यांस जो प्रतिबंध करण्यांत येत असे, किंवा त्या अनधिकारी आहेत असें मानीत असत, तो बराच प्रकार मोडला. महत्पदाभिलाषी-स्त्रियांच्या मार्गांत एक दोन बाबी शिवाय करून कायद्याच्या दृष्टीनें किंवा नीतिदृष्टीनें कोणत्याही प्रकारें सांप्रत आडकाठी राहिली नाहीं. वाङ्मय, कला, वैद्यक, शास्त्र, व्यवहार, विश्वविद्यालयें, शारीरिक खेळ, राजकीय चळवळ, लोकसेवा (public service) इत्यादि व्यवसायाचे मार्ग त्यांस खुले झाले आहेत. **पार्लमेन्टचे** सभासद होण्याचा व निवडण्याचा अधिकार, **बॅरिस्टरचें** किंवा वकिलाचें काम करण्याचा अधिकार, हे अधिकार अद्याप त्यांस निषिद्ध आहेत. परंतु हेही अधिकार त्यांस प्राप्त व्हावे अशाविषयीं यत्न चालूच आहेत व **इंग्लिश** स्त्रियांच्या बहुसंख्येनें जर हे अधिकार प्राप्त करून घ्यावे असें मनांत आणलें तर त्या प्रश्नाचा निकाल स्त्रियांस आपल्या तर्फे तेव्हांच करून घेतां येईल."

या ग्रंथास लहानशी प्रस्तावना लिहावी अशा विचारांत असतां प्रसिद्ध विदुषी ब्रह्मवादिनी श्रीमती **ॲनी बेसन्ट** बाई यांचीं Ancient Ideals (प्राचीन संस्था) या विषयावरील व्याख्यानें

पहाण्यांत आलीं; त्यात Womanhood (स्त्रीजन किंवा स्त्रीवर्ग) या विषयावर एक सुंदर व्याख्यान आढळलें.

आपणांस जुन्या आचारा विचाराचे अभिमानी, सनातन धर्माचे कैवारी, व सुधारणाद्वेष्टे म्हणविणाऱ्या आमच्यात बऱ्याच व्यक्ति आहेत व त्यांस **ॲनी बेसन्ट** बाईंचे लेख, व्याख्यानें व मतें, त्या बाई थिआसोफिस्ट पंथास आल्यापासून मान्य होऊं लागलीं आहेत. अशा लोकांस व इतरास अर्वाचीन स्त्रियांच्या स्थितीबद्दल त्या बाई काय ह्मणतात, हें कळावें ह्मणून त्या व्याख्यानाच्या आरंभीं प्रस्तावने दाखल लिहिलला भाग महत्वाचा समजून खालीं देतों.

" माझ्या बंधूनों:—

अशी एक ह्मण आहे कीं, कोणत्याही देशांतल्या स्त्रियांच्या स्थितीवरून त्या देशाऱ्या एकंदर सुधारणेची किंवा उन्नतीची कल्पना करिता येते. ही ह्मण जर खरी असेल तर हा प्राचीन **आर्यावर्त** फार उन्नत अवस्थेला पोहोंचला होता याबद्दल संशयच रहात नाहीं. त्या काळीं स्त्रियांची स्थिति कशी होती, व त्या काळी या भूमींत कशा योग्यतेच्या स्त्रिया निपजत होत्या या गोष्टीचें मनन करा. जगाचा इतिहास वाटेल तितका धुंडाळा. जगाच्या वाङ्मयाची पृष्ठें वाटतील तितकीं उलथी पालथी करा. परंतु तुह्मांस **आर्यावर्ता**तील प्राचीन ग्रंथसंग्रहांत किंवा वाङ्मयांत उपलब्ध होणाऱ्या स्त्रियांहून अधिक सुंदर, अधिक तेजस्वी व अधिक हृदयंगम स्त्रिया कोठेंही आढळणार नाहींत. मला असें वाटतें कीं प्रत्येक उत्तम सद्गुण व हरएक जातीचें सौंदर्य एकत्र गोळ

करून, मनुष्यरूपी मुशींत ओतून तयार केलेल्या त्या पुतळ्या जणुं काय मुद्दाम उंच जागीं ठेवून दिल्या आहेत. हेतु इतकाच कीं, सर्व जगानें त्यांजकडे पहातच रहावें!

"त्या थोर स्त्रियांपैकीं कांहींची नांवें पूर्वात्यांस व पाश्चिमात्यांस घरगुती नावांप्रमाणें प्रिय व परिचित झालीं आहेत.

"प्राचीन **आर्यावर्ता**तील स्त्रियांची चित्रें अत्यंत रमणीय आहेत, व स्त्रीजातीचे उत्कृष्ट नमुने **आर्यावर्ता**च्या प्राचीन वाङ्मयांतच दृष्टीस पडतात. जगात अन्यत्र कोठेंही त्याहून चांगले नमुने दृष्टीस पडत नाहींत. ही गोष्ट पाश्चिमात्य ग्रंथकार, पंडित व तत्त्ववेत्ते यानीं कबूल केली आहे. पाश्चिमात्य ग्रंथकारांच्या ग्रंथांतून पृष्ठेंच्या पृष्ठें अशीं दाखवितां येतील कीं, ज्यांवरून, त्यांच्या मनात स्त्रीजातीच्या उत्कृष्ट नमुन्याचीं चित्रें कशीं बिंबून गेलीं आहेत हें सहज कळून येईल. या व्याख्यानाच्या आरंभीं मला ही गोष्ट तुमच्या ध्यानांत चांगली आणून दिली पाहिजे.

"इतर विषयांप्रमाणें या विषयांतही आधुनिक **आर्यावर्तानें** कोणकोणत्या बाबतींत आपल्या वर्तनक्रमांत बदल केला पाहिजे, हें समजण्याकरितां प्राचीन **आर्यावर्ता**त आढळणारे उत्कृष्ट नमुने आपल्या ध्यानांत आणले पाहिजेत. ज्यामानानें भूतकालाची महती आपल्या लक्षांत येईल, ज्यामानानें वर्तमान कालाची अवनति व दरिद्रावस्था आपल्या मनांत चांगली बिंबेल, त्या मानानें, आपण ज्या मार्गानें गेलें पाहिजे तो मार्ग आपणांस स्पष्ट

दिसेल. पण हें सर्व त्या प्राचीन काळांतील वैभव पुनः आपणांस परत मिळावें अशी आपली इच्छा असेल तर! कारण, या व्याख्यानाच्या आरंभीं मी आपणांस सांगितलेंच आहे कीं, समाज सुधारणेसंबधानें जे महत्वाचे प्रश्न आहेत त्या प्रश्नांचा विचार करितां असें दिसून येतें कीं, प्रत्येक गोष्टींत बदल व्हावा अशी इच्छा करणारा एक पक्ष आहे, व कशांतच फरक होऊंनये अशी इच्छा करणारा दुसरा एक पक्ष आहे. या दोन अप्रयोजक व्यवहारानभिज्ञ पक्षांमध्यें आर्यावर्ताची भावी स्थिति लोंबत राहिली आहे! आपणांस प्राचीन नमुन्यांचें ज्ञान झाल्या शिवाय, किंवा जो इष्ट हेतु आपणांस साधावयाचा आहे तो हेतु, अथवा ज्या स्थानीं आपणांस जावयाचें आहे त्या स्थानाप्रत नेणारा मार्ग, कोणचा हें कळल्याशिवाय, कोणच्या सुधारणा घ्याव्या, व कोणच्या टाकाव्या हें कसें कळणार? या प्राचीन नमुन्यांच्या अनुरोधानें किंवा प्रेरणेनेंच चाललें असतां आपल्या आचारांत केलेले फरक किंवा सुधारणा शहाणपणाच्या होणार आहेत, व त्या नेटानें अमलांत येणार आहेत. ज्यामानानें प्राचीन नमुन्यांचें सौंदर्य पाहून आपलीं अंतःकरणें त्यांजकडे ओढलीं जातील त्यामानानें आपली जन्मदात्री जी आर्यभूमि तिला जगांतील इतर राष्ट्रांत योग्य अशा उन्नत दशेला पोहोंचविण्याविषयीं आपण समर्थ होऊं"

**मिसेस् अनी बेझंट बाईनीं** 'इंडियन् लेडीझ् म्यागाझीन्' नांवाच्या मासिकांत स्त्रीशिक्षणावर थोडक्यांत आपला अभिप्राय

प्रसिद्ध केला आहे. तो **थिऑसॉफिस्टचे** जान्युआरी १९०२ चें अंकांतून संग्राह्य समजून घेतला आहे:—

“ अज्ञान हें कोणत्याही राष्ट्राच्या उन्नतीला विघातक व देशहिताला धोका बसविणारें आहे व स्त्रिया हें राष्ट्राचें अर्धें अंग आहे. ह्या दोन गोष्टी इतक्या उघड आहेत कीं, स्त्रियांनां शिक्षण द्यावें किंवा नाहीं, याबद्दल ऊहापोह करण्याची कधींच जरूर पडूं नये. व्यक्तिविषयक सुख एका बाजूला ठेविलें व राष्ट्राच्या हिताकडेच जरी आपण पाहिलें, तरी असें स्पष्ट दिसतें कीं, त्या राष्ट्रांतील माताच जर अज्ञानपंकनिमग्न असल्या तर अर्थांतच त्यांची प्रजा, हीनबुद्धि निपजणार. आणि ज्याअर्थीं ती प्रजा ह्मणजे त्या राष्ट्राचे भावी अवयव किंवा स्तंभ, त्या अर्थीं त्या राष्ट्राच्या उन्नतीला उतरती कळा लागणारच. एका अर्थीं स्त्रियांच्या शिक्षणाला पुरुषांच्याही शिक्षणापेक्षां जास्ती राष्ट्रीय महत्व आहे. कारण, भावी पुरुषांना वळण लावण्याचें काम स्त्रियांचे हातांत असतें. आणि त्यांनीं दिलेल्या शिक्षणाचा परिणाम कधींही नाहींसा होत नाहीं. ‘ थोर पुरुषांच्या आयाही थोरच होत्या ’ हीएक **इंग्लंडांत** ह्मणच होऊन बसली आहे. शुद्धाचरणी, भक्तिमान, सदृढ व शहाण्या आईच्या आचरणाचा परिणाम मुलावर किती होईल याबद्दल पूर्ण कल्पनाच करितां येणार नाहीं. अज्ञान आईस, आपल्या मुलाची प्रकृति कशी सदृढ ठेवावी हें माहित नसतें; ती त्याच्या मनोविकारांस भलत्याच रीतीचें वळण देते; त्याच्या बुद्धीस कोतेपणा आणिते; आणि त्याचें मन अप्रसन्न

करिते; ह्मणजे, अध्यात्मविषयासंबधानें ती त्यास पूर्ण अज्ञानांत ठेविते. कारण, ती अज्ञान असल्यानें तिला आरोग्याचे नियम माहित नसतात; ज्याच्या योगानें त्याची बुद्धि विकास पावेल असें शिक्षण त्यास तिला देतां येत नाहीं; ती प्रेमास स्वार्थपरायणतेनें दूषित करिते व धर्मभोळेपणा ह्मणजेच धर्म असें त्यास वाटावयास लाविते.

"स्त्रियांनां शिक्षण द्यावें असें मानिलें, तरी कोणती शिक्षणपद्धति स्वीकारावी हा प्रश्न रहातोच. व हाच प्रश्न **हिंदुस्थानांत** प्रस्तुत फार महत्वाचा आहे. कारण, स्त्रियांनां शिक्षण देण्याची आवश्यकता दिवसानुदिवस फार वाढत आहे. देशाच्या प्रस्तुत स्थितीला अयोग्य असें शिक्षण जर देण्यांत आलें तर फार धोका बसण्याचा संभव आहे. कांहीं अंशीं असा प्रकार हल्लीं या देशांत चालूही आहे. **इंग्लंडमध्यें** उच्च प्रतीचें शिक्षण या नांवाखालीं जें शिक्षण देतात, त्यांत व **हिंदुस्थानांत** जें शिक्षण दिलें जात आहे, त्यांत कांहींच फरक दिसत नाहीं.

"मला ह्या मासिक पुस्तकाची जागा फार अडविणें बरोबर वाटत नसल्या कारणानें, असल्या तऱ्हेचें शिक्षण **इंग्लंडांतील** लोकांस किती फायद्याचें किंवा तोट्याचें आहे, याबद्दल फार लिहितां येणार नाहीं. थोडक्यांत मला इतकेंच सुचवितां येईल कीं, जीवनार्थ कलहांत पुरुषांची बरोबरी करितां यावी म्हणून आपण आपल्याच श्रमांवर निर्वाह करण्याऱ्या स्त्रियांनां असल्या शिक्षणाची अवश्यकता होती आणि म्हणूनच त्याचा प्रचार **इंग्लंडांत** सुरू झाला.

पोटासाठीं श्रमाचा विक्रय करण्याचा प्रसंग आला असतां, उत्तम प्रकारचें शिक्षण मिळून जीवनार्थ कलहास तयार झालेल्या पुरुषांची बरोबरी अर्धवट शिकलेल्या स्त्रियांनां करितां येईना. यामुळें त्यांस वेतन कमी मिळूं लागे. पोटाकरितां पुरुषांचींच कामें करून पुरुषांशीं चढाओढ करावी लागल्यामुळें तेथील बायकांनीं पुरुषास मिळत असलेलें शिक्षण मिळविण्याचा निश्चय केला; व म्हणून पुरुषाचें जें उच्च शिक्षण, तेंच स्त्रियांचेंही उच्च शिक्षण बनलें, व पुरुषांप्रमाणेंच त्यांच्याही शिक्षणाचीं मुख्य चिन्हें 'डिग्र्या' व 'डिप्लोमे' हीं बनलीं.

"**हिंदुस्थानांतील** व्यावहारिक व सामाजिक स्थिति, व **इंग्लंडां**तील व्यावहारिक व सामाजिक स्थिति, यांमध्यें जर साम्य असतें, व तिकडच्या प्रमाणें अविवाहित स्त्रियांचे थवेच्या थवे जर इकडे पोटास मिळविण्या साठीं धडपड करिताना आढळले असते, तर **इंग्लंडांत** ज्या शिक्षणाची गरज आहे असें शिक्षण इकडेही द्यावें, हें म्हणणें काहीं तरी शोभलें असतें; पण **हिंदुस्थानां**त अशी स्थिति नाहीं, हें प्रत्येकाला ठाऊक आहे. अगोदरच एकमेकांवर वरचढ करण्याच्या इच्छेमुळें, श्रमाची किंमत कमी होऊन चांगल्या सुशिक्षित पुरुषांनाही अगदीं भिकार रोजमुरा मिळतो. या सुशिक्षित पोट भरणाऱ्या पुरुषांच्या संख्येंत लाखो स्त्रियांची भर पडून त्याची अहमहमिका किंवा जीवनार्थकलह वाढण्याचा इकडे मुळींच संभव नाहीं. पोटासाठीं भाकरी मिळविण्याचें काम ( जें करण्याचा प्रसंग इकडील स्त्रियांवर नाहीं )

करावयाची योग्यता देणारी इंग्लंडांतील शिक्षणपद्धति इकडे कां आणावी किंवा चालू करावी? ज्या शिक्षणपद्धतीनें त्या उत्तम गृहिणी व माता होतील—आणखी हीच गोष्ट त्यांस अधिक श्रेयस्कर आहे—असें शिक्षण त्यांनां कां न मिळावें? आर्यवृत्तीला व शीलाला अनुसरून असेल व जें परिणामीं हिंदुस्थानास हितकर होईल, असें शिक्षण द्यावें, येवढेंच माझें ह्मणणें आहे.

"या शिक्षणपद्धतीची दिशा मी थोडक्यात सुचवितें ती अशी:—प्रत्येक स्त्रीला आपल्या जन्मभाषेचें पूर्ण ज्ञान असलें पाहिजे; मग ती जन्मभाषा हिंदी, बंगाली, तेलंगी, तामीळ कोणचीका असेना? त्याच प्रमाणें, तिला त्या भाषेंत लेखही लिहितां आले पाहिजेत. उदात्त व प्राचीन असें संस्कृत वाङ्मय, संस्कृत काव्यें आणि पुराणें सहज रीतीनें व जेणें करून तिला आनंद होईल अशा रीतीनें वाचतां येण्यासारखें संस्कृताचें ज्ञान तिला असावें. त्याच प्रमाणें शक्य असल्यास इंग्लिश भाषेचेंही ज्ञान तिनें संपादन करावें. त्याचा हेतु इतकाच कीं, त्या भाषेच्या ज्ञानामुळें इंग्रेजी शिकलेल्या आपल्या पतीविषयीं व मुलांविषयीं तिच्या ठायीं सहानुभूति उत्पन्न व्हावी. इंग्रेजी भाषेच्या ज्ञानानें ज्यापासून आनंद व बोध प्राप्त होणारा आहे अशा विचारांच्या प्रदेशांत तिला प्रवेश करितां येणार आहे. शिवाय, हिंदुस्थानांतील हल्लींच्या सुधारणेच्या कारणांपैकीं एका बलवत्तर कारणाशीं तिचा प्रत्यक्ष परिचय होणार आहे. रहाण्याची जागा, स्वतःच्या संवयी व घरांतील इतर व्यवस्था वगैरे संबंधाचे जे नियम, जे पाळिले असतां आरोग्याची वृद्धि करितात, त्या

नियमांचे यथार्थ ज्ञान तिला असावें. दुखणेकऱ्याची नीटपणें शुश्रूषा करितां यावी व पडशाखोकल्यासारख्या लहान सहान दुखण्यांत आपल्या मुलांस औषधपाणी देतां यावें, इतक्या पुरतें शारीरशास्त्र व वैद्यक यांचेंही ज्ञान असावें. त्याचप्रमाणें कोणच्या तरी एका कलेचें ज्ञान, मुख्यत्वेंकरून संगीताचें, चित्रकलेचें, आणि शिवणकामाचें ज्ञान—ज्ञाल्यानें गृहिणीला आपलें घर साध्या व आल्हाददायक वस्तूंनीं आकर्षक करितां येईल; व ते निर्दोष व सुखपूर्ण अशा वस्तूंचें स्थान होईल. मी नम्रपणानें असें सुचवितें कीं, अशा तऱ्हेच्या शिक्षणानें हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या मोहकतेला व शीलाला धक्का न बसतां त्यांच्या बुद्धीचा विकास होईल. असें केल्यानें त्यांचें अंतःकरण शुद्ध होईल, त्यांची ग्रहणशक्ति वृद्धिंगत होईल, त्यांच्या मनांत भक्तिभाव उत्पन्न होईल आणि त्यांच्या आत्म्यांना आपलें सत्स्वरूप ओळखून घेण्याची जिज्ञासा तृप्त करून घेतां येईल. **हिंदुस्थानांतील** स्त्रीची अध्यात्मपरता कधींही नाहींशी होणार नाहीं. परंतु तिच्या **भक्ति-मत्तेंत ज्ञाना**चीहि भर पडली पाहिजे. ह्मणजे, तिच्यांत साधुत्वाप्रमाणें ज्ञानीपणाही उत्पन्न होईल, व तिला आपला जो उदात्त असा प्राचीन धर्म त्याकडे आपल्या ज्ञानाचा व भक्तीचा अशा दोहींचाही उपयोग करून घेतां येईल. आणि, वितंडवाद व नास्तिक्य यांच्या वाईट परिणामापासून तिला आपल्या पतीचें व पुत्रांचें रक्षण करितां येईल. हिंदुधर्माच्या योगानें ती अजूनपर्यंत शुद्ध राहिली आहे. त्याच धर्माच्या योगानें तिला पूर्वींच्या स्त्रियाप्रमाणें पुनः ज्ञानी झालें पाहिजे."

सांप्रतच्या आमच्या एकंदर शोचनीय, उदासीनतेच्या, दौर्मनस्याच्या, व अनुदारविचाराच्या काळांत, आमच्या लोकांच्या मनावर प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनानें कांहीं विशेष परिणाम जरी घडला नाहीं, तरी, एका महत्वाच्या सामाजिक विषयावर **इंग्लंडां**तील एका महापंडिताचे विचार कसे होते ते आमच्या लोकांपुढें मांडून ठेवल्यापासून देखील त्यांस बराच फायदा होईल, अशी आशा धरून हा भाषान्तराचा प्रयत्न केला आहे.

मूळग्रंथांत निरनिराळ्या पारिग्राफांस ( वाक्यविच्छेदांस ) आंकडे दिलेले नाहींत. परंतु भाषान्तरांत सोईकरितां कलमवार आंकडे घातले आहेत. भाषान्तर होतां होईल तितकें मुळास धरून केलें आहे. योग्य वाटल्या तेथें त्या त्या पृष्ठाखालीं स्पष्टीकरणार्थ टीपा दिल्या आहेत. त्यांचा वाचकांस बराच उपयोग होईल अशी आशा आहे. मूळग्रंथकाराच्या आशयाचें हुबेहुब प्रतिबिंब उठलें आहे किंवा नाहीं, याचा निर्णय अर्थात वाचक करितील. परंतु ज्या टीपा दिल्या आहेत त्यांचे संबंधानें माझे विद्वान् मित्र **रा. फडके** यांनीं आपल्या ‘स्वातंत्र्य’ ग्रंथाचे उपोद्घाताचे शेवटीं ह्मटल्याप्रमाणें मी ही आपल्या वाचकांस त्यांच्याच सुंदर विनयदर्शक शब्दांनीं ह्मणतों कीं, या ‘टीपांतून जीं उदाहरणें वगैरे दिलीं आहेत तीं, कित्येक ठिकाणीं असावीं तितकीं योग्य नाहींत; यास कारण सामर्थ्याभाव हें होय, हें सांगावयास नकोच. पण त्यांच्या संबंधानें सुज्ञ वाचकांनीं मेहेरबानीनें एवढें लक्षांत ठेवावें कीं, कोणत्याही पक्षावर, संस्थेवर किंवा

व्यक्तीवर कुबुद्धीनें टीका करण्याच्या उद्देशानें तीं दिलीं नाहींत. केवळ विषयाच्या समजुतीसाठीं दिलीं आहेत. त्यांत मानवी स्वभावाच्या स्खलनशीलतेमुळें प्रसंगोपात्त अधिक उणा शब्द कोणास लागण्यासारखा पडला असेल, तर त्याबद्दल त्यांनीं क्षमा करावी, अशी सविनय विज्ञप्ति आहे.'

या ग्रंथास पुणें येथील 'डेक्कन् व्हरन्याक्युलर ट्रान्स्लेशन् सोसायटी' नावांच्या मंडळीनें बक्षिस दिलें व ग्रंथप्रकाशनार्थ उत्तेजन दिलें व अवकाश दिला त्या बद्दल भाषान्तरकार स्दर्हु मंडळीचा फार आभारी आहे.

हें पुस्तक छापण्याचें काम बरेंच घाईनें झालें असल्यामुळें व भाषान्तरकारास ग्रंथमुद्रणाचें काम सुरूझाल्यापासून, अनेक कारणानीं असावें तितकें चित्तस्वास्थ्य किंवा मनाची शांतता अनुकूळ नसल्यामुळें पुष्कळ ठिकाणीं भाषेचीं, लेखनपद्ध-तीचीं व इतर अशुद्धें राहिलीं आहेत. त्यांजकडे वाचकांनीं कृपादृष्टी करावी एवढी विनंति आहे.

हें भाषान्तर करीत असतां माझे जुने, प्रेमळ व रसिक मित्र **रा. रा. गंगाधर अनंत ठाकूर,** यांनीं लिहिण्याचे वगैरे कामीं मला बरीच मदत केली त्याबद्दल प्रस्तुतस्थळीं त्यांचे मी मनः-पूर्वक आभार मानितों. त्याचप्रमाणें हा ग्रंथ छापून काढण्याचे कामीं माझे पुण्यांतील लोकप्रिय, प्रेमळ व विद्वान् मित्र **रा. रा. हरी भाऊ** ऊर्फ **हरी नारायण आपटे** यांनीं हा ग्रंथ स्वतंत्र

पुस्तकरूपानें जगापुढें ठेवण्याच्या कामीं जें मला उत्साहपूर्वक साहाय्य केलें त्याजबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे.

शेवटीं, स्त्रियांची खरी उन्नति व्हावी एतदर्थ मनापासून झटणाऱ्या माझ्या सर्व देशबांधवास व भगिनींस मी फार दिवसांपासून मनांत आणलेली ही माझी अल्प सेवा मान्य होवो अशी मी परमेश्वरापाशीं प्रार्थना करून ही प्रस्तावना संपवितों.

ॐ तत् सत् ब्रह्मार्पणमस्तु.

मालेगांव, मार्च १९०२. गो. वा कानिटकर.

# स्त्रियांची परवशता.

## भाग १ ला.



१. हा निबंध लिहिण्याचा हेतु काय? असा प्रश्न वाचकांच्या मनांत प्रथमारंभीच उत्पन्न होण्यासारखा आहे, ह्मणून त्या प्रश्नाचें उत्तर मी देतो. माझ्या अगदी लहानपणापासून–ह्मणजे, जेव्हांपासून सामाजिक गोष्टी व राजकीय गोष्टी यांच्यासंबंधानें माझी अमुक ह्मणून कांही मतें ठरली, तेव्हांपासूनच एका महत्वाच्या विषयाबद्दल माझे दृढ असे एक मत होऊन गेलें आहे. हा महत्वाचा विषय कोणचा ह्मणाल तर अर्थात प्रस्तुत निबंधाचा. ह्मणजे **स्त्रियांची परवशता** हा होय. या विषयाच्या संबंधानें जें माझें एक पक्कें मत होऊन गेलेले आहे, त्याचीं कारणें जितक्या स्पष्ट रीतीनें मला लोकांस सांगतां येतील तितक्या स्पष्ट रीतीनें सांगावी, एवढाच प्रस्तुत निबंध लिहिण्यांत माझा उद्देश आहे. तेव्हांपासून आजपर्यंत जो काळ लोटला, तेवढया काळांत तें माझें मत दुर्बळ झालें नाहीं, किंवा त्यांत कांही फेरबदलही झाला नाही. उलट जों जों या संसारांतील माझा अनुभव वाढत गेला व जों-जों माझी विचारशक्ति वाढत गेली, तों तों ते माझें मत बळावत जाऊन अधिक दृढ होत गेलें. हें मत कोणचें तें सांगतों. प्रस्तुतकाळीं स्त्रीपुरुषांमधील परस्परव्यवहार जे आपण पहातों, त्यांत नियामक असें एक मुख्य तत्व आपल्या दृष्टीस पडतें. एका

वर्गाला ( स्त्रीजातीला ) दुसऱ्या वर्गाची ( पुरुषजातीची ) कायदेशीर रीतीची गुलामगिरी करण्यास लावणे, हे तत्व माझ्या समजुतीप्रमाणे वस्तुतः अगदी चुकीचे असून एकंदर मानवजातीच्या सुधारणेस व उन्नतीस बाधक अशी जी कित्येक कारणे आजकाल आहेत, त्यांपैकी हे एक मुख्य कारण आहे. हे तत्व आपणांस टाकून दिले पाहिजे, व त्याच्या ऐवजी पूर्ण समतेचे तत्व अमलांत आणिले पाहिजे. ह्मणजे, ससारात स्त्री व पुरुष सारखे अधिकारी आहेत, एकाला अधिकार किंवा हक्क जास्ती, व दुसऱ्याला कमी, असा काही प्रकार नाही, असे समजले पाहिजे.

२. लोकांना जी गोष्ट समजून देण्याचे मी योजिले आहे ती सांगण्याला योग्य असे शब्द सुचणेंही इतके कठिण आहे की, त्यावरून मी हाती घेतलेले काम कडेस जाण्याला किती प्रयास पडतील हे सहज समजेल. परंतु एवढ्यावरून माझ्या मताच्या पुष्टीकरणार्थ जी कारणे मी दाखविणार आहे, ती सबळ नाहीत किंवा स्पष्ट नाहीत; आणि म्हणूनच प्रस्तुत विषयाचे प्रतिपादन करणे मला कठिण जाणार आहे, असा मात्र माझ्या म्हणण्याचा आशय कोणी समजू नये. इतर सामाजिक व राजकीय विषयाच्या संबधाने लोकांत रूढ झालेले फार दिवसांचे ग्रह बदलून टाकणे जसे कठिण जातें, त्याचप्रमाणे प्रस्तुत विषयाच्या [illegible] गोष्ट आहे. जोपर्यंत कोणत्याही मताचे मूळ लोकांच्या मनोवृत्तीत खोल गेलेले असते, तोपर्यंत त्या मताच्या विरुद्ध जों जों अधिक कारणे दाखवावी व जों जों अधिक पुरावा करावा तों तों त्या मताला उलट अधिक जोर येत जातो.* ही एक मोठी

* मराठींत 'हालवून बळकट करणें' अशी एक म्हण आहे. तिचें तात्पर्य हेंच. इलबर्ट बिल, संमति कायद्याचें बिल, चहा प्रकरण, अशासारख्या आमच्या अगदीं आधुनिक इतिहासांत घडलेल्या गोष्टींचा जरी विचार केला तरी, बहुजनसमाजाच्या मनावर विचारापेक्षां बहुत दिवसांचा झालेला जो ग्रह त्याचा पगडा किती जबरदस्त असतो, हें वाचकांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहणार नाहीं. भा० क०

चमत्कारिक गोष्ट आहे. कारण, त्यांचें जें कांहींएक ठाम मत बनलेलें असतें, तें जर कांहीं आधारावरून किंवा पुराव्यावरून झालें असेल, तर त्याचें खंडन केलें असतां तें मत लटपटूं लागावें व लोकांचा खरोखर त्यावरील भरवसा कमी व्हावा. परंतु, बहुधा असें घडत नाहीं. लोकांच्या केवळ वाटण्यावरच, म्हणजे मनाच्या ग्रहावरच जेव्हां एखाद्या मताचा पाया रचलेला असतो, तेव्हां त्या विषयावर वादविवाद होऊन जों जों तें मत निराधार आहे असें ठरतें, तों तों त्या मताच्या पुरस्कर्त्यांस वाटूं लागतें: 'अहो, ज्या अर्थी बुद्धिवादानें आमचें हें मत बदलत नाहीं त्या अर्थी आमच्या या मताला, किंवा आमच्या या मनाच्या ग्रहाला दुसरा कांहीं तरी बळकट आधार असावा!' ही लोकांची समजूत जोंपर्यंत कायम राहते, तोंपर्यंत, त्या मतावर प्रतिपक्षांनीं केलेल्या प्रहारांमुळें वारंवार नव्या कल्पना, अथवा नवे तर्क काढून, त्या मताचे जे भाग ढासळून जातात त्यांची डागडुजी करण्याचा ते यत्न करितात. जुने आचार, जुन्या संस्था व जुन्या रूढि, यांच्या मंडनार्थ व संरक्षणार्थ लोकांचे ग्रह पाहारेकऱ्याप्रमाणें सदैव तत्पर असतात. विशेषेकरून प्रस्तुत विषयाच्या संबधानें लोकांचा जो ग्रह आहे तो फार बलवत्तर असून त्याचीं पाळेंमुळें फारच खोल गेलेलीं आहेत. असें असण्याचीं कारणें पाहूं जातां तीं इतकीं पुष्कळ आहेत कीं, आलीकडे समाजाच्या एकंदर आध्यात्मिक व व्यावहारिक स्थितींत जरी फार मोठा फेरबदल झाला आहे व सुधारणा झाली आहे, तरी त्यांतूनही प्रस्तुत विषयाच्या संबधानें लोकांच्या जुन्या समजुती अद्यापि जशाच्या तशाच कायम राहिल्या आहेत. त्या जितक्या ढिल्या होऊन जाव्या तितक्या अद्यापि झाल्या नाहींत. या गोष्टीचें आपणांस विशेष आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. कांहीं रानटी आचारांस मनुष्यें पुष्कळ दिवस चिकटून राहतात, एवढ्याच कारणानें, त्यांचा रानटीपणा, जे रानटी आचार

मनुष्यें लौकर सोडून देतात त्यांच्यापेक्षा कांहीं कमी असतो, असें म्हणतां येत नाहीं.*

३. कोणत्याहि सार्वजनिक मताचें खंडन करण्यास उद्युक्त होणाऱ्या मनुष्याच्या शिरावर सर्व प्रकारें मोठा बोजा असतो. अगोदर त्यांचें ह्मणणें कोणी ऐकतच नाहीं. जर लोकांनीं त्याचें ह्मणणें ऐकून घेत लेंच तर ते मोठे भाग्यशाली व अलौकिक सामर्थ्याचे असले पाहिजेत. न्यायासनासमोर जाणाऱ्या पक्षकारांस फैसला मिळण्यास जितकी अडचण पडते, त्या पेक्षांही अधिक अडचण अशा माणसांस नसत्या चौकशीच्या कामीं पडते. मोठ्या मुष्किलीनें चौकशीचा प्रसंग घडवून आणलाच तर इतर लोकांची जी वादाची प्रमाण-पद्धति, तिच्याहून अगदीं भिन्न अशा प्रमाण पद्धतीच्या कचाट्यांत लोक त्यांस धरितात. इतर सर्व कामांत पुराव्याचा भार अस्तिपक्षावर घालणें योग्य समजतात. एखाद्या मनुष्यावर खुनाचा आरोप करून जे त्यास दोषी ठरवूं पहातात तो मनुष्य दोषी आहे असें शाबीद करण्याचा बोजा त्याच्यावरच असतो. मी निरपराधी आहे, असें त्या आरोपीस प्रथमच सिद्ध करावें लागत नाहीं. ज्या कामांत साधारण लोकांना विशेष अगत्य वाटत नाहीं, अशा एखाद्या ऐतिहासिक गोष्टीविषयीं, ह्मणजे तिच्या

* मद्यमांससेवन; स्त्रीपुरुषांचा वैवाहिकसंबंधाशिवाय अन्यप्रकारें होणारा संबंध (लग्नाच्या चालीचा अभाव); स्त्रिया जबरदस्तीनें चोरून नेऊन त्यांशीं विवाह लावणें. कोणत्याही प्रकारें झालेली संतति कायदेशीर समजणें, एका स्त्रीनें पांच पती करणें; एका पुरुषानें अनेक बायका करणें, इत्यादि आचार जर रानटी मानिले, तर ते पवित्र मानिलेल्या आपल्या सत्ययुगांतील पूर्वजांत जारीनें चालू होते, असें वैदिक काळाचा व पौराणिक काळाचा इतिहास पाहिला असतां उघड दिसतें. यापैकीं केवळ आचार शुक्राचार्यांसारख्या आचार्यांनीं स्वानुभवावरून पुढें निषिद्ध ठरविले! तेव्हां आपण कलियुगांतील माणसें अधिक पवित्र, कीं सत्ययुगांतील आपले पूर्वज अधिक पवित्र, हा एक प्रश्न विचार करण्यासारखा आहे!

भा० क०

स्वरूपणाविषयीं ( उदाहरण -भारतीयुद्ध किंवा रामायणांत सांगितलेल्या गोष्टी- या घडल्या किंवा नाहीं एतद्विषयीं ) जर मतभेद पडला तर जे कोणी अमुक एक गोष्ट घडली असें प्रतिपादीत असतील, त्यांनी आपला पुरावा अगोदर पुढें करावा; व मग प्रतिपक्षानें ती गोष्ट घडली नाहीं, अशा विषयीं जीं कांहीं प्रमाणें त्याच्याजवळ असतील, तीं त्याणीं पुढें आणावीं, हीच पद्धत योग्य आहे असें लोक समजतात. शिवाय, प्रतिपक्षाला स्वतःच्या बाजूचा पुरावा करणें झालें तरी दुसऱ्यांनी ( पूर्वपक्ष करणारांनीं ) पुढें आणलेल्या पुराव्यात कांहीं अर्थ नाहीं इतकें दाखविण्यापेक्षा त्यांस अधिक कांहीं सिद्ध करावें लागत नाहीं. तसेंच, साधारण व्यवहारात जे कोणी मनुष्याच्या स्वातंत्र्याच्या विरुद्ध असतील, किंवा कांहीं माणसांच्या अथवा वर्गाच्या स्वैरकृतीस प्रतिबंध असावा असें प्रतिपादन करतील, त्यांनीच विशिष्ट वर्गास स्वातंत्र्य कां नसावें, किंवा विशिष्ट मनुष्यें विशिष्ट अधिकारास अपात्र कां तें सिद्ध केलें पाहिजे, असे लोक समजतात. सर्वांस स्वतंत्रता असावी, कोणा एका विशिष्ट वर्गाविषयीं पक्षपात नसावा, याच गोष्टी कोणी झाला तरी प्रथमदर्शनीं गृहीत धरून चालणार. त्याच प्रमाणें, समजा, मीं अशी तक्रार केली कीं, जो अधिकार अथवा जें स्वातंत्र्य पुरुषांस देणें योग्य आहे, तो अधिकार अथवा तें स्वातंत्र्य स्त्रियांस देणें योग्य नाहीं, असें जे लोक प्रतिपादन करितात त्यांनीच आपलें ह्मणणें भरपूर पुराव्यानें स्थापित केलें पाहिजे. कारण, एक तर ते स्त्रीस्वातंत्र्याच्या विरुद्ध असून पुरुषाचा पक्षपात करावा असें ह्मणणारे आहेत; तेव्हां पुराव्याचा सर्व बोजा त्यांजवरच आहे. त्यांनीं आपलें ह्मणणें निर्विवाद रीतीनें सिद्ध करून दाखविलें नाहीं, तर या प्रकरणाचा निर्णय उघड त्याच्या विरुद्ध झाला पाहिजे. परंतु, ही माझी तक्रार मानतो कोण? एखाद्या सामान्य खटल्यांत या तक्रारी किंवा अटी योग्य आहेत, असें

लोक मानतील. परंतु प्रस्तुत प्रकरणीं या तक्रारी योग्य आहेत असे ते कधींही ह्मणणार नाहींत. मी ज्या पक्षाचें मंडन करण्याचें योजिलें आहे, त्यापासून लोकांच्या मनावर कांहीं ठसा उमटल्याची आशा बाळगण्यापूर्वीं मी कोणकोणच्या गोष्टी केल्याच पाहिजेत असे लोक ह्मणतील, त्या सांगतों. एक तर त्यांचें असें ह्मणणें पडणार कीं, या प्रश्नाची दुसरी बाजू घेणारांनीं तिच्या मंडनार्थ आजपर्यंत जें जें ह्मणून प्रतिपादन केलें आहे, त्या सगळ्याचें खंडन मी केलें पाहिजे; एवढेंच नव्हे, तर आणखी जें जें कांहीं त्यांना ह्मणतां आलें असतें परंतु ह्मटलें नाहीं, जीं जीं विरुद्ध कारणें त्यांना दाखवितां आलीं असतीं परंतु तीं त्यांनीं दाखविलीं नाहींत, त्यांचीही कल्पना करून त्यांचेंही निरसन मी केलें पाहिजे. एवढ्यानेंच संपलें नाहीं. तर अस्तिपक्षाच्या समर्थनार्थ ज्या ज्या गोष्टी दाखविण्यांत येतील, त्या सगळ्यांचें खंडन करून टाकलें तरी नास्तिपक्ष सिद्ध करण्याकरितां ज्यांचें खंडन करितां येणारच नाहीं, अशीं जबरदस्त प्रमाणें मला दाखविलीं पाहिजेत, असेंही लोक ह्मणणार. आणखी समजा, इतकेंही सर्व जरी मला करितां आलें,—माझ्या पक्षाच्या तर्फेनें मी ज्या गोष्टी, जीं कारणें किंवा जीं प्रमाणें पुढें आणीन त्याच्यापैकीं पुष्कळांचीं समर्पक उत्तरें माझ्या प्रतिपक्षाला देतां आलीं नाहींत व त्यांच्या बाजूकडील तर एकही गोष्ट मी खंडन केल्याशिवाय ठेविली नाहीं, इतकें जरी मी केलें, तरीही मी कांहींच केलें नाहीं, असें जें लोकांना वाटावयाचें तें वाटणारच! कारण उघड आहे. एक तर त्यांच्या पक्षाला सार्वत्रिक रूढीचा जबरदस्त पाठिंबा! आणखी दुसरीकडून पहावें तर त्या पक्षाला लोकांचा ग्रह अत्यंत अनुकूल. बुद्धिवादानें उत्पन्न होणारा जो संस्कार ( ह्मणजे खात्री किंवा तत्व बोध ) तो अत्यंत बुद्धिमान अशाच मनुष्यांच्या मनावर घडणारा आहे. यामुळें, प्रस्तुत रूढीच सर्वथा योग्य व न्याय्य

आहे, अशी जी लोकाची दृढ भावना तिचेच प्राबल्य बुद्धिवादजनित संस्कारापेक्षा अधिक होणार.

४. माझ्या मार्गांत येणाऱ्या या अनेक अडचणींचा उल्लेख जो मी करितो, तो उगीच काही तरी रडगाणे गावे अशा हेतूने करीत नाही. कारण, या अडचणींबद्दल रडगाणे गाइले असतां ते व्यर्थ होणार, हे मी पक्के समजतो. लोकांचे फार दिवसांचे ग्रह, त्यांच्या मनाच्या झालेल्या भावना, नित्याच्या व्यवहारामुळे बनलेल्या त्यांच्या प्रवृत्ति, या माझ्या विरुद्ध असल्या कारणाने लोकमताचा व माझ्या मताचा हा विरोध निवळ बुद्धिवादाने नाहींसा करण्याच्या कामांत या वर सांगित लेल्या अडचणी येणारच, व त्या सर्वथा अपरिहार्य आहेत, हे मी जाणतो. आणखी, खरोखरच नित्यव्यवहाराच्या संसर्गाने बनून राहिलेली जी तत्वे व ज्या त्यांच्या समजुती, ज्यात ते लहानाचे मोठे झाले, व जगात हल्ली चालू असलेल्या वर्तनक्रमाची रचना मूळ ज्यांच्यावर केलेली आहे, ती व्यवहारतत्वे किंवा त्या समजुती साधक बाधक प्रमाणांचा विचार करून केवळ बुद्धिवादाने नष्ट होतील, व त्याजवर तर्कशास्त्राचा पहिला आघात झाल्याबरोबर त्या लयाला पावतील, असे होणे प्रस्तुतच्या लोकस्थितीच्या मानाने पहातां अशक्य आहे. तसे होण्यास मनुष्याच्या बुद्धीचा किंवा विचारशक्तीचा जितका विकास आजपर्यंत झाला आहे, त्यापेक्षा फार अधिक झाला पाहिजे. माझा जो लोकांशी तटा आहे, तो तर्कशास्त्रावर किंवा बुद्धिवादावर त्यांचा भरवसा थोडा आहे, ह्मणून नव्हे. तर रूढि व मनाचा ग्रह, किंवा मनाची एक प्रकारची झालेली समजूत, याजवर त्यांचा जो वाजवीपेक्षां फाजील विश्वास आहे तो बरोबर नाही, इतकेच माझे ह्मणणे आहे.

अठराव्या शतकांतील लोकांची जी समजूत होती, तिच्या अगदी उलट समजूत एकोणिसाव्या शतकांतील लोकांची कशी झाली ती

पद्दा! अठराव्या शतकांतील लोक, मनुष्य स्वभावांतील समजस तत्वास, ह्मणजे अर्थात विचारशक्तीस, जे महत्व देत असत, तेंच महत्व आपण एकोणिसाव्या शतकांतील लोक असमजस तत्वास, ह्मणजे केवळ मनाच्या वृत्तीस किंवा भावनेस, देतों. तर्कऋषींचा अवतार संपला, असें समजून त्या स्थानीं उपजतबुद्धिरूप देवतेची स्थापना करितों, व आपल्या स्वभावात आपणास जे जे आढळतें, व ज्याची उपपत्ति आपणास बरोबर करितां येत नाहीं, त्या सर्वांस 'उपजतबुद्धि' अथवा 'स्वभाव' असें ह्मणून मोकळे होतों! बुद्धीच्या किंवा विचार-शक्तीच्या योगानें कोणतीही गोष्ट योग्य आहे किंवा अयोग्य आहे, हे ठरविण्याचा मार्ग सोडून देऊन केवळ नैसर्गिक प्रवृत्तीवर अथवा मनाच्या भावनेवर अवलंबून राहणे हे अत्यंत अहितकारक व घातक नीचत्व आणणारे आहे. आजकालच्या बहुतेक व अप्रबुद्ध समजुतीचें बीज हेंच होय. कोणत्याही गोष्टींची उपपत्ति करितांना 'सृष्टीचा हेतु' 'सृष्टीचा क्रम' किंवा 'ईश्वरी नियम' असें कांहीं तरी नांव पुढें आणून त्या गोष्टींची उपपत्ति करणें हा प्रकार योग्य नव्हे, व तो फार दिवस टिकेल असेंही नाहीं. मानसशास्त्राचें ज्ञान जों जो वाढत जाईल, व जों जो लोकांस सर्व गोष्टींचे खरें तत्व कळत जाईल, तों तों हा प्रकार मोडत जाईल हे उघड आहे.

ज्यांत एकंदर समाजाचें हित नाहीं, अशी कोणतीही गोष्ट कोण-त्याही व्यक्तीच्या स्वातंत्र्यास प्रतिबंधक नसावी, असा ठराव सर्वमान्य आहे. कायद्याच्या दृष्टीनें सर्व माणसें सारखीं असावीं; न्यायाच्या व्यवस्थेकरितां किंवा राजकारणाकरितां ज्या ठिकाणीं भिन्नभाव ठेवणें अवश्यच आहे, तेथें मात्र असावा; अन्यत्र नसावा. परंतु, पुरावा करण्याचे जे हे नियम, त्यांचा फायदा ज्या मताचा अंगीकार मी केला आहे त्याचे प्रतिपादक असतील त्यास मात्र मिळणार नाहीं. समजा,

मी जर कदाचित् असें म्हटलें कीं " बाबानो ! पुरुषांनी हुकूम करावा व स्त्रियांनी त्यांचे आज्ञाधारक दास होऊन रहावें. पुरुषांनी राज्य करावें. राज्य करण्यास पुरुष मात्र योग्य आहेत. स्त्रिया अयोग्य आहेत, असें जे तुमचें म्हणणें आहे, त्यास तुम्ही प्रमाणे दाखवा. कारण, तुमचा अस्तिपक्ष आहे. प्रमाणे न दाखवाल तर तुम्ही आपला पक्ष सोडून द्या ! " तर हें माझें म्हणणें ऐकतो कोण ?

माझें म्हणणें असें आहे कीं, रूढि व लोकांची सर्वसाधारण समजूत या गोष्टीवर लोकांचा बाजवीपेक्षां अधिक भरवसा आहे, हें बरोबर नाहीं. अठराव्या शतकांतील लोक समंजस तत्वांस किंवा बुद्धिवादास जी अमोघता देत असत, ती एकोणिसाव्या शतकांतील लोक मनुष्यस्वभावांतील असमंजसपणाच्या तत्वांस देतात, हें आश्चर्य आहे ! **बुद्धिदेवतेला** तिच्या योग्य स्थानापासून पदच्युत करून तिचा अधिकार हल्लीं आपण केवळ 'नैसर्गिक प्रवृत्ती'ला दिला आहे. आपल्या ठिकाणीं जे जे कांहीं आपणांस आढळतें व ज्याची उपपत्ति आपणांस बरोबर समजत नाहीं, त्या सर्वांस आपण 'नैसर्गिक प्रवृत्ति' म्हणतो. बुद्धीच्या योगानें खरें खोटें समजून घेण्याचा उघड मार्ग असतां, केवळ मनोधर्मांचें अथवा नैसर्गिक प्रवृत्तीचें अवलंबन करणें, हें अत्यंत अपायकारक व नीचत्व आणणारें आहे. आणि आजकालचे ठरीव व अप्रबुद्ध विचार यांचें तरी आदिकारण हेंच होय. हा प्रकार, मानसशास्त्राचे शोध जों जों वाढत जातील, तों तों कमी होत जाईल. तसेंच कोणत्याही गोष्टीची उपपत्ति करतांना 'सृष्टीचा हेतु', 'सृष्टिक्रम', किंवा 'ईश्वरी नियम', अशीं कांहीं तरी कारणें दाखवून त्या गोष्टींची उपपत्ति करणें हाही प्रकार मोडत जाईल. प्रस्तुत विषयासंबंधानें विचार करितां लोकांचा जो बलवत्तर ग्रह, व त्याच्यामुळें उत्पन्न होणाऱ्या ज्या अडचणी, त्या मी घेऊन चालतो. जनरूढि व लोकांचा समज या गोष्टी मजविरुद्ध

आहेत, हे मी कबूल करतो. परतु, ही रूढि, व हा समज, शेकडो वर्षे अबाधित चालत असल्याची खरी कारणे पाहता, ती निराळीच आहेत. ही रूढि व हा समज यांची उत्पत्ति मनुष्यस्वभावाच्या चांगुलपणापासून नाही, तर वाईटपणापासून आहे, असे जर मी सिद्ध केले नाही, तर लोकांनी प्रस्तुत वादाचा निर्णय खुशाल माझ्याविरुद्ध करावा. आणि ही गोष्ट सिद्ध करणे हे बरेच सोपे आहे.

५. कोणतीही रूढि सर्वसाधारण असेल तर, ती एका काळी लोकांच्या हिताची होती, अथवा तिचे हेतु स्तुत्य होते, असे अनुमान करणे कांही कांही गोष्टीत वाजवी आहे. अमुक रीतीने अमुक हेतु सफल होतो, असा अनुभव घेऊन कोणतीही रूढि पसंत करणे, व ती पुढे चालविणे हे योग्यच आहे. पुरुषांची सत्ता स्त्रियांवर असावी ही रूढि जेव्हां प्रथम प्रचारांत आणिली, तेव्हां सामाजिक व्यवस्था राखण्याचे जितके भिन्न भिन्न मार्ग सुचतील, त्या सर्वांची बुद्धया तुलना करून जर ती प्रचारांत आणिली असती; लोकसमाजाच्या नियमनार्थ केलेल्या अनेक प्रकारच्या व्यवस्थांचा पूर्ण अनुभव घेऊन स्त्रियांस परवशताच योग्य आहे असे ठरविले असते; किंवा, कांही दिवस स्त्रियांची सत्ता पुरुषांवर ठेऊन पाहिली, कांही दिवस स्त्रीपुरुषांचे सारखे हक्क ठेवून पाहिले; याप्रमाणे ज्या ज्या कल्पना सुचतील त्या त्या अमलात आणून तदनुसार सामाजिक स्थिति सुधारण्याच्या हेतूनेच अनुभव घेऊन स्त्रिया सर्वथा पुरुषांच्या अधीन ठेवाव्या, त्या स्वात त्र्यास योग्य नाहींत, सार्वजनिक कामामध्ये त्यांस मुळींच हात घालूं देऊं नये, एखाद्या स्त्रीने आपलें सर्वस्व ज्या पुरुषाच्या स्वाधीन केलें त्या पुरुषाची कायदेशीर रीतीची तिनें गुलामगिरी पतकरावी हाच मार्ग खरा व योग्य आहे, हीच व्यवस्था उभयतांच्या अत्यंत कल्या णाची व सुखाची आहे, असे जर ठरविले असते; तर या प्रकारच्या

रूढीचें सार्वत्रिक अवलंबन, ती रूढि प्रथम ज्या काळीं प्रचारांत आणिली, त्या काळीं तरी योग्य व उत्तम होती, असें ह्मणणें सप्रमाण झालें असतें. येवढ्यानेंच झालें नाहीं. कदाचित् त्या काळीं ती चाल पाडण्याचीं कारणें भिन्न असतील. तीं प्रस्तुत काळास लागू पडत नाहींत, असें ह्मणण्यास मार्ग राहतो. परंतु, प्रस्तुत विषयाच्या संबंधानें असा कांहीं एक प्रकार झाला नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्याच्या अगदीं उलट प्रकार झाला, असें दिसून येईल. एक तर हल्लींची रूढि, ह्मणजे अबलांनीं प्रबल पुरुषांच्या अधीन राहणें, या रूढीला हल्लीं अनुकूल असें जें मत आहे तें अगदीं निराधार आहे. कारण, दुसऱ्या कोणत्याही व्यवस्थेचा अनुभव लोकांनीं जर घेऊन पाहिलाच नाहीं, तर स्त्रियांची प्रस्तुतची व्यवस्था अनुभवाअंतीं ठरविलेली आहे, असें मुळींच ह्मणतां येत नाहीं. दुसरें असें कीं, ही विषम व्यवस्था दूरदृष्टीनें, विचारपूर्वक व समाजहितार्थ केली आहे, असें मुळींच नाहीं. फार तर काय, ही वहिवाट पाडण्याच्या अगोदर एकंदर मानवजातीच्या कल्याणाची किंवा समाजव्यवस्थेची कल्पना कोणाच्या स्वप्नांत देखील आलेली नव्हती. फार प्राचीन काळापासून ह्मणजे मनुष्यजातीच्या सुधारणेस ज्या काळीं आरंभ झाला तेव्हांपासून स्त्रीजातीचा पुरुषांस बराच उपयोग असल्यामुळें व पुरुष स्त्रियांपेक्षां विशेष धट्टेकट्टे असल्यामुळें, प्रत्येक स्त्री नेहमीं कोणाच्या तरी एका पुरुषाच्या अंकित होऊन राहिलेली आढळते. कायदे व व्यवहारपद्धति यांची धरती पाहिली तर असें दिसून येतें कीं, त्यांची उत्पत्ति बहुधा माणसांचे जे परस्पर संबंध व्यवहारांत आढळतात, त्यांवरूनच होत असते. ज्या गोष्टी ..'.. .. . लोकांत आढळतात, त्यांजवर ते शास्त्राची इमारत रचतात. यामुळें त्यांस समाजाची मान्यता मिळते. शास्त्रानें ठरविलेले अधिकार किंवा हक्क ते सर्वांस कळवितात; व शास्त्रानें

सांगितलेला जो न्याय तो प्राप्त करून घेण्याचे उघड व सुलभ मार्ग किंवा साधने ही उत्पन्न करितात. असे झाले ह्मणजे केवळ शरीरसामर्थ्यामुळे होणारी जी वडाळी, किंवा जी अव्यवस्था, तिचा लय होतो. अशा रीतीनें कांहीं कांहीं गोष्टी प्रचारांत येतात. त्या व्यक्तिमात्रास मान्य कराव्या लागतात; व त्याचे एक प्रकारचे कायदेशीर बंधन निर्माण होते. गुलामगिरीची तरी गोष्ट अशीच होती. 'बळी तो कान पिळी' या न्यायानें जो निर्बळ तो प्रबळाचा केवळ जुलमामुळे गुलाम झाला. असे होतां होतां त्या गुलामांचे धन्यांनी आपसांत विचार करून, एकमेकांच्या वित्ताचें संरक्षण व्हावें या हेतूनें, सर्वांचे सामर्थ्य एकवट करून, आपले गुलाम व आपली स्वामग्री मिळकत यांचा अपहार टाळण्या करितां कांहीं व्यवस्था किंवा ठराव केले. प्राचीन काळी पुरुषजातीपैकी बहुतेक व्यक्तीस व एकंदर स्त्रीजातीस याचप्रकारानें गुलामगिरी पतकरावी लागली. असा क्रम ज्या काळी चालू होता, त्या काळी उच्च प्रतीचें शिक्षण लोकांस मिळून लोक ज्ञानसंपन्न होते. अशीही युगाची युगें निघून गेली. तरीही या सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या दास्याची आवश्यकता किंवा यथार्थता काय आहे ह्मणून प्रश्न करण्याचें धाडस कोणास झाले नाही. तथापि, शेवटी अशा प्रकारचे विचारकर्ते लोक हळु हळु उत्पन्न झाले. आणि एकंदर लोकांची सुधारणा होतां होतां पुरुषजातीची गुलामगिरी निदान यूरोपखंडांतील सर्व ख्रिस्ती राष्ट्रांत सरतेशेवटीं अजीबात बंद झाली. स्त्रीजातीच्या गुलामगिरीचेंही रूपांतर होऊन त्यास नुसत्या पराधीनतेचें सौम्य स्वरूप प्राप्त झाले! परंतु, हा सौम्य पराधीनपणाचा प्रकार शुद्ध न्याय, बुद्धि, व लोकोपयुक्तता यांच्या कारणानें उत्पन्न झाला नसून, गुलामगिरीची जी पूर्वस्थिती तिच्या पासूनच उत्पन्न झाला आहे. इतकेंच की, एकंदर लोकांच्या रीतिभातीत ज्या कारणानें चांगल्या प्रकारचा बदल

झाला व माणसांचे परस्पर संबंध ज्या कारणांनी न्याय व भूतदया यांस अनुसरून बदलले, त्याच कारणांनी स्त्रियांच्या मूळ गुलामगिरीच्या स्थितीतही कालवशेंकरून हळु हळु फरक होत गेले. तथापि, आद्य-कालीं पशुसदृश असा जो त्याचा आरंभ, त्याचा संसर्ग **अजून आहेच.** यावरून या रूढीपासून **स्त्रियांच्या परवशते**ला अनुकूल असें प्रथमदर्शनीं कांहींच अनुमान काढितां येत नाहीं. कदाचित् असें ह्मणता येईल कीं, मूळ दूषित उगमापासून दुसऱ्या ज्या अनेक दुष्ट रूढि आजपर्यंत चालत आल्या, त्या सर्वांचा लय झाला असतां येवढीच रूढि ज्या अर्थीं अद्यापपर्यंत कायम राहिली, त्या अर्थीं हा प्रकार त्या रूढीस अनुकूल दिसतो, व याचमुळें साधारण लोकांना स्त्रीपुरुषांचे हक्क समसमान नाहींत या गोष्टीचें कारण 'बळी तो कान पिळी' हा न्याय आहे, असें सांगितलें ह्मणजे आश्चर्य वाटतें.

६. लोकांस या गोष्टीचें आश्चर्य वाटतें, ही गोष्टही एका अर्थीं अभिनंदनीय आहे. आणि ह्मणूनच सुधारणेचें पाऊल दिवसानुदिवस पुढें पडत असून, एकंदर मानवजाति सुधारत आहे असें मानिलें पाहिजे. जगातील अत्यंत सुधारलेल्या अशा एक दोन राष्ट्रांची प्रस्तुत अशी स्थिति आहे कीं, त्यांनी आपल्या एकंदर व्यवहारांत 'बळी तो कान पिळी' हा न्याय सोडून दिला आहे. तो कोणासच मान्य नसून मनुष्यांचे परस्पर[illegible] या तत्वाच्या जोरावर चालविण्याची व्यक्तिमा-[illegible]ास सक्त मनाई आहे. असें असून ज्या प्रसंगी 'बळी तो कान पिळी' [illegible] न्यायास अनुसरून एखादी गोष्ट करण्यास कोणी प्रवृत्त होतो, [illegible]व्हां त्यांत कांहीं तरी लोकहिताचा संबंध आहे, असा बहाणा करणें त्यास भाग पडतें. वस्तुस्थिति अशी असतां, लोक आपल्या मनाची अशी गोड समजूत करून घेतात कीं, ते जबरदस्तीचे दिवस आतां निघून गेले; व 'बळी तो कान पिळी' हा न्याय प्रस्तुतकाळीं

ज्या ज्या गोष्टी घडत आहेत त्यांत मुळीच राहिला नाहीं! त्यांना अ
वाटते की, आपल्या हल्लींच्या रीतिभातीस प्रथमतः आरंभ कसाह
झालेला असो, पण आजकाल जो सुधारलेला काळ, त्यांतहीं ज्य
अर्थी या रूढि चालू आहेत, त्या अर्थी त्या मनुष्यस्वभावास उचि
व लोकसमाजाच्या हितास कारणीभूत अशा आहेत, ह्मणूनच चा
राहिल्या आहेत ! ज्या रूढींनीं बलाढ्य पक्षाला सर्व अधिकार दि
आहे, अशा रूढींची दृढता व सजीवता किती असते; त्यास लो
कसे चिकटून राहतात; ज्यांच्या हातामध्ये अधिकार आहे त्यां
दुर्विचार व त्यांच्या दुष्ट मनोवृत्ति ते अधिकार आपल्या हातात टि
ण्याविषयी त्यांस कशा प्रवृत्त करितात; इतके असूनही या दुष्ट रू
कालेकरून एकामागून एक कशा नाश पावत जातात; शरीरब
असल्यामुळे ज्यांनी कायद्याचे बलही आपल्या पक्षास अनुकूल करू
घेतले आहे, अशा लोकांची सत्ता, त्यांच्या प्रतिपक्षास शरीरबळ प्रा
होईपर्यंत कशी नष्ट होत नाही, वगैरे गोष्टी त्यांस कळतच नाहीत
अशा प्रकारचे शरीरबळ स्त्रियांच्या पक्षास आजपर्यंत कधींच प्राप्त झा
नाहीं, ही गोष्ट व इतर पुष्कळ गोष्टी त्यांची स्थिति कायम ठेवण्या
कारणीभूत झाल्या. 'बळी तो कान पिळी' या न्यायाचा पूर्ण अंम
झाला नाहीं, ही गोष्ट जरी खरी आहे, तरी स्त्रियांच्या संबधाने
न्याय वर सांगितल्याप्रमाणे सर्वथा बंद होणे, स्त्रीजातीच्या नैस
दुर्बलतेमुळे प्रथमपासूनच अशक्य होते. दुसऱ्या रीतिभाती, न्याय
अनुसरून लोकांनी जशा बदलल्या, तसा केवळ बलावर अवलं
असलेला हा संबध बदलला नाही, ही गोष्टही अगदी सहज अ
लोकांचे कायदे व रीतिभाती यांच्या एकंदर प्रकारांत एवढीच गो
अपवादक राहिली. आणि जोपर्यंत तिचा खरा उगम लोकांस कळ
नाही व तिचे खरे स्वरूप वादविवादाने लोकांच्या स्पष्ट दृष्टोत्पत्तीस आ

नाही, तोपर्यंत लोकास ती गोष्ट प्रस्तुतच्या सुधारलेल्या स्थितीशी विलग दिसणारच नाही. प्राचीन **ग्रीक** लोक आपले राष्ट्र स्वतंत्र असे मानीत, व व्यक्तिमात्राच्या स्वतंत्रतेविषयी मोटा अभिमान बाळगीत. तथापि, त्या लोकात देखील गुलामांचा व्यापार चालू होताच.

७. वास्तविक स्थिति अशी आहे की, गेल्या दोन तीन पिढ्यांतील लोक व हल्लीच्या काळचे लोक, यास मानवी जातीची पूर्व स्थिति काय होती, व तिचे, पुढल्या काळच्या लोकांवर कसे परिणाम घडून आले, याचे मुळीच भान राहिले नाही. यामुळे, ज्या थोड्या लोकांस [illegible] यथार्थ ज्ञान असते ते, अथवा जे फार प्राचीन काळच्या मागमांच्या नमुन्याची माणसे ज्या देशांत अद्यापि जिवत आहेत, अशा देशांत प्रवास करून, व तेथील रीतिभाती पाहून आले आहेत, ते लोक मात्र पुरातन काळी लोकसमाजाची स्थिति कशी होती, तिची मनांत कल्पना करू शकतात. प्राचीन काळी 'बळी तो कान पिळी' हा न्याय सर्वत्र कसा चालत असे, व तो न्याय त्या वेळचे लोक उघड रीतीने व राजरोस कसा प्रकट करीत, हे हल्लीच्या लोकांच्या ध्यानांतच येत नाही. या न्यायांत कांही वैलक्षण्य आहे, किंवा लज्जा मानण्यासारखा कांही एक भाग आहे, असे त्या वेळच्या लोकास वाटत नसे, हे उघड आहे. कारण, त्या काळी स्त्रियांच्या दुःस्थितीची किंवा दासत्वाची कल्पना क्वचित् एखादा साधु किंवा तत्वज्ञानी याच्याशिवाय दुसऱ्या कोणाच्याही मनांत येण्याचा संभवच नव्हता. मनुष्यस्वभावाचा फार वाईट अनुभव इतिहासांती येतो. इतिहासावरून असे आढळते की, कोणत्याही लोकांचे जीव किंवा वित्त, अथवा त्यांचे संपूर्ण ऐहिक सुख, ही सर्व, त्यांच्या पराक्रमावर व शरीरबलावर अवलंबून असतात. ज्यांच्या हातांत शस्त्रे असतात अशा अधिकाऱ्यांनीं कितीही जुलूम केला, तरी लोकांस त्या अधिकाऱ्यांशी विरोध करण्याचें

महत् संकट वाटते. कारण, एक तर बलाचा कायदा त्यांस प्रतिकूळ असतो एवढेच नव्हे; तर, इतर सर्व कायदे व लोकसमाजाचें एकंदर मतही सर्वथा त्याच्या विरुद्ध असते. यास्तव ज्यांच्याशीं ते विरोध करीत, त्यांच्या दृष्टीने ते विरोध करणारे अपराधी ठरत. अपराधी ठरत एवढेच नव्हे, तर अत्यंत घोर पातक केल्याचा दोष त्यांजवर ठेवून, मानवीप्राण्याच्या हातून जितकी ह्मणून कडक शिक्षा देववेल तितकी कडक शिक्षा ते त्यांस देत. वरिष्ठ प्रतीच्या लोकांस कनिष्ठ प्रतीच्या लोकांचा एखादा हक्क मान्य करण्याचा प्रसंग आलाच, व अशा संबधानें आपल्या कर्तव्याची कांहींशी कल्पना त्यांच्या मनांत आलीच, तर ती, केवळ आपल्या सोईकरितां व कनिष्ठ प्रतीच्या लोकांस कांहीएक अभिवचन देण्याचे भाग पडले अशा संबंधानें येत असे. हीं अभिवचनें, आणाशपथा घेऊन दिलेली असली तरी, अत्यंत क्षुल्लक कारणावरून, किंवा एखाद्या अल्प लाभाच्या आशेनें, वरिष्ठ प्रतीच्या लोकांनी निःशंक मोडून टाकावी, असाही प्रकार बहुत कालपर्यंत चालला. तथापि, अशा प्रसंगीं अत्यंत नीच प्रकारच्या मनुष्याखेरीज इतर माणसांच्या सदसद्बुद्धीला धक्का बसल्याशिवाय ती अभिवचनें मोडली जात, असें क्वचितच होई. प्राचीनकाळची लोकसत्ताक राज्यें पूर्वीपासूनच एका प्रकारच्या परस्पर करारावर रचलेली असत; किंवा समानबल अशा कांही व्यक्तींची एक जूट होऊन ती झालेलीं असत. 'बळी तो कान पिळी,' या न्यायाखेरीज दुसरा कांही संबंध, किंवा दुसरें कांहीं बंधन ज्यांस आहे, अशा लोकांचे इतिहासांत हें पहिलेंच उदाहरण आढळते. आणि, यद्यपि 'बळी तो कान पिळी' हा पूर्वीचा न्याय, त्या राज्यांतील सत्ताधीश लोक व त्यांचे गुलाम, यांच्या परस्परसंबंधांत पूर्णपणें होता; तसेंच, मोठमोठीं लोकसत्ताक राज्ये, व त्यांची प्रजा, अथवा त्यांच्या ताब्यांतील इतर

लहान लहान लोकसत्ताक राज्यें, यांचा परस्परसंबंधही तशाच प्रकारचा होता; तथापि, मूळचा जबरदस्तीचा व निव्वळ जुलमाचा न्याय, अशा स्थितीत तेवढ्याच प्रदेशापुरता स्थानभ्रष्ट झाल्यामुळे, तेव्हांपासून मनुष्यस्वभावाच्या वास्तविक उन्नतीस आरंभ झाला, असें मानिलें पाहिजे. त्याचप्रमाणें मनुष्याच्या मनोवृत्तीत असा कांहीएक पालट पडला कीं, तो एकंदर लोकसमाजास अत्यंत हितावह असा झाला. तेव्हांपासून त्या उदात्त मनोवृत्तीचा प्रादुर्भाव होऊन पुढें हळूहळू त्यांचा विस्तार व त्यांची अभिवृद्धि होत गेली. दास अथवा गुलाम, हे जरी लोकसत्ताक राज्याचे अंशभूत नव्हते, तरी जी राज्यें स्वतंत्र असत, त्यांतच प्रथमतः गुलाम हे मनुष्यप्राणी आहेत, व त्यास मानवी प्राण्याचे हक्क आहेत, असें लोकास वाटूं लागलें. गुलामांस चांगल्या रीतीनें वागविणें हे आपलें कर्तव्यकर्म आहे, या [illegible] समावेश **यहुदी** लोकांच्या धर्मशास्त्रांत यद्यपि होऊन गेला होता तथापि हें तत्व प्रथमच ज्यांनीं लोकांना प्रसिद्धपणें शिकविलें ते **स्टोईक*** पंथाचे लोक होते, अशी माझी समजूत आहे. **ख्रिस्ती** धर्माचा बराच उत्कर्ष झाल्यानंतर, ही नीति किंवा हे मत बहुतेक सर्वमान्य झाल्यासारखें झालें होतें. आणि, **कॅथलिक** धर्माचा उदय झाल्यावर-सुद्धां या मताचे पुरस्कर्ते, किंवा त्याचा अभिमान धरणारे, कोणत्या एका कालीं नव्हते, असें कधींच घडलें नाहीं. वस्तुतः अशी स्थिति असतां, गुलामगिरी नीतिविरुद्ध आहे, किंवा गुलामांस त्यांच्या धन्यांनी ममतेने व नीतीनें वागविलें पाहिजे, हे मत अमलांत आण-

---

* स्टोइक या नांवाचा ग्रीक लोकांमध्ये एक तत्ववेत्त्यांचा पंथ होता. या पंथाचीं नीतिविषयक कांही ठरीव मतें असत. त्यांचें मुख्य मत असें होतें कीं, मनुष्यानें आत्मसंयमन करून आपले मनोविकार मारून टाकावे व इंद्रियदमन करावें. हें जग देवानें उत्पन्न केलें तें चांगलेंच केलें आहे व प्राणिमात्रांस सुखप्राप्ति व्हावी अशीच त्यांत योजना केली आहे, असें त्यांचें मत असे.

ण्यास **ख्रिस्ती** धर्मास मोठा भगीरथ प्रयत्न करावा लागला! **ख्रिस्ती** धर्म हें मत अमलांत आणण्याची खटपट करीत असतां, १००० वर्षाहून अधिक काळ लोटला. तरीही त्या खटपटींत त्यास ह्मणण्यासारखे यश आलें नाहीं. असें होण्याचें कारण लोकांच्या मनावर त्या धर्माचें वजन कमी होतें असें नाहीं. धर्माचें वजन तर विलक्षण होतें. **ख्रिस्ती** धर्माचा प्रभाव असा होता कीं, मोठमोठे राजे व संस्थानिक आपली अपार संपत्ति त्याच्या भरीस घालण्यास मुकाट्यानें राजी होत! आपल्या आत्म्यास मुक्ति मिळावी, या हेतूनें आपल्या भरज्वानीत, सर्व ऐहिक सुखांवर पाणी सोडून, दारिद्र्य व उपासमार सोसून, जपजाप्यादि कर्मे करण्याकरितां, **ख्रिस्ती** धर्मानें हजारो लोकास जोग घेण्यास लाऊन त्यास मठांत कोंडून टाकिलें! त्या धर्माचें सामर्थ्य असें अलौकिक होतें कीं, त्यानें **पालेस्टाईन** येथील पुण्यभूमींत असलेली जी पुण्यपुरुषाची समाध किंवा कबर, ती बंधमुक्त करावी व परकीयांच्या हातांतून सोडवावी, अशा उद्देशानें **यूरोपखंड** व **एशियाखंड** यांतील अफाट समुद्रांतून व जमिनींतून कोट्यावधि लोकांस पर्यटन करायास लाविलें, व आपल्या जीवांचे बळी अर्पण करण्यास प्रवृत्त केलें! त्या धर्माचें सामर्थ्य असें अनिवार्य होतें कीं, अत्यंत प्रीतिपात्र अशा आपल्या धर्मपत्न्या मोठमोठ्या सार्वभौम राजांस ही मुकाट्यानें सोडून द्याव्या लागल्या! कारण त्या सातव्या पिढीच्या आंतील संबंधाच्या ह्मणून धर्माध्यक्षांनीं त्याच्याशीं झालेला विवाहसंबंध अशास्त्र व निषिद्ध ठरविला.

यद्यपि **ख्रिस्ती**धर्माचा असा विलक्षण प्रभाव होता, तथापि परस्परांशीं कलह करण्याची व युद्ध करण्याची जी लोकांची प्रवृत्ति तिचा प्रतिबंध त्या धर्माच्यानें करवला नाहीं. अथवा, लोकांची आपल्या गुलामांशीं जी जुलुमाची व निर्दयपणाची वर्तणूक होती, तीही त्या धर्मास बंद करितां आली नाहीं. फौजफांट्याच्या जोरावर दुर्बल

व कमजोर राष्ट्रांस जिंकून त्यांस दास करणे, किंवा आपल्याच प्रजेस अन्यायाने व जुलमाने वागविणे, या दोन्ही गोष्टींचा प्रतिबंध त्याच्याने झाला नाही! असा हा प्रकार जोपर्यंत त्यांच्याही सत्तेपेक्षां बलाढ्य अशा सत्तेचा अमल झाला नाही, तोपर्यंत सुरू होता. राजे लोकांचे सामर्थ्य वाढत गेल्यामुळे, लोकांची परस्परयुद्ध करण्याची प्रवृत्ति बंद झाली, व फक्त राजाराजामधील, किंवा राज्यपदाविषयी स्पर्धा करणारे यांजमधील परस्परकलह मात्र चालू राहिले. ज्या शहराभोंवताली तटबंदी असे, अशा शहरांतील लोक धनसंपन्न व शौर्यशाली झाल्यामुळे, समरांगणी कनिष्ठ प्रतीचे पायदळ शिपाई, हे युद्धकलेमध्ये अडाणी अशा सरदारांपेक्षा अधिक सामर्थ्यवान ठरले. त्यामुळे, शेतकरी व सामान्य लोक यांजवर वरिष्ठ प्रतीच्या लोकांकडून, ह्मणजे सरदार व अमीर उमराव यांजकडून होत असलेला दुःसह जुलूम कांहीं अंशानें कमी झाला. तोही जुलूम पुढे कांही कालपर्यंत सुरू असून, पुढे जुलमानें त्रस्त झालेल्या लोकांस जेव्हां कांहीं अधिकार किंवा सामर्थ्य प्राप्त झाले तेव्हा, आपणावर जुलूम करणाऱ्या लोकांचा ते उघड रीतीनें सूड घेऊं लागले. हा जुलमाचा प्रकार **फ्रान्स** देशांतील प्रसिद्ध बंडाच्या काळापर्यंत बहुतेक **यूरोपखंड**भर चालूच होता. **इंग्लंड** देशांत मात्र लोकसत्ताक राज्याचा पाया लौकर स्थापिला गेल्यामुळे, हा प्रकार **यूरोपखंडां**तील इतर राष्ट्रांपेक्षां लौकर बंद झाला. या कारणानें व्यक्तिस्वातंत्र्य, कायदे, न्याय वगैरे गोष्टींमध्यें योग्य सुधारणा होत गेली.

८. मनुष्यजातीच्या उत्पत्तीपासून बहुत कालपर्यंत लोकांच्या साधारण व्यवहारांत बलात्काराचा कायदा, किंवा 'बळी तो कान पिळी' हाच न्याय बेधडक अमलांत आला. याहून अन्य प्रकारचा न्याय किंवा कायदा कांही प्रसंगविशेषी, किंवा विशेष प्रकारच्या संबं-

घांत मात्र दिसून येई. एकंदर समाजाच्या घडामोडी कांहीं तरी नीतितत्वास अनुसरून चालविण्याचा बहाणा लोक करू लागून, किती अल्पकाळ गेला आहे, वगैरे गोष्टींची माहिती लोकांस मुळींच नाहीं असें दिसतें. त्याचप्रमाणें, ज्या रूढि, विचारी व शहाण्या मनुष्यांनीं प्रथमारंभीं मुळीं स्थापून दिल्या नसल्या, किंवा प्रचारांत आणल्याच नसल्या, व ज्यांमध्यें बलात्काराच्या तत्वाखेरीज दुसरें कोणतेंच तत्व दिसत नाहीं, अशा रूढीही युगानुयुगें व पिढ्यानुपिढ्या तशाच चालू राहून लोकमान्य होतात, ही गोष्टही लोक अगदींच विसरून जातात. फार कशाला? ४० वर्षांपूर्वी आमच्या या इंग्लंड देशांतच मानवी प्राणी आपले गुलाम आहेत, असें कायदेशीर रीतीनें समजून, इतर मिळकतीप्रमाणें त्यांचा क्रयविक्रय करण्याचाही अधिकार लोकांस असे! चालू शतकांत प्रत्यक्ष मानवीप्राणी चोरून नेऊन व त्यांस दूर देशीं पळवून नेऊन त्यांच्याकडून मरेमरेपर्यंत काम करून घेण्याची मुभाही सरकारानें ठेविली आहे.*

बलात्काराच्या कायद्याचें हें अत्यंत उग्र स्वरूप ध्यानांत आणून वाचकांस मोठें नवल वाटेल. हें वर सांगितलेलें उदाहरण इतर सर्व उदाहरणांहून अत्यंत निंद्य असून नि[illegible]ने जे त्याचा विचार करतील, त्यांच्या अंगावर शहारे उठल्यावांचून खास राहणार नाहींत! कांहीं लोक असे आढळतात कीं, एक व्यक्तिस्वातंत्र्याखेरीज पूर्ण व अनियंत्रित सत्तेचे इतर सर्व प्रकार ज्यांस मान्य असतात, अशा लोकांसही वर सांगितलेलें उदाहरण भयंकर वाटेल. तथापि, ही वर निर्दिष्ट केलेली स्थिति थोड्याच दिवसांपूर्वी आमच्या

* विलायतेमध्यें पलटणीच्या किंवा आरमाराच्या नौकरीस जी माणसें लागत, त्यांस जुलमानें धरून परदेशांत नेण्याची चाल होती. त्यांस 'इम्प्रेसमेंट' असें ह्मणत. आपल्या देशांत देखील 'वेठ' ह्मणून जो एक जुलमाचा प्रकार होता व अजूनही जो बराच चालू आहे, तोही आमच्या वाचकांस माहीत असेलच.

सुधारलेल्या व **ख्रिस्ती** धर्माभिमानी **इंग्लंडांत** जारीने सुरू होती; व ती कायद्याने मंजूर केलेली होती, अशाविषयी साक्ष देणारी माणसें आजकालही जिवंत आहेत! इंग्रज लोकांनी वसाहत केलेल्या **अमेरिके-**च्या अर्ध्या भागापेक्षा अधिक भागांत ३।४ वर्षांपूर्वी* गुलामगिरी होती एवढेंच नव्हे; तर त्या राष्ट्रांत गुलामांचा व्यापार उघड रीतीनें चालत असे व व्यापाराच्या उद्देशानें गुलामांची वाढ करण्याचा एक मोठा कारखानाच चालू होता! अशी गोष्ट असता, गुलामांच्या व्यापाराविरुद्ध पुष्कळ लोकांचें मत होतें. **इंग्लंड** देशांत तर, 'बळी तो कान पिळी,' या न्यायास अनुसरून इतर जे अनेक प्रकार होते, त्यात हा गुलामगिरीचा प्रकार बहुमतानें निंद्य असा मानिला होता. कारण, गुलामांच्या व्यापाराचा उघड उघड हेतु द्रव्यप्राप्ति हा असल्यामुळे, त्यापासून ज्यांचा फायदा होई, अशा लोकांची संख्या देशांतील एकंदर लोकांच्या मानानें फारच थोडी होती. यामुळे, त्या गोष्टीशी ज्यांचा अर्थाअर्थी संबंध नव्हता, ते सर्व गुलामगिरीचा अत्यंत द्वेष करणारे होते. याहून मनावर अधिक स्पष्ट ठसा उत्पन्न करणारें दुसरें एखादें उदाहरण देण्याची गरज राहिली आहे, असें मला वाटत नाही; तथापि, दुसरें उदाहरण पाहिजेच असेल तर एकसत्तात्मक किंवा एकछत्री राज्याचें उदाहरण घ्या; तेंही विचार करण्यासारखें आहे. हल्ली **इंग्लंडांत** असें ठरीव मत होऊन गेलें आहे कीं, केवळ फौजफांट्याच्या जोरावर एकानेंच राज्य करणें ह्मणजे, एका मनुष्यानें देशांतील इतर सर्व माणसें आपल्या कबजांत ठेवण्यासारखें होय. एकसत्तात्मक राज्य हें 'बळी तो कान पिळी,' या न्यायाचेंच उदाहरण आहे, यापेक्षां दुसरी कांहीएक कल्पना करवत नाहीं. असें असून **इंग्लंडाशिवाय**

---

* मूळचा ग्रंथ इ. स. १८६९ साली प्रसिद्ध झाला ही गोष्ट वाचकांनी लक्षांत ठेवणें जरूर आहे.

**यूरोपां**तील इतर सर्व मोठमोठ्या राष्ट्रांत एकसत्तात्मक राज्याची रूढि अद्यापि चालू आहे! ती कांहीं ठिकाणीं बंद झाली असल्यास, बंद होऊन फार दिवस झाले नाहींत. प्रस्तुत काळीं सर्व प्रतीच्या लोकांत, एकसत्तात्मक राज्याला अनुकूल असे पुष्कळ लोक सांपडतात. सारांश, एकदां ठरलेली रूढि जरी सार्वत्रिक नसली, तरी तिचें सामर्थ्य वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें असतें. इतिहासांत ठिकठिकाणीं त्या रूढीच्या विरुद्ध रूढींचीं, ह्मणजे इतर राज्यपद्धतींचीं, उदाहरणें आढळतात. परंतु, तीं बहुधा अत्यंत पराक्रमी व भरभराटीस आलेल्या लोकांमध्येंच विशेषेंकरून आढळतात.

एकसत्तात्मक राज्याची गोष्ट कशी असते ती पहा. ज्याच्या हातीं अनियंत्रित सत्ता असते, अशी एकच व्यक्ति असते. ही व्यक्ति राजा होय. त्या सत्तेस वश असणारे, व ज्यांचें बरें वाईट त्या एका व्यक्तीवर अवलंबून असतें, अशीं बाकीचीं एकंदर माणसें असतात. त्यांस प्रजा अशी संज्ञा आहे. जो गादीवर बसलेला असतो, व पुढें ज्यास राज्यपद प्राप्त होण्याची आशा असते, त्यांच्याशिवाय बाकीच्या सर्व माणसांस ही संज्ञा, किंवा ही सत्तावशता, अर्थात् कमीपणा आणणारी असते. हीं वर सांगितलेलीं उदाहरणें, स्त्रियांवर पुरुषांची जी सत्ता असते, तिच्याहून किती भिन्न आहेत हें वाचकाच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे. यावरून, स्त्रियांच्या परवशतेच्या योग्यायोग्यतेविषयीं प्रथमच मी निर्णय करून टाकीत आहें, असें कोणी समजूं नये. तर, प्रस्तुत स्थळीं मी इतकेंच सिद्ध करून दाखविण्याचा यत्न करीत आहें कीं, ही पराधीनता, किंवा परवशता, जरी योग्य नसली, तरी स्वभावतःच ती बहुत दिवस टिकण्यासारखी असल्यामुळें, परवशतेचे वर सांगितलेले दुसरे अनेक प्रकार अल्पकालभंगुर, किंवा बहुत दिवस न [illegible] असूनही, ते आजकालपर्यंत चालत आले

आहेत. याहून अधिक माझे काही ह्मणणे नाही, किंवा याहून अधिक मी कांही सिद्ध केले नाही.

आपल्या हातामध्ये सत्ता असणे, अथवा दुसऱ्यांवर आपल्याला अधिकार चालवितां येणे, या गोष्टीचा अभिमान जात्याच मनुष्यास वाटत असतो. अधिकाराचा लोभ व अधिकाराची हौस जात्याच व्यक्तिमात्रास असते. हा नियम सर्वसाधारण झाला. प्रस्तुत अधिकाराची हाव एका जातीस किंवा एका वर्गास असते असेही नाही, तर ही हाव एकंदर पुरुषजातीस असते. **पार्लमेंटा**चे किंवा **म्युनिसिपालिटी**चे सभासद होऊ इच्छिणाऱ्या उमेदवारांचे कधी कधी असे ह्मणणे असते की, जी सत्ता, किंवा जो अधिकार, मिळविण्याचा यत्न आह्मी करितो आहो, तो आमच्या स्वतःच्या हिताकरिता आह्मास पाहिजे असे नाही; तर, केवळ राज्यकारणाकरिता, किंवा एकंदर समाजाच्या कल्याणाकरिता आह्मी हा अधिकार मिळविण्याचा यत्न करित आहो, ह्मणून लोकांनी तो आह्मास दिला पाहिजे. परंतु प्रस्तुत अधिकाराचे पुरस्कर्ते, ह्मणजे स्त्रियांवर सत्ता चालविणारे जे पुरुष त्यांची अशी गोष्ट नसते. प्रत्येक कुटुंबात जो कर्ता असतो, किंवा पुढे केव्हां तरी कर्ता होण्याची ज्याला आशा असते, अशा प्रत्येक पुरुषाला हा अधिकार आपल्याला असावा असे वाटते. एखादा भिकार लंगोट्या असो किंवा मोठा सरदार असो; राव असो किंवा रंक असो; फकीर असो किंवा अमीर असो; एवढी सत्ता आपली त्याच्या हातांत असावयाचीच! आणि ही सत्ता **अशी काही** चमत्कारिक आहे की, ती अमलांत आणण्याची इच्छा **फारच प्रबळ** असते. कारण, प्रत्येक मनुष्यास आपल्या हातांत सत्ता असावी असें तर वाटतेच. तथापि, ही सत्ता विशेषेकरून कोणावर चालवावयाची? तर ज्याशी आपला अति निकट संबंध; ज्याच्या सहवासांत आपलें **सर्व**

आयुष्य जाणार; ज्या माणसाशी आपल्या संसारांतील बहुतेक व्यवहार किंवा व्यवसाय आपण समाईकपणाने करणार; व जे माणूस आपल्या अधिकारास न जुमानून स्वतंत्रतेनें वागलें असतां, आपल्या एकट्याच्या खुषीप्रमाणे व मर्जीप्रमाणे कांहीएक होणार नाही आणि आपल्या जिवाला सुख लागणार नाही; अशा माणसावरच आपली सत्ता जारीनें चालवावी, असें बहुतेकांस वाटत असतें. सत्तेचे जे अनेक प्रकार वर सांगितले, त्यांत, ह्मणजे 'बळी तो कान पिळी,' या न्यायाचीं जीं अनेक उदाहरणें आह्मी वर दिलीं त्यांत, निव्वळ जुलमाचाच भाग जास्त होता. याशिवाय त्याच्या स्थिरतेला दुसरी कांही कारणे नव्हती. तरीही त्या सत्ता व तो जुलमाचा प्रकार नष्ट होण्यास दीर्घ काळ लागला व मोठमोठ्या अडचणी आल्या! मग पुरुषांची स्त्रियांवरील सत्ता नष्ट होण्याच्या कामांत अधिक अडचणी याव्या, यांत नवल ते काय?

दुसरा असा एक विचार केला पाहिजे कीं, प्रस्तुत प्रकरणांत ज्यांचे हातीं अधिकार आहे, त्यांस इतर गोष्टींपेक्षां विशेष साधनें अनुकूल असल्यामुळे त्यांच्याशीं विरोध करणें हे फार दुष्कर झाले आहे. जीं माणसे परवश असतात, त्यांतील प्रत्येक व्यक्ति स्वामिवर्गापैकी प्रत्येकाच्या नजरेखालीं असते; किंबहुना सर्वस्वी त्याच्या हस्तगत झालेली असते. आणि आपल्या स्वजातीपेक्षां धन्याशीच तिचा अधिक निकट संबंध असतो. यामुळे, त्याच्याशीं बंडाळी करण्याची साधनें मुळीच तिला अनुकूल नसतात. किंवा आपल्या धन्यावर कांही एक प्रकारचा पगडा बसविण्याचे सामर्थ्यही तिला नसते. उलट आपल्या धन्याची मर्जी संपादन करणे व त्याचा रोष टाळणे, हीच गोष्ट तिला जरूर साधावी लागते. राजकीय हक्क प्राप्त करून घेण्याच्या खटपटीत, पुढारी माणसे लांचाच्या योगानें, किंवा धमकावणीनें कशी वळविली जातात, हें प्रत्येकास ठाऊकच आहे. स्त्रियांच्या संबधानें पाहिले तर,

या परवश जनांपैकीं प्रत्येक व्यक्ति लांच व भीति या दोन्ही गोष्टींच्या तडाक्यात निरंतर सांपडून गेलेली असते. आपल्या स्वामीच्या विरुद्ध बंड करणें असेल तर, त्या कामातल्या पुढाऱ्यांपैकीं बहुतेक व्यक्तींनी (आणि विशेषतः ज्या पुढाऱ्यास अनुसरतील, त्यांनी) आपल्या स्वतःच्या हिताहिताचें व सुखदुःखाचें भान सर्वथा विसरलें पाहिजे. कधींकाळीं सत्ताधीश लोकांनीं जुलमानें वश करून टाकिलेल्या लोकांच्या मानेवर जबरदस्त जूं ठेवलें असल्याचें उदाहरण इतिहासात जर कोठें असेल तर, अगदीं तसाच प्रकार प्रस्तुत उदाहरणात आहे. स्त्रियांच्या परा- धीनतेचा हा प्रकार अत्यंत अन्यायाचा आहे, हें मी अजून सिद्ध केलें नाहीं. तथापि, या विषयावर विचार करण्यापुरता ज्यांचा अधिकार असेल, अशा प्रत्येक पुरुषाच्या ध्यानात ही गोष्ट येऊन चुकलीच असेल कीं, प्रस्तुत सत्तेचा प्रकार निव्वळ अन्यायाचा व जबरदस्तीचा आहे, अशी कल्पना क्षणभर केली तर, अन्यायाच्या अधिकाराचे जे इतर प्रकार वर सांगितले, त्यांपेक्षां हा प्रकार स्वभाविकरूनच फार दिवस टिकण्यासारखा आहे. आणि ज्या अर्थी, वर सांगितलेल्या प्रकारांपैकीं जे अतिनिंद्य प्रकार तेही पुष्कळ सुधारलेल्या देशातून अजून चालूच आहेत. व कांहीं कांहीं देशांत ते नुकतेच बंद पडले आहेत, त्या अर्थी, ज्या प्रकाराचें मूळ फार खोल गेलें आहे, व जो स्वभावतः फार दिवस टिकणारा असा आहे, त्याचा ह्मणण्यासारखा उच्छेद जर कोठें झाला असेल, तर ही एक आश्चर्य मानण्यासारखी गोष्ट समजावयाची! एवढी मात्र गोष्ट खरी कीं, मोठमोठ्या विद्वान व वजनदार लोकांनीं आपले अभिप्राय या प्रकाराविरुद्ध दिले आहेत, हेंच आश्चर्य आहे!

९. कांहीं लोक असा आक्षेप घेतील कीं, मी उदाहरणाकरितां ह्मणून जे वर अन्यायाचें प्रकार सांगितले त्यांत, व पुरुषांची स्त्रियांवर अस-

णारी सत्ता, यांत तुलना करितां येत नाही. कारण, ते प्रकार निव्वळ जुलमाचे परिणाम होते. आणि पुरुषांच्या सत्तेचा प्रकार हा तसा नसून तो अत्यंत स्वाभाविक आहे. परंतु असा विचार करा की, ज्याच्या हातामध्ये स्वामित्व आहे, त्यांस ते स्वाभाविक वाटलें नाही, अशी गोष्ट कधीकाळीं तरी घडली आहे काय? असा एक काळ होता की, त्या वेळेस लोकांनी माणसांचे दोन वर्ग केले होते. एक लहानसा वर्ग होता तो धन्याचा; व दुसरा मोठा एक वर्ग गुलामाचा! मनुष्यजातीचें हे वर्गीकरण अत्यंत विचारसंपन्न माणसासही स्वाभाविक वाटे! ज्यानें विद्याभांडारास भर घातली, ज्याची गणना मोठ्या पंडितांत व कुशाग्रबुद्धि पुरुषांमध्यें करितात, असा जो **आरिस्टॉटल्** त्यानें सुद्धां वर सांगितलेलें मनुष्यजातीचें वर्गीकरण निःशंक मान्य केलें! आणि त्या वर्गीकरणाचीं कारणें पाहिलीं तर, पुरुषांची सत्ता स्त्रियांवर असावी, अशा पक्षाचें समर्थन करणारी मंडळी जीं कारणें दाखवितात, तींच कारणें **आरिस्टॉटल्**ही दाखवी. त्याचें ह्मणणें असें होतें की, मानवजातींत भिन्न भिन्न प्रकृति आहेत. कांहीं प्रकृति स्वतंत्र आहेत व कांहीं परतंत्र आहेत. **ग्रीक**लोक हे स्वतंत्रप्रकृतिपैकीं असून, **थ्रेस** व **आशियाखंड** यातील रानटी लोक, परतंत्रप्रकृतीचे आहेत. ह्मणजे ते गुलाम होण्यासच पात्र आहेत. परंतु, **आरिस्टॉटल्**पर्यंत जाण्याची जरूरच नाहीं. **दक्षिण अमेरिकेतील** गुलामांचे मालक केवळ स्वतःच्या हितावर लक्ष देऊन, व आपल्या मनोविकारांस वश होऊन, आपलें कृत्य न्याय्य आहे, असें दाखविण्याकरितां, अशाच प्रकारचें प्रतिपादन करीत असत की नाहीं? काळ्या मनुष्यांवर गोऱ्या मनुष्यानें स्वामित्व करणें हेंच स्वाभाविक आहे. काळ्या जातीचे लोक स्वभावतःच स्वतंत्रतेविषयीं अपात्र आहेत. त्यांनी गोऱ्या माणसाचे गुलाम होऊन रहाणें, हेंच त्यांस सर्वथा योग्य व हितकर आहे; वगैरे गोष्टींची संपादणी करण्याकरितां, त्यांनीं आकाशपाताळ

एक केले नाही काय ?* फार कशाला ? त्याच्यापैकीं कांहीं कांहीं तर असे ह्मणणारे होते कीं शारीरिक श्रम करणाऱ्या मजूर वगैरे लोकास स्वातंत्र्य असणे ही गोष्ट, जगाच्या कोणत्याही भागात असली तरी, ती सृष्टीविरुद्ध होय !

याचप्रमाणे एकछत्री किंवा एकसत्तात्मक राज्याचा पक्ष घेऊन भांडणाऱ्या लोकांची स्थिति आहे. ते ह्मणतातः--"राज्यपद्धतींचा प्रकार काय तो एवढाच. तो फार प्राचीन काळापासून आला असून, समाजव्यवस्थेला अत्यंत उपयुक्त व आवश्यक आहे. कुटुंबास जसा बाप, तसा प्रजेस राजा. एकाच्याच हातांत सर्व अधिकार असणे, हीच स्थिति स्वभावसिद्ध आहे." असो, सारांश काय कीं, ज्यास लोकावर कसा तरी, पण आपला पगडा बसविण्याची व आपली सत्ता चालविण्याची हौस वाटते, त्यास दुसरी एखादी योग्य सबब सांगतां आली नाही, ह्मणजे 'बळी तो कान पिळी' हाच न्याय खरा व अत्यंत स्वाभाविक आहे, असे वाटू लागते. ज्यानीं दुसऱ्यास बाहुबलाने ह्मणा, अथवा कपटबलाने किंवा फितुराने ह्मणा, कोणत्या तरी बलाने जिंकिले आहे; तेही लोक असाच उपदेश करितात व असेच शास्त्र सांगत असतात कीं 'अहो! जिंकिलेल्या लोकानीं जिंकणाऱ्या लोकाचे नम्र सेवक व आज्ञाधारक गुलाम होऊन राहणे हेंच न्यायाचे आहे! ह्मणजे अर्थात् दुर्बळ, नामर्द, व कमकुवत, अशा लोकानीं परतंत्र राहिलं पाहिजे, हीच गोष्ट नीतीची आहे!'

* प्रस्तुत स्थळीं आमच्या वाचकांस '**इलबर्ट**' बिलाच्या वेळीं, '**ब्रान्सन**ादि'कांनीं व '**ऑग्लोइंडियन्**' मंडळींनीं अशाच प्रकारचे प्रतिपादन करून जे अकांडतांडव केलें व जी मोठी गर्दी उडवून दिली, त्या प्रसंगाचे स्मरण झाल्याखेरीज राहणार नाहीं ' यापेक्षां आह्मी प्रस्तुतस्थळीं अधिक कांहीं सांगत नाहीं, व अधिक सांगण्याचे प्रयोजनही दिसत नाहीं.

जो काल ‘ मिड्ल एजेस् ’ किंवा ‘ मध्ययुग ’ अशा नांवानें इतिहासांत * प्रसिद्ध आहे, त्या काळातील मनुष्यस्वभावाचें यत्किंचित् परिज्ञान ज्यास असेल, त्यास, उच्च प्रतीच्या लोकांनीं नीच प्रतीच्या लोकांवर स्वामित्व करावें, ही गोष्ट त्या लोकांस किती स्वाभाविक वाटत असे, व नीच प्रतीतील एखादा मनुष्य उच्च प्रतीच्या लोकांची बरोबरी करण्याची किंवा त्याजवर अधिकार चालविण्याची इच्छा करूं लागला तर, हें त्याचें करणें किती विलक्षण व सृष्टिविरुद्ध वाटे, हें चांगलें कळेल. जे लोक उच्च प्रतीच्या लोकांच्या आधीन असत, त्यांसही तसेंच वाटे. नीच मानिलेल्या जातींतील पुष्कळ लोकांनीं खटपटीअंतीं व कालेंकरून जरी बरेच हक्क मिळविले, तरी बरोबरीच्या अधिकाराचे विभागी होण्याविषयीं त्यांनीं कधींच मनांत आणिलें नाहीं. त्यांचा यत्न एवढ्याविषयींच होता कीं, आपणावर उच्च प्रतीच्या लोकांनीं जुलूम करूं नये, व त्यांच्या अधिकाराची कांहींएक मर्यादा ठरावी. तात्पर्य, ‘ सृष्टिविरुद्ध ’ किंवा ‘ स्वभावविरुद्ध ’ या शब्दाचा अर्थ बहुधा केवळ ‘ रूढिविरुद्ध ’ एवढाच असतो. जें जें एकदां पडलेल्या रूढीस, किंवा प्रचारास, अथवा चालू वहिवाटीस, अनुसरून असतें, तें तें माणसास स्वाभाविक असें वाटतें. ह्मणजे, सृष्टिविरुद्ध असें भासत नाहीं. स्त्रियांनीं पुरुषांचे कह्यांत राहण्याची चाल सर्वसाधारण असल्यामुळें, त्या चालीविरुद्ध एखादी गोष्ट करूं ह्मटल्यास लोकास सहजच ती सृष्टिविरुद्ध वाटते. परंतु, प्रस्तुत विषयाचे संबंधाची समजूत केवळ रूढीवर किती अवलंबून आहे, या गोष्टीचा आपणास पुष्कळ अनुभव येतो. पृथ्वीवरील दूरदूरचे भागावरील लोक,

* मिल्ल साहेबांचा हा निबंध चांगला समजण्यास वाचकानें जगाच्या इतिहासाचें ज्ञान बरेच करून घेतलें पाहिजे, ही गोष्ट प्रस्तुत निबंधांत ठिकठिकाणीं भिन्न भिन्न काळच्या इतिहासास उद्देशून जो उल्लेख केला आहे, त्यावरून उघड दिसेल.

प्रथमच जेव्हां **इंग्लंड** देशाची माहिती करून घेऊं लागतात, तेव्हां जर त्यांस कळलें, किंवा त्यांस कोणी सांगितलें की, **इंग्लंड** देशांत राणीचें राज्य आहे, ह्मणजे, हें राज्य स्त्रीसत्ताक आहे, तर त्यांस फारच आश्चर्य वाटतें; किंबहुना ती गोष्ट त्यांस इतकी चमत्कारिक व सृष्टिविरुद्ध वाटते कीं, तिजवर त्याचा सहसा भरंवसाच बसत नाहीं! असें असतां प्रत्यक्ष इंग्रज लोकांस त्यांत कांहींच चमत्कारिक किंवा सृष्टिविरुद्ध वाटत नाहीं. याचें कारण इतकेंच कीं, ती गोष्ट त्यांच्या सहवासांतली पडली. परंतु, त्याच इंग्रज लोकांस स्त्रियांनीं पलटणींत शिपाई होऊन रहाणें, किंवा पार्लमेंट सभेचे सभासद होण्याचा यत्न करणें, हें सृष्टिविरुद्ध वाटतें. याचेंही कारण एवढेंच कीं, त्या गोष्टीची त्यास सवय नाहीं. पुरातन काळची स्थिति याच्या अगदीं उलट होती. त्यावेळीं युद्धकला व राजकारस्थान या गोष्टींत स्त्रियांचा संबंध असणें, हें लोकांस सृष्टिविरुद्ध वाटत नसे. कारण, एकतर तो प्रचार त्या वेळेस सर्वमान्य असे, व उच्च प्रतीच्या लोकांच्या स्त्रियांनीं,—आपले वडील व आपले पति, यांची बरोबरी शरीरसामर्थ्याखेरीज इतर सर्व कामांतही करावी, अशी त्या वेळच्या लोकांची समजूत असे. **ग्रीक** लोकांच्या पुरातन दंतकथांमध्यें **आमेझॉन्** नांवाच्या युद्धकुशल स्त्रिया प्रसिद्ध असत. यामुळें व विशेषेंकरून **स्पार्टन्** लोकांच्या स्त्रियांचें प्रत्यक्ष उदाहरण त्यांच्या समोर असल्यामुळें स्त्रियांचें स्वातंत्र्य त्यांस विस्मयकारक, किंवा अलौकिक, असें वाटत नसे.*

---

* प्रस्तुत विषयाला उद्देशून आमचे इकडील जी माहिती आह्मांस मिळाली आहे, तिचाही आह्मी या स्थळीं संग्रह करितों

"**गार्गी**, **सुलभा**, व **मैत्रेयी** या विदुत्तेविषयीं प्राचीन इतिहासांत प्रसिद्ध आहेत. **वालीची** बायको **तारा** ही राज्यकारभारांत मोठी कुशळ होती. **वाली** मरणोन्मुख झाला असतां, त्यानें आपला भाऊ **सुग्रीव** यास सांगितलें की, 'तूं आपला राज्यकारभार **तारेच्या** अनुमोदनानें कर.' **कल्याणदेवी** ह्मणून एक प्रसिद्ध ग्रंथकर्त्री होती. **कुन्ती**,

त्याच कालच्या इतर राष्ट्रांची समजूत या पेक्षां कांहीं निराळी होती. **स्पार्टा** या संस्थानातील स्त्रिया इतर **ग्रीक** संस्थानापेक्षा [illegible] [illegible] दृष्टीनें परवश कमी होत्या. असें नाहीं. परंतु व्यवहार दृष्टीनें मात्र त्या तितक्या परवश नव्हत्या. आणि शारीरिक व्यायामानें, किंवा कसरतीनें, पुरुषांची शरीरें जशीं कसलेलीं असत, तशीच स्त्रियांचीही असल्यामुळें त्या शारीरिक पराक्रमाच्या कामीं पुरुषापेक्षा कमी नव्हत्या. ही गोष्ट त्या काळीं प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध होती. **ग्रीक** लोकामधील प्रसिद्ध पंडित जो **प्लेटो** त्याच्या इतर मतांपैकीं, व्यवहार व राज्यकारस्थान, या दोन संबंधांत, स्त्रीपुरुषांची बरोबरी आहे, असें जें मत होतें तें, एक **स्पार्टा** देशाच्या अनुभवावरून झालें असेल, यांत शंका नाहीं.

१०. आतां कोणी असें ह्मणेल कीं, पुरुषांची स्त्रियांवर जी सत्ता असते, ती इतर सत्ताहून निराळी असते. स्त्रियांवरील सत्ता ही जुल-

---

**द्रौपदी**, व **गांधारी** या स्त्रिया नीतिकुशल होत्या व राज्यकारभारांतही मोठ्या प्रवीण होत्या. त्या वेळचे पुरुष अशा स्त्रियांचा हरएक कामांत सल्लामसलत घेत असत, हे प्राचीन आर्यावर्ताच्या इतिहासावरून उघड दिसतें. **सीता** या नांवाची स्त्री **भोजराजाच्या** सभेंत कवयित्री होती **सुलभा** ही नेहमीं धर्मविषयावर राजा **जनक** याशीं संभाषण करीत असे, व तिनें **जनकाला** पुष्कळ धर्मविषयक गोष्टीही शिकविल्या. **चित्ररेखा** ही चित्रकामांत मोठी कुशल होती **मनसा** या नांवाची एक स्त्री वेदशास्त्र, व शिल्पशास्त्र, या दोन शास्त्रांत निष्णात होती, असें ह्मणतात **दशरथाची** पत्नि **कैकयी** ही सारथ्यांत निपुण असून, एका युद्धाचे प्रसंगीं सारथ्य करीत असतां, राजा **दशरथाचा** जीव मोठ्या शर्थीनें तिनें वांचविला. **कृष्णाची** बायको **सत्यभामा** ही युद्धकलेंत निपुण होती तिनें **नरकासुर** या नांवाच्या बलाढ्य शूरास मारिलें ही उदाहरणें प्राचीन इतिहासांतलीं झालीं अर्वाचीन इतिहासांत प्रसिद्ध **अहिल्याबाई** होळकरीण, **बायजाबाई** शिंदे, व **लक्ष्मीबाई**, ( **झांशीची राणी** ) ही उदाहरणें ताजीं असल्याकारणानें वाचकांच्या लक्षांत असतीलच."

ही माहिती आह्मी मद्रास येथील प्रसिद्ध विद्वान गृहस्थ मि **पी. चेन्सलराव** यांनीं **विजयानगरच्या** मुलींच्या शाळेंतील बक्षिस समारंभाचे वेळीं जें भाषण केलें, त्यांतून घेतली आहे. सदरहू भाषण १८८४ सालच्या **प्रोग्रेस** नांवाच्या मासिक पुस्तकांत दिलें आहे.

माची नसून त्यांनी ती स्वसंतोषानें व स्वेच्छेनें पत्करलेली असते. या सत्तेबद्दल प्रत्यक्ष स्त्रियांची कांहीं एक कुरकुर असते, असें नसून, ती त्यास कबूल असल्या सारखी असते. यावर माझें उत्तर असें आहे की एक तर, पुष्कळ स्त्रियांस पुरुषांची ही सत्ता मान्य नाहीं, कारण आपल्या लेखांच्या द्वारानें आपले विचार प्रसिद्ध करणाऱ्या स्त्रिया निपजूं लागल्यापासून आपल्या व्यावहारिक स्थितीविषयीं आपला असंतोष प्रगट करणाऱ्या स्त्रियांची संख्या दिवसानुदिवस अधिकाधिक वाढत जात आहे. आणि आलीकडे तर लोकविख्यात व बुद्धिमान अशा कांहीं स्त्रियांस पुढारी करून शेकडो स्त्रियांनी पार्लमेंट सभेस 'आपल्या सभाजांचे सभासद होण्याचा हक्क आह्मांस द्यावा.' ह्मणून अर्ज केला आहे. त्याचप्रमाणें पुरुषास जितकी विद्या देतात, व शाळांतून त्यास जे जे विषय शिकवितात तितकी विद्या व ते ते विषय आह्मांस शिकवावे, असेंही स्त्रियांचे ह्मणणें फार दिवसापासून चालू आहे. या दोन्हीं कामांत त्यांस बरेंच यशही आलें आहे. आजपर्यंत जे उद्योगधंदे करण्यास आह्मांस प्रतिबंध आहे, ते करण्याविषयीं आह्मांस मोकळीक असावी, असेंही पुष्कळ स्त्रियांचे ह्मणणें असून, त्याचाही पक्ष दिवसानुदिवस प्रबळ होत चालला आहे. **अमेरिका** खंडांतील **युनाइटेडस्टेट**समध्यें ज्याप्रमाणें स्त्रियांच्या नियतकालिक सभा भरतात, व स्त्रियांच्या हक्काविषयीं निरंतर खटपट चालविण्याकरितां एक मंडळी स्थापित झाली आहे; तसा प्रकार आमच्या या **इंग्लंड** देशामध्यें जरी नाहीं, तथापि स्त्रियांची ह्मणून एक मोठी सभा आमचे देशांत ( **इंग्लंडांत** ) स्थापित झाली असून, तिचा हेतु राज्यकारभारांत स्त्रियांस वांटा असावा असा आहे. **अमेरिका** व **इंग्लंड** या देशांतच स्त्रियांची परवशता दूर करण्याची खटपट स्त्रियांनी एक जुटीनें चालविली आहे असें नाहीं. तर, **फ्रान्स इटाली, स्वित्सर्लंड,** या देशांतही अशा प्रकारचीं उदाहरणें आढळ-

तात. शिवाय प्रसिद्धपणे कांहींएक खटपट न करितां, मनांतले मनांतच आपली महत्वाकांक्षा ज्यांनी दाबून ठेविली आहे, अशा स्त्रिया किती असतील, ही गोष्ट समजणे सर्वथा अशक्य आहे. परंतु, ही महत्वाकांक्षा स्त्रीजातीस अयोग्य आहे, असा दृढ ठसा स्त्रियांचे मनावर ठसविण्याचा भगीरथ प्रयत्न पुरुष न करते तर, पुष्कळ स्त्रियांनी महत्वाकांक्षा, किंवा उदात्त विचार, मनात आणिले असते, असे मानण्यास पुष्कळ प्रमाणे आढळतात.

दुसरी अशी एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे की, परवश आलेल्या अशा कोणत्याही लोकांनी पूर्ण स्वातंत्र्य एकदम मिळविण्याचा यत्न केला, असे मुळीच घडत नाहीं. आणि अशा प्रकारचे उदाहरण इतिहासातही कोठे आढळत नाहीं. जेव्हा **सायमन् डी मॉंट्फर्ड्***
याने पार्लमेंट सभेचे सभासद होण्यास सामान्य प्रतीच्या लोकांचे प्रतिनिधि

* **सायमन् डी मॉंट्फर्ड** हा, **जॉन्** राजाचा मुलगा **तिसरा हेन्री** याचे वेळी होऊन गेला. **तिसरा हेन्री** हा राजा थोडाबहुत आमचे बडोद्याचे माजी राजे **मल्हारराव** याचे सारखाच होता. भोळ्या व मूर्ख राजाजवळ बहुतकरून खुशामती लोक असतात, ही गोष्ट सर्व विश्रुतच आहे. या राजाचे वेळेस त्याचे भोवती लोभी, गर्विष्ठ, व दांडगया. अशा लोकांचा परिवार जमा होऊन रयतेची पायमल्ली होऊ लागली, राजाचे उधळेपणाविषयी लोक अतिशय कुरकुर करू लागले; व त्याचेविषयी लोकांचा द्वेष फारच वाढला. शेवटी त्या अशक्त राजापासून राज्य सोडवावे अशा हेतूनें **सायमन डी मांट्फर्ड** याने राज्य रीतीत फेरफार करावयाचा उद्योग आरंभिला. त्यास प्रजा अनुकूलच होती. खुद्द राजाची बहीण ही त्यास दिली होती. स्वत तो मोठा पराक्रमी व सुशील होता. पुष्कळ गोष्टी आपणास अनुकूल करून घेऊन, शेवटी, त्यानें मोठें बंड करण्याचा विचार केला. परंतु तो विचार प्रथम पार्लमेंट सभेत फुटला! तेथील सर्व सभासद युद्धार्थ सज्ज होऊन युद्धाच्या तयारीनें तेथें गेले होते. राजा तेथे गेला तेव्हां, त्यानें लोकांस विचारिलें की, तुमचे मनांत आहे तरी काय' तेव्हां त्या लोकांनी नम्रपणाने उत्तर दिले की, 'आम्ही जीं दुःख भोगीत आहों तीं आपण दूर करावी; आणि मग आपण सुखानें राज्यकारभार चालवावा, असें आमचे मनांत आहे' राजाचा स्वभाव असा होता की, जे कोणी कांहीं मागेल ते देण्यास त्यानें 'होय' ह्मणावे. या स्वभावास अनुसरून राजा ह्मणाला कांहीं चिंता

बोलाविले, त्या वेळेस लोकांनी निवडलेल्या प्रतिनिधींच्या सभेनें राज्यांतील मोठमोठे कारभारी नेमावे व ते पाहिजे तेव्हां काढून टाकावे; राज्यकारभार चालवीत असतां राजावरही हुकमत चालवावी, अशा प्रकारचे हक्क मागण्याचें त्यांच्यापैकीं कोणाच्या तरी स्वप्नीं आलें असेल काय? त्याच्यापैकीं ज्याच्या आशेची उडी फारच मोठी असेल, त्याच्याही स्वप्नीं अशी गोष्ट आली नसेल. सरदार मंडळीच्या उड्या तर फारच मोठमोठ्या होत्या. परंतु साधारण लोकांचें ह्मणणें इतकेंच होतें कीं, राजास पाहिजे तसा व पाहिजे तितका कर बसविण्याचा हक्क नसावा, आणि राजाच्या ताबेदारींतल्या लोकांचा व सरकारी कामदाराचा प्रजेवर जो विलक्षण जुलूम होत असे तो बंद व्हावा. राज्यनीतीच्या संबंधानें सृष्टींत असा एक नियम दृष्टीस पडतो कीं, जे लोक पूर्वापार चालत आलेल्या सत्तेच्या अधीन झालेले असतात, ते प्रत्यक्ष त्या सत्तेबद्दल प्रथम कुरकुर करीत नाहींत. तर फक्त त्या सत्तेचा दुरुपयोग किंवा जुलमी अमल होऊ नये, एवढेंच त्यांचें ह्मणणें असतें. याच नियमास अनुसरून आपले पति आपणास वाईट रीतीनें वागवितात—तसें त्यांनीं वागवूं नये—असें ह्मणणाऱ्या स्त्रियाही पुष्कळ आढळतात. जर स्त्रियांच्या या ह्मणण्यानें, किंवा कुरकुरीनें पुरुष अधिक खवळून जाऊन व हट्टास पेटून त्यांचा अधिक छळ न करते तर, आपलें दुःख प्रत्यक्षपणें बोलून दाखविणाऱ्या स्त्रियांची संख्या, आहे यापेक्षां खचित बरीच अधिक दृष्टीस पडली असती. अधिक कुरकुरीचा परिणाम बहुधा अधिक वाईट रीतीनें वागविणें, असाच होत असतो! यामुळें, नेहमीं असा चमत्कार घडतो कीं, स्त्रियांवरील पुरु-

---

नाहीं, ज्या रीतीनें तुमचें कल्याण होईल त्या रीतीनें मी वागेन येणे प्रमाणे पार्लमेंटाच्या इतिहासाचा आरंभ आहे. हा आरंभ १३ वे शतकांत झाला. ह्मणजे, प्रस्तुत आपण पार्लमेंट सभेचें जें स्वरूप पहातो त्यांत व मूळच्यांत ७०० वर्षांजवळ अंतर आहे, हें वाचकांचे ध्यानांत येईलच.

पाची सत्ता कायम ठेवून केवळ त्या सत्तेचा दुरुपयोग पुरुषांनी न करावा, एतदर्थ केलेले सर्व यत्न निष्फळ होतात, व स्त्रियांचे संरक्षण होत नाही. अगदी लहान मुलें खेरीज करून इतर सर्वत्र व्यवहार असा आढळतो की, न्यायासनापुढे एका दुष्ट अपराध्याने एखाद्या मनुष्यप्राण्यास दुखापत केली आहे असें एकदां सिद्ध झालें, ह्मणजे तो मनुष्यप्राणी त्याच दुष्टाच्या ताब्यांत पुनः देणें, ही गोष्ट सहसा घडत नाही. परंतु, स्त्रियांच्या संबंधांत मात्र ही गोष्ट नेहमी घडते ! पुरुषाने आपल्या बायकोचे कितीही हाल केले, व तिला कशाही दीर्घ यातना सोसावयास लाविलें, तरी ती बिचारी आपल्या संरक्षणार्थ केलेल्या कायद्याचा उपयोग करून घेण्यास बहुधा धजत नाही ! अनिवार अशा रागाच्या भरांत ह्मणा, किंवा शेजाऱ्या पाजाऱ्याच्या सल्लामसलतीनें ह्मणा, जरी तिनें न्यायाची कचेरी पाहिली, तरी शेवटीं आपली खरी हकीगत न्यायाधिकाऱ्यापासून जितकी छपवितां येईल तितकी ती छप विते व आपल्या नवऱ्याच्या अपराधांवर जितकें पांघरूण घालितां येईल तितकें घालण्याचा ती यत्न करिते ! फार काय, कधी कधी असा चमत्कार घडतो की, आपल्या छलकर्त्यास योग्य शिक्षेपासून मुक्त करण्याकरितां ती न्यायाधिकाऱ्याच्या विनवण्याही करिते ! *

* प्रस्तुत प्रसंगीं तारीख १८ माहे आगष्ट सन १८८४ इसवीच्या इंदुप्रकाश पत्रांत प्रसिद्ध झालेली एक गोष्ट आह्मास आठवत आहे, तिचा उतारा आह्मी येथें देतोः—

"असें ऐकतों की, सात आठ दिवसांपूर्वी येथील एक विद्वान् ब्राह्मण वेश्येच्या नादीं लागून, आपल्या तेरा चौदा वर्षांच्या अल्पवयी निरपराधी बायकोस स्मशानभूमीतील एका खाड्यांत गळ्यापर्यंत पुरून आपण वर कांटे घालून निघून गेला ! दुसऱ्या दिवशीं लोकांनी तशीच तिला काढून पोलिसच्या हस्तगत केली. परंतु, जबानीत त्या साध्वी बाईनें सांगितलें की, 'मी नवऱ्यासमागमें स्मशानीं गेलें खरी, परंतु तेथें नवऱ्याची माझी चुकामुक होऊन, मी एका खाड्यांत गळ्यापर्यंत पडलें. मला पुरिलें नाहीं' तेव्हां त्या विद्वान् नवऱ्याचा जामीन घेऊन त्यास सोडून दिलें होतें. त्यास सांप्रत अजिबात खुलें करण्यांत आलें."

११. स्त्रिया पुरुषांविषयीं एका जुटीनें गिल्ला करीत नाहींत याचीं कांहीं स्वाभाविक व कांहीं लौकिक अशीं अनेक कारणें आहेत. तीं अशीः- ज्यांस परवशता प्राप्त झाली आहे अशा मनुष्यांच्या स्थितीत व स्त्रियांच्या स्थितींत फार अंतर आहे. स्त्रियांच्या मालकांस, स्त्रियां पासून सेवा करून घ्यावी, व त्यांनी आपल्या पूर्ण आज्ञेत असावें इतकेंच पुरें होत नाहीं, तर, त्यांचे मनोधर्मही आपल्या स्वाधीन असावे असें त्यांस वाटतें. जो पुरुष केवळ पशुतुल्य असेल त्याची गोष्ट सोडून द्या. परंतु, बाकीच्या बहुतेक पुरुषांस आपल्याशीं जिचा अति निकट संबंध आहे अशी आपली स्त्री, केवळ निरुपायामुळें किंवा बलात्कारास्तव झालेली दासी असावी, अशी कल्पना रुचतच नाहीं. 'महाराज! मी स्वेच्छेनें, व आपखुषीनें आपली अगदीं मर्जीतली दासी झाले आहे' असें तिनें ह्मटलें पाहिजे! आणि तरच या बोवांस सोळा आणे संतोष होत असतो!

अशा हेतूनें स्त्रिया जितक्या अज्ञान व असंस्कृत ठेवितां येतील, तितक्या ठेवण्याचा यत्न आजपर्यंत पुरुषांनी केला. गुलामांनी आपल्या आज्ञेत रहावें ह्मणून, इतर गुलामांचे मालक, मुख्यत्वेंकरून भीतीचा उपयोग करितात. ही भीती एक खुद्द मालकाची, किंवा धर्माची. स्त्रियांच्या मालकांस केवळ आज्ञाधारकता एवढाच गुण बस्स न होऊन आपला हेतु सिद्ध करण्याकरितां, स्त्रियांच्या एकंदर शिक्षणाचा ओघच त्यांनी वळवून टाकिला! स्त्रियांची वागणूक ह्मणजे, पुरुषांच्या वागणुकीहून अगदीं भिन्न असली पाहिजे, अशी समजूत अगदीं बाळपणापासूनच सर्व स्त्रियांची ते करून देतात.--स्वेच्छाचारित्व व आत्मसंयमन किंवा स्वावलंबन, हा गुण बायकांच्या जातीस शोभत नाहीं; बायकांच्या जातीस निरंतर परतंत्रता व दुसरा सांगेल तसें वागणें, हीच गोष्ट शोभते—असें स्त्रियांच्या मनांत पक्के बिंबविण्याचा

यत्न पुरुष करितात. धर्मशास्त्रे, लोकव्यवहार, लोकविचार, इत्यादि-कही स्त्रियांस असाच उपदेश करीत असतात. तो असा की, बाय कांचा जन्म दुसऱ्यांकरितां आहे, स्त्रीच्या जातीने नेहमी पुरुषांच्या अधीन असावे, व पुरुषाच्या आज्ञेत राहावे.*

या संबंधाने विशेष गोष्टी ध्यानात आणण्यासारख्या आहेत. त्या ह्या:---पहिली, स्त्रिया व पुरुष यामधील स्वाभाविक अन्योन्याकर्षण. दुसरी, आपल्या पतीवर स्त्रिया सर्वस्वी अवलंबून असतात. ह्मणजे, तिचा मानापमान किंवा तिचे सुखदुःख तिच्या पतीच्या इच्छेवर अव लंबून असते. तिसरी, तिच्या जन्माचे साफल्य होणे, संसारात तिची मानमान्यता वाढणे, व जगांत लौकिक संपादन करणे या गोष्टींची जी साधने असतात, ती सर्व तिला प्रायः नवऱ्याच्याच योगाने प्राप्त होण्या-सारखी असतात. अन्यद्वाराने होण्यासारखी नसतात. या तीन गोष्टींचा योग्य विचार केला असतां स्त्रियांच्या एकंदर शिक्षणाचा व वागणुकीचा मुख्य हेतु--पुरुषांनी आपणास चांगले ह्मणावे, 'येन केन प्रकारेण' पुरुषाची मर्जी आपणावर सुप्रसन्न रहावी--येवढाच होऊन बसला, या गोष्टीचे आपणास मुळीच आश्चर्य वाटणार नाही.

वर सांगितल्याप्रमाणे पुरुषानी स्त्रियांच्या मनांवर एक प्रकारचा ठसा बठविण्याचे किंवा पगडा बसविण्याचे बलवत्तर साधन प्राप्त करून

* आमच्या धर्मशास्त्रांतही 'रक्षेत् कन्यां पिता विन्नां पतिः पुत्रास्तु वार्धके। अभावे ज्ञातयस्तेषां न स्वातन्त्र्य क्वचित् स्त्रियः' असे याज्ञवल्क्यांचे एक प्रसिद्ध वचन आहे. त्याचा भावार्थ असा --'स्त्रीने लहान असतां बापाच्या स्वाधीन असावे, मोठी होऊन लग्न झाल्यावर नवऱ्याच्या स्वाधीन रहावें, नवरा मेला तर पुत्राच्या स्वाधीन; साराश, स्त्रीजातीला स्वातंत्र्य कधीच योग्य नाही।' स्त्रियांचे मनोविकार (विशेष करून कामेच्छा) फार तीव्र असतात; अशा अभिप्रायाची 'स्त्रीयन्त्र केन सृष्ट' इत्यादि विधाने व वचनें ही भारुड ग्रंथांतून बहुत आढळतात आणि आजकालसुद्धां पुष्कळ पुरुषाची समजूत तशीच असावी, ही शोचनीय गोष्ट आमच्या वाचकांस माहीत नसेल असे नाही।

'जे स्वामीचिये सत्ता। वीण असों नेणे पतिव्रता' असा ज्ञानेश्वरांनी 'अमृतानुभवां'त दृष्टांत दिला आहे (प्र. १. ओ. २०)

घेतल्यामुळे, त्यांच्या या स्वार्थपरायणतेचा किंवा अप्पलपोटेपणाचा असा परिणाम झाला की, ज्या व्यवस्थेनें स्त्रिया सर्वथा पुरुषांच्या अधीन राहतील, ती व्यवस्था पाहिजे ते करून त्यांनीं अखेरीस अमलांत आणिली. नम्रता, परवशता व पातिव्रत्य, इत्यादि गुण स्त्रियात असावे; सर्वथा पतीच्या इच्छेप्रमाणें वागणें हाच स्त्रियांचा मुख्य धर्म व हेंच स्त्रियाचें भूषण होय; अशा प्रकारचा उपदेश शास्त्र कर्त्यांनींही केला.* वर निर्दिष्ट केलेले दास्याचे जे इतर प्रकार बंद झाले, ते लोकांच्या प्रयत्नांनीं झाले. ज्या साधनाच्या योगानें पुरुषांनीं स्त्रियांस पारतंत्र्यात ठेविलें तींच साधनें जर वर निर्दिष्ट केलेल्या दास्याच्या प्रकारास अनुकूल असतीं व त्या साधनांचा उपयोग तित क्याच प्रयत्नानें करण्यात आला असता, तर ते प्रकारही आजतागा-यत तसेच चालू राहिले असते. आपल्या स्वामीची मर्जी संपादन करणें, हेंच आपल्या जीविताचें मुख्य कर्तव्यकर्म आहे, असें जर प्रत्येक तरुण **प्लेबियन्**† वर्गातील मनुष्याला शिकवून ठेविलें असतें; आपल्या धन्यानें आपणांस आपल्या कुटुंबापैकीं समजावें, आपल्या स्वामीच्या पूर्ण प्रीतींतले होऊन राहावें, हेंच उत्तम बक्षीस सर्व तरुण **प्लेबियनांस** प्राप्त होईल व विशेषेकरून त्यांत जे अत्यन्त बुद्धिमान अस-तील व महत्वाकांक्षी असतील त्यांसच हें मोठें बक्षिस मिळेल अशी

* प्रस्तुतस्थळीं **सावित्रीचें** आख्यान ध्यानांत आणण्यासारिखें आहे.

† **रोमशहराच्या** प्राचीन इतिहासांत **प्याट्रिशियन्** ( महाजन ) आणि **प्लेबियन्** ( सामान्यजन ) असे दोन प्रकारचे लोक होते. या दोन जातींमध्यें नेहमीं द्वंद्वभाव असे. या नावावरून दुसऱ्या कोणत्याही देशांतील वरिष्ठ व कनिष्ठ प्रतीच्या लोकांस तींच विशेषणें देतात. '**शेक्सपियरच्या कोरिओलेनस्**' नांवाच्या ऐतिहासिक नाट-कांत वरील दोन प्रकारच्या लोकांचें चित्र चांगलें काढिलें आहे. **इंग्लंडच्या** जुन्या इति-हासांत **लॉर्ड** किंवा **सिनोर** व **सर्फ**, वैदिक कालांत **आर्य** व **अनार्य**, किंवा त्याच्या पुढच्या कालीं **ब्राह्मण** व **शूद्र**, किंवा आजकाल **गौरकाय** व **कृष्णकाय**, ऊर्फ **यूरो-पियन** व **नेटीव** अशा प्रकारचा हा भेद पूर्वापार चालत आलेला आहे.

अभिवचनें देण्यात आलीं असतीं; आणि असें जें बक्षिस तें त्या **प्लेबियनांस** प्राप्त झाल्यावर आपल्या धन्याच्या इच्छा, आपल्या धन्याचा स्वार्थ व त्याच्या समजुती यांच्या बाहेर एक पाऊल देखिल टाकावयाचें नाहीं, असा प्रतिबंध त्यास असता तर पुरुष व स्त्रिया यांजमध्यें जो स्थूळ भेद आजकाल आपल्या दृष्टीस पडतो [illegible] **प्लेबियन्** व **प्याट्रिशियन्**, **सर्फ** व **सिंयोर**, यांतही दृष्टीस पडला असता. आणि अत्यंत विचारी अशा एखाद्या मनुष्याशिवाय बहुतेक लोकास हा भेद मानवी गोष्टींत अत्यंत स्वाभाविक व अपरिहार्य असा खचीतच वाटला असता.

१२. या वर सांगितलेल्या गोष्टींवरून इतकें स्पष्ट दिसून येईल कीं, कोणताही सार्वत्रिक प्रचार किंवा कोणतीही सर्वमान्य रूढि, कितीही सार्वत्रिक किंवा सर्वमान्य असली तरी, तेवढ्यावरून सामाजिक व राजकीय संबंधानें स्त्रियांनीं पुरुषांच्या अधीन असावें, अशी जी व्यवस्था, ती अवश्य व उपयुक्त आहे, असें सिद्ध होत नाहीं. इतकेंच नव्हे तर, मी याच्याही पुढें जाऊन असें प्रतिपादन करितों कीं, इतिहासक्रम व मानवजातीची दिवसानुदिवस पुढें पाऊल टाकण्याची जी प्रवृत्ति दिसते, याचा विचार केला असता, स्त्रिया व पुरुष यांच्या संबंधानें अधिकारवैषम्याची जी पद्धति आपण पहात आहों, तिला अनुकूल असें त्यांत कांहींच आढळत नाहीं. आजपर्यंत मनुष्यजातीचा क्रम पाहिला असता व अर्वाचीन लोकांच्या विचाराचा ओघ ध्यानांत आणिला असता, असें स्पष्ट अनुमान निघतें कीं. स्त्रियांच्या परवशतेचें हें अवशिष्ट राहिलेलें खूळ, इतर जुनीं खुळें जशीं एकामागून एक लयास गेलीं, तसें लयास गेलें पाहिजे. कारण, दिवसानुदिवस येणारा जो काल त्या कालास तें अगदीं विशोभित व विसंगत दिसूं लागलें आहे.

१३. असें पहा की, पूर्वीच्या व प्रस्तुतच्या कालात मोठा भेद तो कोणता ?—ह्मणजे, जो काल निघून गेला त्या कालातील रूढि, लोकव्यवस्था, व जीवनक्रम यात व प्रस्तुत कालांतील रूढि, लोकव्यवस्था, व जीवनक्रम यामध्ये मुख्य भेद कोणता ? माझ्या मतानें मुख्य भेद असा आहे की, मानवीप्राणी ज्या स्थितीत जन्म पावतात, त्या स्थितीतच शेवटपर्यंत त्यांनी राहिलें पाहिजे, असा प्रकार आजकाल राहिला नाहीं. तर, ज्या कामांत ज्याची बुद्धि चांगली चालेल, त्यानें ते काम निःसंशय करावें. आणि, त्यास जी जी साधनें अनुकूल असतील, त्या त्या साधनांचा उपयोग करून घेऊन, आपल्या मर्जीप्रमाणें आपल्या स्थितीत पाहिजे ती सुधारणा करण्यास आजकाल जो तो पूर्ण मालक आहे. प्राचीन काळी लोकसमाजाची स्थिति याहून कांहीं निराळ्याच पद्धतीची होती. ह्मणजे, त्यातील तत्व काहीं निराळेंच होते. एकदर मानवप्राणी समाजात काहीं ठरीव स्थितीत रहात. ह्मणजे, ज्या जातीत व ज्या कुलात ते जन्म पावत, त्याच जातीत व त्याच कुळांत अथवा त्याच स्थितीत रहाणें त्यास भाग पडे. जर कोणी आपली स्थिति सुधारण्याचा किंवा आपली मूळची जागा सोडण्याचा यत्न केला, तर तसें करण्यास त्यास शास्त्राचा निषेध असे व रूढि प्रतिबंध करी. आपली स्थिति सुधारण्याची साधनें त्यास दुर्लभ असत. माणसांत जशी काहीं माणसें गोरी निपजतात व कांहीं माणसें काळी निपजतात, त्याचप्रमाणें तेव्हांच्या लोकाचीही समजूतच अशी असे की, कांहीं प्राण्यांस गुलामाचा किंवा दासाचा जन्म प्राप्त होतो व कांहींस नागरिकाचा, ह्मणजे स्वतंत्रतेनें वागणाऱ्या माणसाचा, जन्म प्राप्त होतो. कांहीं **प्याट्रिशियन्*** (श्रेष्ठ वर्णातील) जातीच्या जन्मास येतात. कांहीं

* आमच्या देशात पूर्वीपासून आजपर्यंत बहुतेक **असाच** प्रकार चालू आहे **असें** ह्मटलें तरी चालेल. **ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र**, ही वर्णव्यवस्था फार प्राचीनकाळीं, ह्मणजे **ऋग्वेदाचे** काळीं, नव्हती असें दिसतें. होती असें ह्मणणारास **ऋग्वेदां**-

प्लेबियन्‌च्या ( कनिष्ठ किंवा नीच वर्णांतील ) जन्मास येतात; व कांहीं महाजनाच्या जन्मास येतात व कांहीं सामान्य जनाच्या जन्मास येतात. जो दासकुलांत किंवा गुलामाच्या जन्मास आला असेल, त्यास स्वातंत्र्य प्राप्त करून घेतां येत नसे. निदान आपल्या धन्याच्या मर्जीखेरीज त्यास स्वतंत्रता प्राप्त होत नसे. आणि ही स्थिति युरोपांतील बहुतेक देशांत मध्ययुगाच्या ( मिडल् एजेस् ) अखेरपर्यंत, कायमच होती. पुढे राजसत्तेच्या अभिवृद्धीमुळे, सामान्य जनास किंवा कनिष्ठ प्रतीच्या लोकास श्रेष्ठपद, किंवा सरदाराची स्थिति, प्राप्त होत गेली. बहुत कालपर्यंत सरदारांत किंवा श्रेष्ठ प्रतीच्या लोकांत अशी एक चाल असे कीं, वडिलोपार्जित सर्व मिळकतीचा वारस वडील मुलगाच होत

तील मंत्रांपैकीं पुरुषसूक्त म्हणून जो मंत्र आहे, त्याचाच मुख्य आधार दाखवितात. याशिवाय इतर मंत्रांत फारसा आधार सांपडत नाहीं. त्याकाळीं प्याट्रिशियन व प्लेबियन् यांच सारखीं दोन प्रकारचीं माणसें होतीं आर्य व अनार्य, अर्थात् उच्च वर्णांतील व नीच वर्णांतील, किंवा श्रेष्ठ जातींतील व कनिष्ठ जातींतील. सुर व असुर या शब्दासही अशाच प्रकारचा अर्थ पुढे प्राप्त झाला. आर्य लोक एशियाच्या मध्यभागांतून येऊन नवीन प्रांत काबीज करून उत्तरहिंदुस्थानांत ठिकठिकाणीं त्यांनीं वसाहती केल्या. त्यावेळेस जे प्रांत त्यांनीं जिंकिले, त्यांतील लोक त्यांनी आपले दास करून सोडिले. हा प्रकार, वुइल्यम् दि कांकरर हा जसा इंग्लंडामध्यें येऊन त्यानें काबीज केलेल्या प्रांतामधील लोकांस दास केलें, तशाच सारखा झाला. बहुतेक सर्व हक्क 'आर्यांस' असून 'अनार्य' किंवा 'काळे' म्हणून मानिलेल्या लोकांस फारच थोडे हक्क असत. तात्पर्य, हा प्रकार बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांच्या प्राचीन इतिहासांतून आढळतो. तथापि, या संबधानें आमच्या देशाच्या इतिहासास उद्देशून येथें एक गोष्ट आनंदक अशी सांगण्यासारखी आहे. ती ही कीं, नीच वर्णाच्या मनुष्यासही आपल्या बुद्धिसामर्थ्यानें व स्वपराक्रमानें किंवा भक्तिबलानें उच्च वर्णांत येतां येत असे वाल्मीकि ऋषि हा वाल्या या नावाचा कोळी होता, प्रसिद्ध पुराणकर्ता व्यास याची ही आई कोळीण होती. विदुर हा दासीपुत्र होता; अशीं उदाहरणें पुराणांतून, म्हणजे प्राचीन इतिहासांतून आणखी बरींच आढळतील. अर्वाचीन काळाचा विचार करितां तुकाराम बोवा हे जातीचे शूद्रच होते; नामदेव शिंपी होता; रोहिदास चांभार होता; कबीर हा तर यवन होता अशीं पुष्कळ उदाहरणें देतां येतील.

असे. आपला वडील मुलगा आपला वारस नाही, असे ठरविण्याचा व आपल्या मर्जीप्रमाणे आपल्या मिळकतीची व्यवस्था करण्याचा हक्क बापास प्राप्त होण्यास फार कालावधि लागला.

हुन्नर करणारे व धंदे करणारे लोकात **गिल्ड*** ह्मणून एक प्रकार असे, त्यात जे जन्म पावतील, किंवा त्यांतील लोक ज्यास आपल्यांत

* आमच्या इकडे पूर्वी वर्णाश्रमधर्म म्हणून जे सांगितले आहेत, त्यांतलाच गिल्ड हा प्रकार होता असे वाटतें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र, अशा चार वर्णात उत्पन्न झालेल्या माणसांनींच तीं तीं कामें करावी, असा धर्मशास्त्रकर्त्यांनी, म्हणजे त्या वेळच्या कायदे करणाऱ्यांनीं, निर्बंध करून टाकिला होता. ब्राह्मणांनीं लिहिण्याचे, वेदपठणाचें, किंवा विचाराचें काम करावें, हुन्नर करूं नये; क्षत्रियांनीं शस्त्रधारणाचें काम करावें, वैश्यांनी उदीम (व्यापार) करावा; व शूद्रांनीं कृषिकर्म करावे अशा प्रकारची ही व्यवस्था अगदी ठरलेली होती ब्राह्मणांनीं वैश्याचें काम करूं नये, किंवा वैश्यांनीं शूद्राचें काम करू नये अशी समजूत होती. वेदकालचा इतिहास पहातां, त्या काळीं, लोहार, सुतार, रथकार, सोनार, नावाडी कोळी परीट वगैरे अनेक धंदे करणारे लोक होते, असें दिसतें. तथापि चार वर्णाची ही व्यवस्था पुढल्या काळीं ठरली असावी, असे वाटतें. राज्यक्रांतीस अनुसरून व व्यवहाराच्या सोईकडे लक्ष देऊन लोक अनेक धंदे करू लागले, कालमान फिरल्यामुळें पहिलें सगळेंच मान फिरलें हें जरी खरें आहे, तथापि अजूनही आमच्या लोकांची अशी समजूत आहे कीं जो मनुष्य ज्या धंद्याच्या लोकात किंवा कुटुंबात जन्म पावला असेल त्यानें तोच धंदा केला पाहिजे. दुसरा करिता कामा नये. आमच्याइकडे वहिवाट किंवा लोकरूढि ह्मणजे कायदा अशी स्थिति असल्याकारणानें पूर्वीची वर्णाश्रमधर्माची व्यवस्था किंवा धंद्याची व्यवस्था बऱ्याच अशानें अजून कायमच आहे, असें ह्मटलें तरी चालेल.

शनिवार ता० ३१ माहे आगष्ट रोजीं सायंकाळीं बडोदे येथील राजवाड्यांत **श्रीमंत सरकार महाराज साहेब** यांचे समक्ष **संकेश्वर** मठाचे **श्रीमज्जगद्गुरूंचे** आश्रित वे. शा. सं. रा. रा. एकसंबेकर शास्त्री यांनीं 'वेदान्त' या विषयावर सुश्राव्य भाषण केलें. तें ता० ७ सपटेंबर १९०१ चे '**सयाजीविजय**' पत्रांत दिलें आहे. त्यापैकीं कांहीं भाग जातिभेद या विषयासंबंधाचा असून संग्रहणीय वाटल्यावरून खालीं दिला आहे. वेदाध्ययनाच्या अधिकाराविषयीं बोलत असतां शास्त्रीबोवा ह्मणाले:—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व " शूद्र हे चार वर्ण वेदांत कोठें आढळण्यात येत नाहीत, असें कांहीं लोकांचें ह्मणणें आहे.—त्यांस—' ब्राह्मणोऽस्य

घेतील त्यां शिवाय त्याच्या स्थलसीमेत दुसऱ्या कोणास तो धंदा किंवा हुन्नर करिता येत नसे. कोणताही एखादा महत्वाचा हुन्नर चालविणे झाल्यास, कायदे करणारांनी किंवा अधिकाऱ्यांनी ठरविलेल्या पद्धतींनी किंवा रीतींनीच करावा लागत असे. आपला धंदा चालविण्याच्या कामात किंवा पद्धतीत सुधारणा केल्याबद्दल, किंवा एखादी नवी युक्ति काढल्याबद्दल, कित्येक ·'····· · · कारागृहात पडले, अशीही पुष्कळ उदाहरणे त्या काळच्या इतिहासांत सापडतात. अशी ज्या ठिकाणी स्थिति होती, त्याच **युरोपखंडांत** अलीकडे, विशेषकरून ज्या देशाच्या यांत्रिक सुधारणांनी फायदा झाला आहे, त्या देशात वर सांगितलेल्या

---

मुखमासीत बाहूराजन्यः कृत ऊरूतदस्य यद्वैश्यः पद्भ्या शूद्रोऽअजायत '—इत्यादि श्रुतीत सांगलें आहे, **असें** उत्तर आहे. पण त्यावर पुन जर **कोणी अशी शंका** घेईल कीं, **वेदांत** तीन भाग आहेत. त्यातील प्रथम भाग, **संहिता**, व पुढचे दोन भाग **ब्राह्मण** व **आरण्यक**. त्यांपैकी **आरण्यक**, ह्मणजे **उपनिषद्** ग्रंथांपैकी **छांदोग्य** उपनिषद यात **जाबाल** ऋषीची कथा आहे. तींत असें आहे **कीं, जाबाल** हा कोणी एका बाईचा मुलगा होता. तो ब्रह्मवेत्ते ऋषि याचेकडे आपणास वेद शिकण्याचा अधिकार मिळावा, ह्मणजे आपलें उपनयन व्हावें, अशी प्रार्थना करण्यास गेला. तेव्हा, ऋषींनी त्यास उत्तर दिलें कीं, ' तुझें गोत्र कोणतें आहे तें तुझे आईबापास विचारून ये ह्मणजे तुझें उपनयन करूं ' मुलगा परत गेला. त्यानें आपल्या आईस विचारिलें कीं, ' ऋषी महाराज ह्मणतात कीं तुझें गोत्र सांग ह्मणजे उपनयन करू. करिता माझे बापाचे बापाचें नाव काय तें मला सांग '' आई ह्मणाली ; ' मी फार दिवस परिचारिणी होत्यें. माझे तारुण्यात तूं मला झालास. यामुळें तू अमक्यापासूनच मला झालास असें निश्चयपूर्वक सांगता येणें मला शक्य नाहीं. माझें नाव **जबाला** आहे. करितां ऋषींना तू तेंच सांग ' त्याप्रमाणें त्यानें केलें. त्यावरून ऋषी ह्मणाले, ' सत्य हकीकत सांगणारा यास ब्राह्मणच ह्मणावें, करिता तुझें उपनयन करण्यास हरकत नाही, ' असें ह्मणून त्यांनीं त्यास उपनीत केलें. करिता हल्लीं ज्याप्रमाणें प्रचारात जाती आहेत तशा त्या वेळीं असत्या तर पाहिजे त्याचें उपनयन करून त्यास वेदाध्ययन सांगता आलें असतें. यावरून ' ब्राह्मण ' ह्मणजे ब्रह्मज्ञानी, ' क्षत्रिय ' ह्मणजे आपले बाहुबलानें जो सर्वांचें रक्षण करितो तो, ' वैश्य ' ह्मणजे पुष्कळ द्रव्य असून क्रयविक्रय करून व्यवहार करितो तो, व ह्या तिन्हीं वर्णाजवळ केवळ परिचर्यारूप नोकरी करून असणारा तो ' शूद्र '

मतांच्या अगदीं विरुद्ध प्रकारचीं मतें आजकाल आढळतात! कलाकौशल्याचें काम कोणी करावें, व तें कोणत्या पद्धतीनें करावें, कोणत्या पद्धति चांगल्या व कोणत्या पद्धति वाईट, वगैरे गोष्टी पूर्वीच ठरवून टाकण्याच्या भानगडींत, आजकाल कायदा व सरकार मुळींच पडत नाहींत. तर, या गोष्टी प्रत्येक व्यक्तीच्या स्वतंत्र विचारावर व आवडीनिवडीवर सोंपवितात. आमच्या या देशांत ( इंग्लंडांत ) हुन्नर काम करणाऱ्या लोकांनीं, प्रथम एखाद्या प्रसिद्ध कारागिराजवळ कांहीं दिवस तरी उमेदवारी केलीच पाहिजे, असा जो एक कायदा होता, तोही बऱ्याच दिवसांपूर्वी रद्द करण्यांत आला. त्याचें कारण एवढेंच

होय. यावरून ब्रह्मवेत्ता हा मुख्य असल्यामुळें त्यास मुखस्थानत्व दिलें. बाहुबलवान हा ब्रह्मवेत्त्यापेक्षा किंचित कमी प्रतीचा समजून त्यास बाहुस्थानत्व दिलें. त्याहीपेक्षा खालच्या प्रतीचा क्रयविक्रय करणारा वैश्य हा असल्यामुळें त्यास ऊरुस्थानत्व दिलें. आणि चवथा जो शूद्र तो सर्वांचे खालीं राहणारा म्हणून त्यास चरणस्थानत्व दिलें, असें मानणें भाग येईल. अशी शंका घेतल्यास त्यास उत्तर-असें जरी मानिलें, तरी हल्लीं प्रचारांत असलेला वर्ण-विभाग तो श्रुतीचे कालापासून झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, स्मृतींचे पूर्वी ऋषी महाज्ञानी असल्यामुळें त्याची योग्यता फारच मोठी होती व तशा मोठ्याचें कुलाचा विचार करूं नये. परंतु पुढें लोक अज्ञानी झाल्यामुळें प्रस्तुत चालत असलेला वर्ण विभाग असणें योग्य दिसल्यानें मन्वादि स्मृतींत तो विभाग आढळून येतो. व 'यन्मनुरवदत तद्भेषजं' अशा वचनावरून त्यास प्रामाण्य तर आहेच. करितां हल्लीं प्रचारांत असलेले जे ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य या वर्णांस तर वेदाधिकार निर्विवाद आहे आतां शूद्रांना मात्र वेदाचा अधिकार नाहीं असें स्मृत्यादि ग्रंथावरून दिसतें. व सर्व मनुष्य मात्र ब्रम्हज्ञानाचे अधिकारी आहेत असें ऐतरेयादि श्रुतींवरून सूचित होतें. कारण, ऐतरेयोपनिषदांत पुरुषशद्वोपलक्षित जी मनुष्य योनि ती निर्माण केल्यानें आपण कृतार्थ झालों, असें परमेश्वरानें मानिलें आहे, याचें कारण निर्माण कर्त्याचें स्वरूप जाणणारी ती योनि असल्यामुळें त्यास ती निर्माण केल्यानें कृत्यकृत्यता वाटली. हल्लींचे रूढींत असलेल्या नियमाप्रमाणें जरी शूद्रास वेद म्हणण्याचा अधिकार नाकबूल केला तरी वेदाचें तात्पर्य समजून ब्रम्हज्ञान मिळवून कृतकृत्य होण्याचा अधिकार त्या शूद्रासहि आहे हें उघड होत आहे; व त्यामुळेंच शूद्रांतही कांहीं ब्रम्हज्ञानी होऊन गेले."

की, कोणतीही कला, किंवा कोणताही धंदा शिकण्याकरितां एखाद्या हुशार कारागिराजवळ राहून, कांहीं दिवस उमेदवारी करणे अवश्यच असेल तर, ही आवश्यकताच त्यास तसे करण्यास भाग पाडील. गुरुमुखाखेरीज व [illegible] एखाद्या विद्यार्थ्यास एखादी विद्या येण्यासारखी खरोखर नसेल तर, विद्यार्थी आपण होऊनच गुरुजवळ राहील, व त्याच्या घरीं राहून उमेदवारी करील, हे उघड आहे. त्याबद्दल कायदा करण्याची जरूर नाहीं. हे प्रमेय अलीकडील लोकांच्या चांगले ध्यानात येऊन गेले आहे. जुनी समजूत अशी होती की, व्यक्तिमात्राच्या आवडीनिवडीवर फारच थोड्या गोष्टी सोपविण्यासारख्या आहेत. या समजुतीमुळे ज्या गोष्टी लोकांच्या हिताच्या आहेत व ज्या त्यांनी अमुक रीतीनेच केल्या पाहिजेत, असे त्यांस वाटे, त्या, आपण त्याहून ज्ञानाने श्रेष्ठ आहों व शहाणे आहों असे समजून, त्याच्या हिताकरितां ह्मणून सत्ताधीश ठरवून टाकीत. त्यांस असे वाटे की, ज्याचा तो स्वतंत्र असला तर, तो आपल्या कामांत खचित चूक करणार ! परंतु ही समजूत अलीकडे बदलून गेली आहे. अलीकडल्या लोकांची अशी पक्की समजूत होऊन गेली आहे की, ज्या कामांत व्यक्तिमात्राचे स्वतःचे हिताहित आहे, त्या कामांत जो तो आपापला मुखत्यार असावा, व असे असले तरच गोष्टी व्हावयाच्या तशा व्यवस्थित होतात. ही समजस कल्पना एक हजार वर्षांच्या अनुभवाचे फल होय, हे लक्षांत ठेविले पाहिजे ! ही कल्पना लोकांच्या ध्यानांत येण्यास बराच काल लागला, ही गोष्ट खरी त्याचप्रमाणे, या कल्पनेविरुद्ध जितक्या ह्मणून दुसऱ्या कल्पना सुचल्या तितक्या सर्वांचा लोकांनी अनुभव घेऊन पाहिला. त्यांचा परिणाम हितावह झाला नाहीं. तेव्हां, मग ही कल्पना कायम झाली ! हल्ली सुधारलेल्या व ज्ञानसपन्न राष्ट्रांत निदान कारागिरीच्या कामांत तरी,

वर सांगितलेला सिद्धांत किंवा नियम चांगल्या प्रकारें ठरून गेल्या-सारखा आहे. यामुळे, ज्याला जो धंदा करावासा वाटेल त्याला तो करण्यास हल्ली कोणीही प्रतिबंध करीत नाही. काम करण्याच्या ह्मणून जितक्या पद्धति आहेत, तितक्या चांगल्याच असतात; अथवा प्रत्येक कामांत सर्व माणसें सारखींच शहाणी असतात, असें कोणीही समंजस मनुष्य ह्मणणार नाही. तरी, सांप्रत बहुतेक लोकांची अशी पक्की समजूत होऊन गेलेली आहे की, या गोष्टी ज्याच्या त्याच्या स्वर्पावर सो पविल्या असतां, ह्मणजे, ज्यास जो धंदा आवडेल त्यास तो करूं दिला असतां, काम करण्याच्या उत्तमोत्तम व नव्यानव्या पद्धति निघून, ज्या लोकांस जीं कामें उत्कृष्ट करितां येतील, त्यांच्याच हातांत तीं कामें जातील. उदाहरण, ज्याचे बाहु सशक्त आहेत, अशाच मनुष्यानें घिसाड्याचें काम करावें, दुसऱ्या मनुष्यानें करूं नये, असें कायद्यानें ठरविण्याची जरूर आहे काय? धंदा निवडण्याची मुभा ठेविल्यानें, शरीरानें बळकट व बाहूंनी सशक्त असे जे लोक नसतात, ते, लोहाराचें काम न पत्करितां, जें काम त्यांस योग्य असेल व जें काम त्यांस चांगलें करितां येईल, तेंच काम पत्करितील हें उघड आहे. याच मताला अनुसरून अलीकडच्या लोकांस असेंही वाटू लागलें आ[illegible] अमुक लोकांनी अमुकच कामें करावीं व अमुक कामें करण्या[illegible] लोक अयोग्य आहेत, असें पूर्वींच ठरवून टाकणें, हें, रा[illegible] अधिकाराची जी योग्य मर्यादा आहे, तिचें उल्लंघन[illegible] आहे. ह्मणजे, हें काम सरकारचें नाही. अशा कामां[illegible] घालणें, ह्मणजे 'अव्यापारेषु व्यापारः' असा प्रका[illegible] माणसें अमुक गोष्टी करण्यास अयोग्य आहेत, [illegible] कांहीं योग्य कारणें असली, तरी तीं सर्वत्र [illegible] असें नाही. कांहीं गोष्टींमध्यें ती चांगलीं [illegible]

काही गोष्टींमध्ये मुळीच लागू पडणार नाहीत. यासाठी, ज्या ठिकाणी ती मुळीच लागू पडणार नाहीत, त्या ठिकाणी निवळ अन्याय केल्यासारखे होईल. आपल्या स्वतःच्या फायद्याकरिता, मनुष्यांनी आपापल्या बुद्धीचा उपयोग अनियंत्रितपणे करून घेण्यास प्रतिबंध केला असता, त्यात, व्यक्तिमात्राचे व एकदर समाजाचे पुष्कळ नुकसान होणार आहे. ज्या कामास मनुष्ये खरोखर अयोग्य असतील, त्या कामांत त्यांनी पडू नये, ही गोष्ट बहुधा आपोआपच होत असते. मनुष्याच्या वर्तनाचे जे सामान्य नियम असतात त्या नियमानीच, आपला इष्ट हेतु सिद्ध होतो. कारण, असे पहा की, ज्या कामास जो मनुष्य अयोग्य आहे, ते काम करण्याचा जरी त्याने यत्न केला, तथापि त्यात आपणास यश येत नाही असे पाहून, तो आपण होऊनच ते काम सोडून देईल. असे आहे तर, योग्यायोग्यतेचा विचार करण्याची सरकारास मुळीच अपेक्षा रहात नाही, हा सर्वसाधारण नियम मोठ्या महत्वाचा असून तो नेहेमी लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

१४. अर्थशास्त्राचे आणि व्यवहारशास्त्राचे हे साधारण तत्त्व जर खरे नसेल; आपले इष्टमित्र व आप्त यांची सल्लामसलत घेऊन, आपल्या विचारास योग्य वाटेल तो धंदा पतकरण्याचे काम, कायदा व र यांचेपेक्षा ज्यांचे त्यास चांगले कळत नसेल, तर हे वर सांगित- त्र जितके लौकर सोडून देतां येईल तितके हितावह नव्हे काय? रएक कामांत सरकारांनी नियम करून टाकावयाची व अमुक क मनुष्ये योग्य आहेत, किंवा अयोग्य आहेत, हे ठरविण्याची, ो होती, तिचेच पुनः अवलंबन करावे, हेच बरे! परंतु, र्दिष्ट केलेले मत जर खरे असेल, तर ते खरे आहे असें वर्तन केले पाहिजे. वरिष्ठ प्रतीच्या घराण्यांत च्या गरीबाच्या कुळांत जन्मास येणे, हे केवळ

त्याच्या दुर्दैवावर लादून, त्यानें अमुक अमुकच हलकीं मलकीं कामें करावीं असा ठराव करणें जितकें अन्यायाचें होणार आहे, तितकेंच, कोणताही प्राणी पुरुषजन्माला न येता मुलीच्या जन्माला आला असतां, त्याच्याविषयीं असा विलक्षण कायदा करणें, अन्यायाचें होणार आहे. त्याचप्रमाणें, अब्रूची किंवा प्रतिष्ठेचीं बहुतेक कामें, तिला फक्त ती मुलगी आहे ह्मणून करण्याची मनाई करणें, हेंही तितकेंच अप्रयोजक व जुलमाचें होणार आहे. हल्लीं पुरुषाच्याकरितां राखून ठेविलेले ह्मणून जे हुद्दे किंवा जीं कामें आहेत, तीं करण्याविषयीं स्त्रियांपेक्षां पुरुषच अधिक योग्य आहेत, अशा संबंधाची जी पोकळ बडबड ऐकू येते, तितकी जरी सर्व कबूल केली तरी, हल्लीं पार्लमेंट सभेचे सभासद होण्याच्या संबंधाचा जो कायदा ठरविला आहे, तो जसा अन्यायाचा व मूर्खपणाचा, तशीच हीही गोष्ट अन्यायाची आहे. या स्थानिक स्वराज्याचे सभासद निवडण्याचा कायदा जर मूर्खपणाचा असला, तर त्याचा कसा परिणाम होतो तो पहा. समजा कीं, सभासद होण्याला सर्वथा योग्य असा एकच मनुष्य बारा वर्षांतून एकदां जरी निवडला गेला नाहीं, तरी देखील, असें होण्यानें जगाचें ... नुकसान होण्याचा संभव असतो. बरें, अयोग्य किंवा नाल... हजारों माणसें जरी निवडलीं गेलीं नाहींत तरी, त्यांत वि... नाहीं. कारण, अशी कल्पना करा कीं, निवडणारी कि... जी मंडळी असते तिची स्वाभाविक रचना किंवा ... कीं, नालायक ह्मणून जितकीं माणसें असतील, ति... वयाचीं! अशीं माणसें पैशापासरी देखील मिळत... व कठीण कामें करण्यास योग्य अशीं माणसें ... मग ज्यांतून निवड व्हावयाची, त्यांची स... कितीही मोठें असलें व निवडणुकीच्या ...

होतील तितक्या कमी ठेविल्या, तरी आपणास पाहिजे तशी माणसे मिळण्याचा संभव नसतो. तेव्हां निवडणुकीचें क्षेत्रच जर आपण आकुंचित * किंवा मर्यादित केल्या--ह्मणजे, ज्या माणसांतून निवडणूक करावयाची, त्याच्या संबंधानें अशा अधिकाधिक निरर्थक अटी आपण घातल्या--तर त्याचा परिणाम असा होतो की, हुशार व योग्य असे माणूस प्रसंगी निवडले जात नाही. आणि ते निवडले गेले नाहीं म्हणजे, अशा माणसाचे हातून समाजाचें कल्याण होण्याचा जो संभव, जो सुसंधि, त्याला मात्र समाज मुकतो. बरें, इतकें होऊन नालायक किंवा अयोग्य माणसें समाजाचे गळ्यांत जीं पडावयाचीं तीं शेवटीं पडतातच !

१५. बहुतेक सुधारलेल्या राष्ट्रांमधून जे कायदेकानू आहेत, त्यांवरून पहातां, मनुष्य जन्मास आल्यावर त्यानें अमुक काम करू नये, किंवा अमुक अमुक हुद्दा करण्याला तो नालायक आहे, अशा तऱ्हेच्या

* हे प्रमेय आमच्या इकडील एक व्यावहारिक उदाहरण दिलें असता अधिक स्पष्ट होईल. ब्राह्मणामध्यें कोंकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, असे जे स्थलपरत्वें भेद झाले आहेत, व बेटीव्यवहार करावयाचा नाही, अशी जी चाल पडली आहे, तिच्यामुळें योग्य किंवा मनासारखे स्थळ मिळण्याला केवढी पंचाईत पडते, याचा बहुतकरून सर्वांस अनुभव असेलच. बहुधा असें आढळण्यात येते की, ज्या मानानें
- लहान, त्या मानानें अडचणी अधिक येतात व पाहिजे तसें मनासारखें स्थळ
...हीं. याचें मुख्य कारण निवडणुकीच्या क्षेत्राचा आकुंचितपणा होय. ही
चाल बंद केली असतां या संबंधाच्या अनेक अडचणी दूर होतील, असें
...ह्मणामध्ये त्याबद्दल विशेष कोणी विचार करीत नाहीं, ही शोचनीय
...देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे हा जो भेद आहे, तो नाहींसा करणें
..., तसें करणें अशास्त्र होत नाहीं. अशाविषयीं श्रीमत् शंकरा-
...पला अभिप्राय दिला आहे. हें आमच्या वाचकांस विदित असेलच.
...कीं, ज्या क्षेत्रांतून कोणतीही माणसें निवडून काढावयाचीं, तें क्षेत्र
...यामुळें काहीं कृत्रिम अडचणी उत्पन्न करून संकुचित केलें, तर
नुकसानच होणार असें समजावें. प्रस्तुत स्थळीं हेंच तत्व
...याचा निबंधकार यांचा हेतु आहे.

कायदा कोणत्याच देशात नाही. या गोष्टीला फक्त दोन अपवाद आहेत. एक **स्त्रियांचा** व दुसरा **राजाचा.** राजपदाच्या संबधानें अजून अशीच चाल आहे की, राजपद प्राप्त होण्यास राजकुळांत जन्म घ्यावा लागतो. राजघराण्याखेरीज कोणत्याही मनुष्याला गादीवर बसण्याचा मुळींच हक्क नाहीं. आणि राजघराण्यांतील जरी एखादें मनुष्य असलें, तरी त्यास वंशपरंपरेच्या व वारसाच्या हक्कानें राजपद प्राप्त होतें, दुसऱ्या कोणत्याही साधनानें होत नाहीं. एक राजपदाखेरीज इतर सर्व प्रतिष्ठेचीं व मानमान्यतेचीं कामें, पुरुषजातींपैकीं प्रत्येक व्यक्तीला करण्याची मुभा असते. यांपैकीं पुष्कळ अधिकार केवळ द्रव्याच्याच योगानें प्राप्त होण्यासारखे असतात, हें खरें. तथापि, द्रव्य संपादन करण्याचा यत्न पाहिजे त्यास करण्याची मुभा असते. आणि त्याप्रमाणें अगदीं गरिबापासून निवळ मेहनतीनें द्रव्य संपादन करूनच श्रीमंत झाल्याचीं पुष्कळ उदाहरणें आढळतात. आतां, अशी स्थिती प्राप्त होण्यास दैवाच्या प्रतिकूलतेमुळें पुष्कळ अनिवार्य अशा अडचणी येतात, ही गोष्ट खरी आहे. तथापि, अमुक प्रतिष्ठेचीं कामें अमुक पुरुषांनीं करूं नये, अशा प्रकारचा कायद्याचा प्रतिबंध, पुरुषजातींपैकीं कोणत्याही व्यक्तीला कोठेंही नाहीं. म्हणजे, कायदा किंवा लोकमत हें, स्वाभाविक अडचणीत कृत्रिम किंवा बुद्ध्या करून ठेविलेल्या अडचणींची भर घालीत नाहीं.*

---

* एखाद्या तरुण मुलीचा पति, तिच्या दुर्दैवानें एखाद्या रोगानें किंवा अपघातानें मृत होणें, ही तिच्या सुखाला स्वाभाविक अडचण झाली. म्हणजे, त्या गोष्टीस माणसाचा इलाज नसून, 'देवाची मर्जी' असें म्हणतात. परंतु, तिला कुरूप करणें, उत्साहाचे वगैरे वेळीं तिला मिरवण्यास प्रतिबंध करणें, तिला उद्देशून मर्मभेदक भाषण करणें, वगैरे लोकमतसंबंधाच्या किंवा कायद्याच्या ह्या कृत्रिम अडचणी, असें समजावें. निबंधकाराचा हेतु एवढाच आहे कीं, दैविक किंवा अमानुष गोष्टींमध्यें मनुष्यकृत गोष्टीची भर पडून मनुष्यप्राण्यांच्या सुखाचा व्याघात होतो. तो टाळवेल तितका टाळावा.

मी वर सांगितलें आहे कीं, सदरील नियमास राज्याधिकार हा एक अपवाद आहे. पण हा अपवाद आहे, ही गोष्ट प्रत्येकजण बोलून चालून कबूल करितो. या आधुनिक जगामध्यें ज्या रीतीभाती, किंवा जे व्यवहार चालू आहेत, जीं तत्वें सर्वमान्य आहेत, त्यांहून भिन्न अथवा त्यांस विरोधी अशी राज्याधिकाराची एकच गोष्ट आहे. परंतु ही व्यवस्था कांहीं विशेष कारणाकरितां सर्वांनीं जाणूनबुजून पसंत केल्यासारखी आहे. त्या व्यवस्थेच्या आवश्यकतेविषयीं भिन्नभिन्न व्यक्तींचा व भिन्नभिन्न राष्ट्रांचा अभिप्राय निरनिराळा पडतो हें खरें. तथापि, राज्यतंत्र चालविण्याचा जो थोर अधिकार, तो, कांहीं विशेष कारणाकरिता, समाजानें पाहिजे त्या माणसास मिळण्यासारखा ठेवला नसून, जन्मत: जो राजकुलांत उत्पन्न झाला असेल, त्यालाच देतात. ही गोष्ट साधारण नियमास उघड उघड अपवादक आहे, अशी त्यांची पक्की समजूत असते. आणि, असें आहे तरी, आलीकडील सर्व स्वतंत्र राष्ट्रें अनेक युक्तिप्रयुक्ति करून हा अपवाद नाममात्र शिल्लक करून ठेवितात. ह्मणजे, राजाच्या अधिकाराचें अनेक अटींनीं असें चमत्कारिक बंधन करून टाकतात कीं, तेणेंकरून राजाकडे तो अधिकार फक्त नावाला असून त्याच्या हातांत खरोखर कांहींच सत्ता रहात नाहीं. तो अधिकार खरोखर कारभाऱ्याकडे असतो. त्याच्याच हातांत खरी सत्ता असते.* यामुळें, कारभाऱ्याचा किंवा प्रधानाचा

* प्रस्तुत संबंधानें प्रत्यक्ष इंग्लंडचेंच उदाहरण मनांत ठसण्यासारखें आहे. इंग्लंडचें राज्यतंत्र नामाला इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया हिच्या हातांत होतें, किंवा तिचा मुलगा एडवर्ड याचे हातांत आहे. परंतु, वास्तविक राज्याचा सर्व कारभार प्रजेचे प्रतिनिधि, ज्यांस 'हौस् ऑफ् कामन्स्' असें ह्मणतात, त्यांचेच हातांत होता व आहे. त्या प्रतिनिधींचा अग्रणी असा एक पुरुष असतो. उदाहरण, पामर्स्टन्, डिस्रायली, ग्ल्याड्स्टन्, साल्सबरी, इत्यादि. आतां, यद्यपि इंग्लंडचा राजा होण्याचा अधिकार प्रजेपैकीं पाहिजे त्या मनुष्यास नसला, तथापि प्रजेच्या संबंधानें पाहिलें असतां, या गोष्टीचें महत्व फारसें नाहीं. कारण

हुद्दा पुरुषजातीच्या व पूर्ण वयात आलेल्या एकंदर प्रजेपैकी पाहिजे त्यास मिळण्यासारखा असतो. निदान कायद्याचा तरी मुळीच प्रतिबंध नसतो. तेव्हां, मोठे अधिकार मिळविण्याविषयीं जन्मापासूनच नालायक ठरविलेली अशी माणसें म्हटली म्हणजे, एक फक्त स्त्रिया मात्र रहातात. अशा प्रकारचें हें उदाहरण, आलीकडल्या मन्वतरास अगदींच विसंगत दिसतें. या उदाहरणाखेरीज दुसरें चमत्कारिक उदाहरण कोठेंही दृष्टीस पडत नाहीं. कारण, असें पहा कीं, एकंदर मानव जातीपैकीं निम्या माणसास या अन्यायाचे परिणाम भोगण्यास लावणें, व समाजाचीं मोठमोठीं कामें करण्याचा अधिकार चालविण्याविषयीं जन्मादारभ्यच त्यास अपात्र ठरवून टाकणें, ही किती वाईट व दुःखाची गोष्ट आहे बरें? त्यानें कितीही मेहनत केली, अथवा संपत्ति मिळविली, कितीही विद्या संपादित केली, व तो कसाही

खरोखर बहुतेक सत्ता कारभाऱ्याचेच हातात असते. हा कारभार पुरुषप्रजेपैकीं अगदी गरीब स्थितीतल्या मनुष्यासही आपल्या शहाणपणानें प्राप्त करून घेता येतो. राजाचे ठिकाणीं कारभारी नेमण्याचा प्रकार आज बरेच दिवस फ्रान्स व अमेरिका याजमध्यें चालू आहे या दोन देशात राजा म्हणून कोणी नसून, ज्याला प्रेसिडेंट ( कारभारी ) असें म्हणतात, तोच बहुधा राजासारखा असतो. अमेरिकेत जॉर्ज वॉशिंग्टनापासून आजपर्यंत वेळोवेळीं राज्यकारभार वाहणारे जे जे प्रेसिडेंट किंवा राज्यधुरधर होऊन गेले, ते बहुतेक अगदी गरीब स्थितींतलेच होते, व ते केवळ आपल्याच बुद्धिसामर्थ्यानें वाढले होते. पृथ्वीच्या पाठीवर ज्ञानसंपन्न व सुधारलेलीं अशीं जीं राष्ट्रं आजकाल आहेत, त्याच्यामध्यें एक मुख्य सर्वसाधारण तत्व सर्वसामान्य होऊन राहिलें आहे. तें हें कीं, पुरुषजातीपैकी कोणीही असो, केवळ जातीवरून किंवा कुळावरून, देशांतील मोठमोठे अधिकार चालविण्याविषयीं कोणताही पुरुष नालायक किंवा अपात्र असें मानित नाहींत. तेव्हा मि० मिल्ल साहेबाचे ह्मणणें इतकेंच कीं, या योग्य व हितकर अशा नियमास स्त्रियाची अपात्रता अपवादक आहे, हें चांगलें नाहीं, योग्य नाही व न्याय्यही नाहीं. त्याच्या म्हणण्याचे तात्पर्य एवढेंच कीं, लिंगभेद मनात न आणिता 'गुणा पूजास्थानं गुणिषु न च लिङ्ग न च वय' याच न्यायाचें अवलंबन सर्वांनीं करावें व हींच गोष्ट सर्वांस अत्यन्त श्रेयस्कर आहे.

बुद्धिसामर्थ्याचा असला तरी, दुर्दैवाने त्यास स्त्रीजन्म प्राप्त झाल्यामुळे त्या मनुष्यप्राण्याचा कांहींच इलाज चालू नये, असा निर्बंध समाजाने करून ठेवणें, केवढें भयंकर व अन्यायाचें आहे! थोड्या दिवसांपूर्वी धर्मसंबंधानें चिकटणारी अपात्रता पुष्कळांच्या आड येई व अजूनही बऱ्याच ठिकाणीं येते, असें आढळतें. पण तीही बहुतेक सुधारलेल्या देशांत नाहींशी करण्याचें साधन असतें. तें हें कीं, धर्मांतर करणें. ज्या ठिकाणीं मोठा अधिकार मिळण्यास त्या मनुष्याचा धर्म त्याच्या आड येत असेल, तेथें त्या मनुष्यानें धर्मांतर केलें ह्मणजे, त्यास तो अधिकार मिळण्यास प्रत्यवाय रहात नाहीं. इंग्लंडांत व यूरोपांत मात्र धर्मसंबंधामुळें येणारी अपात्रता ही बहुतेक नष्ट झाल्यासारखीच आहे.

१६. तेव्हां, अलीकडील लोकव्यवस्थेमध्यें स्त्रियांची परवशता, किंवा स्त्रीजातीचें व्यावहारिक पारतंत्र्य, केवळ अपवादासारखें होऊन राहिलें आहे. [illegible] जें कांहीं तत्व, किंवा जो कांहीं एक सामान्य नियम, त्या नियमाचें धडधडीत उल्लंघन होत असल्याचेंही हें एकच उदाहरण आहे. जुने आचारविचार इतर सर्व बाबतींत लयास गेले असतां, त्यांतलें अवशिष्ट हें एवढेंच शुष्ककाष्ठासारखें मागें राहिलें आहे. दिवसेंदिवस सुधारणेचें पाऊल पुढें आहे, असा आपण जो मोठा डौल मिरवितों, त्याचा क्षणभर विचार केला, व स्त्रियांची परवशता जी दृष्टीस पडते तिचाही विचार केला तर, या दोन गोष्टींची विसंगतता पाहून, जो कोणी खऱ्या कळकळ्याचा असेल, ज्याला मनुष्याच्या स्वभावाची प्रवृत्ति खरोखर कळत असेल, त्याला फारच नवल वाटेल. या विसंगततेपासून अनुकूल असें प्रथमदर्शनीं एकच अनुमान निघतें. आणि तें अनुमान चालू असलेला जो प्रचार, किंवा जी रूढि, तिला खचीत घातक आहे. यामुळे, राजसत्तात्मक व प्रजासत्तात्मक या दोन प्रकारच्या राज्यपद्धतींपैकीं चांगली कोणती, असा

प्रश्न निघाला असतां, त्या प्रसंगी जो परिणाम होत असतो, तसाच परिणाम प्रस्तुतसंबंधानेंही झाला पाहिजे.

१७. निदान येवढी तरी गोष्ट लोकांनी कबूल केली पाहिजे. ती ही की, चालू असलेला व्यवहार व लोकांचें ठरीव मत, येणेंकरून आपल्या मनास कल्पित न करितां, या गोष्टीचा निर्णय गुणदोषविवेचनपूर्वक वादविवाद करून व न्यायाला आणि नीतीला अनुसरून करावा. मानवजातीच्या इतर सामाजिक व्यवस्थांमध्यें जसा विचार होतो, ह्मणजे, एकदर मानवजातीला अत्यंत हितावह असे प्रचार किंवा अशा रूढि कोणत्या, या गोष्टीवर जसा तो निर्णय अवलंबून असतो, त्याचप्रमाणें प्रस्तुत संबंधानेंही, लिंगभेद मनांत न आणितां एकंदर मानवजातीच्या हिताहिताचा विचार केला पाहिजे. वाद करणें तो खरेपणानें केला पाहिजे. तो करीत असतांना या विषयाच्या मूळ पायाजवळ गेलें पाहिजे. केवळ कांहीं तरी डळमळीत व पोकळ गोष्टी मागून तो होता कामाचा नाहीं. उदाहरण, उगीच आपला सर्वसाधारण एक सिद्धांत टोकून दिला की, प्रस्तुत चालू असलेल्या प्रचाराच्या तर्फेनें मानवजातीचा अनुभवच साक्ष देत आहे. ह्मणजे, स्त्रीजातीची परतंत्रता लोकांनी अनुभवपूर्वक व विचारपूर्वक ठरविलेली आहे. हें पोकळ ह्मणणें मुळींच उपयोगाचें नाहीं. लोकांनी जोपर्यंत एकाच मार्गाचा अनुभव घेतला आहे, तोपर्यंत दोन मार्गांपैकीं कोणता मार्ग चांगला, या गोष्टीचा निर्णय लोकांनी अनुभव घेऊन ठरविला, असें ह्मणतांच येणार नाहीं. स्त्रीपुरुषांची समानता प्रतिपादन करणारें मत, केवळ कल्पनेच्याच आधारावर आहे, असें जर कोणी ह्मणेल तर त्यानें, विरुद्ध मताचा पायाही केवळ कल्पनेवरच रचला आहे, ही हवेतही लक्षांत ठेविली पाहिजे. प्रत्यक्ष अनुभवानें येवढीमात्र एक ठेव सिद्ध झाली आहे की, स्त्रियास पारतंत्र्यांत ठेवून माणसें अजून

जगलीं आहेत ! फारफार तर आणखी असेंही ह्मणता येईल कीं, हल्लीं आपणांस दृष्टिगोचर होत असलेल्या उत्कर्षाच्या स्थितीप्रत तीं पोचलीं आहेत ! परंतु हा उत्कर्ष किंवा ही सुधारणा, स्त्रिया स्वातंत्र्यांत असत्या तर झाली नसती, व पारतंत्र्यात आहेत ह्मणूनच झाली आहे, अशा प्रकारचा अनुभव लोकांनीं घेतला आहे काय? नाहीं. अनुभव आहे तो उलट असा आहे कीं, सुधारणेचें पाऊल जसजसें पुढें सरकत जातें, तसतशी स्त्रियांची सामाजिक स्थितिही सुधारत जाते. आणि, यावरू-नच इतिहासकार व तत्ववेत्ते यांनीं निर्विवाद असा सिद्धांत ठरवून टाकला आहे कीं, कोणत्याही देशाची उन्नति किंवा अवनति, त्या देशातील स्त्रियांच्या उन्नत किंवा निकृष्ट स्थितीवर अवलंबून असते. मानवी प्राण्याचा पहिल्यापासूनच इतिहास पाहिला, तर दिवसानुदिवस स्त्रियांची स्थिति सुधारता सुधारतां ती पुरुषांच्या बरोबरीला येऊं पहात आहे. येवढ्यावरून त्या, पुरुषांची बरोबरी करतीलच, असें जरी आजला ह्मणतां आलें नाहीं, तरी बरोबरी करण्याकडे त्यांचा रोख आहे, एवढें अनुमान खास निघतें.

१८. आतां कोणी असें ह्मणतील कीं, प्रस्तुत पुरुष व स्त्रिया जे धंदे किंवा उद्योग करीत आहेत, ते त्यांस योग्य आहेत, व प्रस्तुतची जी त्यांची स्थिति आहे, ती त्यांच्या स्वभावापासूनच उत्पन्न झालेली आहे. परंतु हें ह्मणणें निरर्थक आहे. मनुष्याच्या बुद्धीचा विचार केला, व साधारण तारतम्यभाव लक्षांत ठेविला, तर स्त्रीपुरुषांचा प्रस्तुत जो परस्परसंबंध आहे तो जोपर्यंत कायम राहील तोपर्यंत स्त्रीपुरुषांच्या स्वभावाचें यथार्थ ज्ञान होण्याचा मुळींच संभव नाहीं. अशी कल्पना करा कीं, ज्या समाजांत स्त्रिया नाहींत, पुरुषमात्र आहेत ; किंवा स्त्रिया आहेत, पुरुष नाहींत ; अथवा, ज्यांत स्त्रीपुरुष दोघेही आहेत, परंतु स्त्रिया पुरुषांच्या अधीन नाहींत. अशा प्रकारचे जर निरनिराळे

समाज आपले पहाण्यात आले, तर मात्र प्रत्येकाच्या स्वभावांत मानसिक किंवा नीतीविषयक भेद असल्याची खातरीलायक माहिती मिळेल. हल्ली ज्यास 'बायकाचा स्वभाव' म्हणून म्हणतात, तो केवळ कृत्रिम परिणाम होय. म्हणजे, कांही बाबतीत त्याची यदृच्छेची प्रवृत्ति बलात्काराने प्रतिबंधात ठेविलेली, व कांही गोष्टीत ती वाजवीपेक्षा फाजील रीतीने उत्तेजित केलेली, अशासारखा प्रकार झाला आहे. स्त्रियांच्याशिवाय इतर प्रकारची कोणतीही तावेदार किंवा परवश मनुष्य घ्या. त्या [illegible] आपल्या धन्याशी जो संबंध असतो, त्या संबंधाच्या योगाने, त्याचा मूलस्वभाव सर्वाशी बदलून जाऊन त्याला अगदी भिन्न प्रकारचे स्वरूप प्राप्त झाले आहे, असे आढळणार नाही. परवश झालेली आणि दास बनून राहिलेली अशी जी माणसे इतिहासात वर्णिलेली आढळतात, त्याजवर स्त्रियांपेक्षाही अधिक जुलूम होत असे, असे मानिलें तरी, त्याच्या मूलस्वभावापैकी जितक्या भागावर जुलुमाचा किंवा बलात्काराचा परिणाम झाला नाही, तेवढाच भाग पुढे यदृच्छेने वृद्धिगत होत जाऊन, पदार्थ वृद्धिगत होण्याचे जे नियम आहेत, त्या नियमास अनुसरून, तोही परिपक्व दशेप्रत पावला, असे आढळेल. परंतु, स्त्रियाच्या बाबतीत पाहता असे दिसते की, त्यांचे धनी, ह्मणजे पुरुष, त्यांच्या सुखाकरिता व हिताकरिता, त्यांच्या (स्त्रियाच्या) मूलस्वभावास जाणून बुजून भिन्न प्रकारचे वळण दिलेले आढळते. जसा एखाद्या झाडाचा काही भाग जोराने वाढावा, किंवा एकाच बाजूने त्याच्या फांद्यांचा मोठा विस्तार व्हावा ह्मणून, मुद्दाम कांहीतरी युक्ति करावी, ह्मणजे तेवढ्या अंगालाच अधिक उष्णता द्यावी व अधिक पाणी घालावे; त्याचप्रमाणे, त्या झाडाच्या कांही फांद्या अगदी थंडगार हवेत सोडून देऊन, त्याच्या मुळावर मुद्दाम चोहोंकडून बर्फ रचून ठेवावे, आणि त्याच्या फांद्या अगदी जाळून भाजून नाहीतशा कराव्या,

अशा व्यवस्थेने त्या झाडाची जी स्थिति होईल, तशीच स्थिती पुरुषांनी स्त्रियाची केली आहे. असे उघड नजरेस येते. पुरुष आपल्या कृत्यांचा परिणाम आपणच विसरतात व वेडगळपणाने आपली अशी गोड समजूत करून घेतात की, स्त्रीरूप वृक्ष यदृच्छेने वाढावा तसाच वाढत आहे: येवढेच नव्हे, तर, त्याचा अर्धा भाग जर बर्फाने आच्छादून टाकिला नाही व अर्धा भाग जर कढत वाफेने भरलेल्या हौदांत बुडवून टेविला नाही, तर ते झाड तावडतोब मरेल ! या शहाणपणास ह्मणावे तरी काय?

१०. हा समार व एकदर सामाजिक व्यवस्था यात खरी सुधारणा व्हावी असे असेल तर, व तद्विषयक खरी मते व खरे विचार यांची उन्नति व्हावी, व त्याचा प्रसार व्हावा, हे इष्ट असेल तर, या कामांत ज्या अनेक अडचणी आहेत, त्या पैकी एक मोठी जबरदस्त आहे, ती दूर झाली पाहिजे. ती अडचण, मनुष्याच्या वर्तनावर जे अनेक परिणाम घडतात, व मनुष्याच्या स्वभावघटनेची जी अनेक कारणे असतात, किंवा ज्या अनेक बाह्य उपाधि त्या घटनेस कारणीभूत होतात, त्यांविषयी मनुष्याचे अनिर्वाच्य अज्ञान असणे व त्याजकडे दुर्लक्ष करणे ही होय. कोणत्याही माणसाची एका विवक्षितकाळी जी स्थिति असेल, तीच स्थिति स्वाभाविक व नित्याची आहे, अशी लोकांची समजूत असते. परंतु ही मोठी चूक आहे. त्याच्या परिस्थितीचे साधारण जरी ज्ञान आपणास झाले, तरी देखील ती स्थिति त्या माणसांस कां प्राप्त झाली, याचे कारण आपणास स्पष्ट कळते. कर्जाच्या बोजाने शेतकरी हताश, अनुत्साह व निरुद्योगी झाले, असे पाहून '**ऐर्लंडांतील** शेतकरी स्वभावतःच आळशी आहेत,' असे बेधडक लोक अनुमान करितात ! जेव्हां अधिकारारूढ झालेली मंडळी आपली हत्यारे लोकांवरच उचलितात, व ज्या प्रजेने त्यांस अधिकार दिला, त्या

प्रजेसच पीडा देऊं लागतात; तेव्हां सहजच राज्याचा बिघाड होतो. एवढ्यावरून **फ्रेंच** लोक स्वतंत्र व प्रजासत्ताक अशा राज्यास अयोग्य आहेत, असे ह्मणणारे हरीचे लाल आहेतच! **ग्रीक** लोकांनी **तुर्क** लोकांस फसविले, आणि **तुर्क** लोकांनी **ग्रीक** लोकांस नुस्ते लुटले, येवढ्यावरून **तुर्क** लोक स्वभावतःच सत्यप्रिय आहेत, असे अनुमान कांहीं लोक तेव्हांच करितात! त्याचप्रमाणे, स्त्रिया राज्यकारभारात मुळींच मन घालीत नाहींत, व नट्टापट्टा करण्यात, किंवा आपलीं शरीरें शृंगारण्यातच अधिक मन घालितात, येवढ्याच गोष्टीवरून पुरुषाच्या पेक्षां स्त्रियांचे लक्ष सार्वजनिक व लोककल्याणाच्या कामांत कमी असते, व अशा कामांस स्त्रिया जात्याच अयोग्य आहेत, असा साहसाचा सिद्धांत ठोकून देण्यास तेच तर्कशास्त्री बिलकूल मागेपुढें पहात नाहींत! पूर्वीपेक्षां हल्लीं लोकास इतिहासाचे ज्ञान अधिक झाले आहे. तेव्हां इतिहासाचा अनुभव पहाता तो कांहीं निराळाच आहे. बाह्य कारणाचा परिणाम मनुष्याच्या स्वभावावर कांहीं विलक्षण होत असतो. आणि, त्या स्वभावाचे प्रकार सर्वत्र एकसारखेच व एकाच स्वभावाचे असतात, अशी जी समजूत आहे, तशी गोष्ट नसून त्या मनुष्यस्वभावास फारच विचित्र व भिन्न भिन्न स्वरूप प्राप्त होतात, ही गोष्ट मनुष्ये सर्वथा विसरतात. इतिहासवाचनापासून लोकास जो खरोखर उपदेश व्हावा तो हाच. परंतु, हा उपदेश माणसाच्या मनावर ठसणे कठिण आहे, असे दिसते. कारण, ज्याप्रमाणे प्रवासात माणसाच्या मनावर ज्या गोष्टींचे ठसे पूर्वी उमटले असतील, त्याच गोष्टी त्यांस दिसतात, त्याचप्रमाणे इतिहासाध्ययनाचीही गोष्ट आहे. ह्मणजे, इतिहास वाचणाऱ्याच्या मनावरही पूर्वी एकदा जे ठसे बठलेले असतात, तेच कायम रहातात. यामुळे, इतिहासाच्या वाचनापासून जो मुख्य फायदा व्हावयाचा तो मुळींच होत नाहीं.

२०. यास्तव, स्त्रीपुरुषांमध्ये स्वाभाविक भेद कोणते आहेत, हा जो अत्यंत कठिण प्रश्न व ज्या संबंधाची पूर्ण व यथार्थ माहिती मिळणें लोकांच्या प्रस्तुत स्थितींत सर्वथा अशक्य होय, अशा या महत्वाच्या विषयावर प्रत्येकजण हवें तसें मत ठोकून देतो. यामुळें असें होतें कीं, या विषयाचें वास्तविक अंतशः होणारें जें ज्ञान, त्या ज्ञानाच्या साधनाकडे बहुतेक सर्वजण दुर्लक्ष करितात, व तें तुच्छ मानितात. हें साधन कोणतें ह्मणाल तर, मानसशास्त्राच्या एका अत्यंत महत्वाच्या शाखेचा दृढ अभ्यास करणें. या शाखेमध्यें मुख्यत्वें याच विषयाचें प्रतिपादन केलेलें असतें. त्यांतील विषय, किंवा त्यांत ज्या प्रश्नाचा विचार केलेला असतो, तो हा कीं, मनुष्य ज्या परिस्थितींत असतो, त्या परिस्थितीचा परिणाम त्या मनुष्याच्या एकदर वागणुकीवर, किंवा वर्तन क्रमावर कसा घडतो? कारण, स्त्रीपुरुषामधील नीतिसंबंधाचे व बुद्धिसंबंधाचे भेद कितीही मोठे व अपरिहार्य दिसले, तरी ते भेद स्वाभाविक आहेत, अशी कल्पना करण्यास प्रमाण ह्मणून कायतें अभावेंकरूनच मिळावयाचें. ह्मणजे, हे भेद शोधून काढण्यास अन्वयव्यतिरेकन्यायाचाच उपयोग केला पाहिजे. जे भेद कृत्रिम असू शकणारच नाहींत, तेवढे भेद स्वाभाविक आहेत, असें अनुमान करणें योग्य होईल. पूर्वी मिळालेलें शिक्षण, किंवा बाह्यस्थिति, यांच्या योगानें उत्पन्न होण्या-सारखा जो जो गुण दोहोंपैकीं प्रत्येकाच्या अंगीं आलेला असेल, तो तो सोडून दिला पाहिजे. आणि शेवटीं अवशिष्ट ह्मणून जेवढे गुण रहा-तील, तेवढेच स्वभावसिद्ध, किंवा सृष्टिदत्त आहेत, असें मानितां येईल. मनुष्याचा वर्तनक्रम ज्या ज्या नियमांवर अवलंबून असतो, त्या त्या नियमांचें संपूर्ण ज्ञान प्राप्त करून घेतल्याशिवाय, स्त्रीपुरुषांमध्ये मुळीं कांहीं भेद आहे किंवा नाहीं, हे सांगण्याचा अधिकारच कोणास पोंचत नाहीं. मग ‘ तो भेद अमुकच आहे ’ असें ह्मणण्याचा अधिकार

तर दूरच राहिला ! आणि ज्या अर्थी या विषयाचे ज्ञान अद्यापि एकासही नाही, ( कारण, हा विषय इतका महत्वाचा असून, त्याचा अभ्यास कोणीच करीत नाही ) त्या अर्थी या विषयावर खात्रीपूर्वक अभिप्राय देण्यास कोणासही अधिकार नाही. हल्ली केवळ तर्कमात्र हवेतसे चालवितात. हे तर्क, मानसिकशास्त्राचे नियम कमीजास्त प्रमाणाने जसे ज्यास कळत असतील, त्या मानाने खरे किंवा खोटे ठरण्याचा संभव असतो.

२१. प्रस्तुत काळी स्त्रीपुरुषामधील भेद काय आहेत, या गोष्टीची माहिती देखील फारच वेडीवाकडी व अपुरती आहे. मग ते भेद कशाचे योगाने उत्पन्न झाले आहेत, या विषयीची माहिती तर दूरच राहिली. वैद्यकाचा धंदा करणाऱ्या लोकांनी व शरीरशास्त्रवेत्त्यांनी स्त्रीपुरुषामधील शरीरसंबंधाचे भेद अंशतः शोधून काढिले आहेत. शरीरविज्ञान मानसशास्त्रवेत्त्यास फारच महत्वाचे आहे. परंतु, आमच्या दुर्दैवाने वैद्यकाचा धंदा करणारापैकी मानसशास्त्र जाणणारा असा फारच क्वचित् आढळतो. यामुळे, स्त्रियांच्या मनोधर्मांचे ज्ञान साधारण मनुष्यास जे असते, त्यापेक्षा त्यास कांही विशेष असते, असे नाही. हा विषय असा आहे की, त्या संबंधाचे निश्चयात्मक ज्ञान होणे बहुतेक अशक्यच आहे. कारण, त्या विषयाचे वास्तवीक ज्ञान ज्यास असावयाचे, अशा ज्या स्त्रिया त्यांनी आपण होऊन जगापुढे कांहीच गोष्टी आणिल्या नाहीत. आणि जो थोडासा मजकूर त्याच्या मुखाने कोठे कोठे सांगण्यात येतो, तो बहुतेक शिकविलेल्या साक्षीदाराच्या मजकुरासारखा असतो ! यामुळे तो विश्वसनीय नाही. कारण, मूर्खपणा हा बहुतेक सर्वत्र सारखाच असतो. मूर्ख मनुष्याच्या कल्पना अथवा त्याचे विचार, नेहमी त्याच्या सभोवती असणारी जी मंडळी असते, तिचे जसे विचार असतील त्याप्रमाणे बहुधा असतात. परंतु, ज्यांचे

विचार व ज्यांचीं मतें, हीं स्वतः सिद्ध व स्वयंभू अशीं असतात, त्यांची गोष्ट कांहीं निराळीच आहे. आपल्या कुटुंबांतील स्त्रियांच्या स्वभावाचें किंवा मनोधर्माचें ज्ञान ज्यास आहे, असा क्वचित् एखाददुसरा पुरुष आढळेल. स्त्रियांच्या बुद्धीची धांव, किंवा त्यांची कर्तृत्वशक्ति, हिला उद्देशून माझें हें ह्मणणें आहे, असें नाहीं. कारण, प्रत्यक्ष स्त्रियासही प्रसंगाशिवाय आपली कर्तृत्वशक्ति किती आहे, हें कळत नाहीं. मग पुरुषांस ती कोठून कळेल? माझें ह्मणणें इतकेंच कीं, स्त्रियांच्या मनांत जे खरोखर विचार येतात, किंवा त्यांस जें कांहीं वाटत असतें, याची माहिती ज्यास आहे, असे पुरुष दुर्मिळ. बऱ्याच स्त्रियांशीं आपला शरीरसंबंध झाला आहे, एवढ्याच गोष्टीवरून पुष्कळ पुरुषांस असें वाटतें कीं, आपणास स्त्रियांची पूर्ण माहिती आहे. अशा पुरुषांपैकीं जर कदाचित् एखादा सूक्ष्मदर्शी असला, व त्याच्या अनुभवास आलेल्या स्त्रियांपैकीं कांहीं बुद्धिमान्, सुशील अशा असल्या, तर, त्यांच्या स्वभावाचा कांहींएक अल्पस्वल्प भाग कदाचित् त्यास कळेल. परंतु, बाकीचा सर्व भाग त्यास कळण्याचा संभवच नसतो. कारण, अशा स्त्रियांचा ज्या पुरुषाशीं शरीरसंबंध होतो, त्याजपासून त्या आपल्या अंतःस्वरूपाचा किंवा आपल्या स्वभावाचा बराच भाग छपवून ठेवितात. एक प्रत्यक्ष नवऱ्यास मात्र आपल्या स्त्रीचा स्वभाव कळण्याचा संभव असतो. कारण, त्यास स्वस्त्रीच्या स्वभावाचें ज्ञान प्राप्त करून घेण्यास प्रसंग पुष्कळ असतात. परस्पराविषयीं खरें प्रेम असल्यास परस्परांचे स्वभाव किंवा परस्परांचीं अंतरंगें परस्परांस ओळखतां येण्याला बरेंच साधन असतें. आणि, खरोखर प्रस्तुत विषयाच्या संबंधानें जी कांहीं उपयुक्त माहिती जगापुढें आली आहे, तिचा मुख्य उगम पहातां असाच आहे. परंतु, बहुतेक पुरुषांस अशा प्रकारची माहिती मिळविण्याचें साधन कायतें एवढेंच असतें. ह्मणजे, ज्याच्या त्याच्यापुढें आपल्या बायको-

चेंच कायतें एक उदाहरण असतें. यामुळें, एखाद्या नायकोचा स्वभाव कसा आहे, याचें अनुमान करणें असेल तर, एकदर स्त्रियांवि षयीं त्या मनुष्याचे जे विचार, किंवा जीं मतें असतील, त्यांवरून तें सहज होण्यासारखें असतें! शिवाय, हें एकच जें उदाहरण त्याजपुढें असतें, त्या संबंधानेंही प्रतिकूळ अशा पुष्कळ गोष्टी असतात. एक तर, कदाचित् त्या पुरुषाची स्त्री मोठी शहाणी किंवा धूर्त अशी नसेल. दुसरी अडचण अशी असते कीं, तो पुरुष नुसता मोठा तर्कज्ञ, किंवा नुसता सत्यप्रिय असून उपयोगी नाहीं. तर, जिच्या स्वभा वाची माहिती त्यास मिळवावयाची असेल, तिचीं सुखदुःखें त्यास कळत असून, तिच्यावर त्याचें खरें प्रेम असलें पाहिजे, कीं - जेणेंकरून तो नुसता तिचे मनांत काय चाललें आहे हें ताडील. आणि सर्वांत अत्यंत महत्वाची एक गोष्ट आहे ती ही कीं, त्याच्यांत— जेणेंकरून त्याची स्त्री आपलीं मतें किंवा आपले विचार त्याजपासून चोरून ठेवील—असा एखादा दोष नसला पाहिजे. तेव्हां, अशा प्रकारच्या स्त्रीपुरुषांचा संयोग, ह्मणजे कपिलाषष्ठीचाच योग ह्मणावयाचा कीं नाहीं?* संसारांतील किंवा व्यवहारांतील ज्या एकदर गोष्टींची व्यवस्था व्हावयाची, ती पुष्कळ ठिकाणीं दोघांच्या पूर्ण ऐक्यानें, ह्मणजे, एकमेकांच्या संमतीनें व दोघांचें हिताहित पाहून होत असते. परंतु, दोघांच्या अंतर्यामाच्या गोष्टी, किंवा त्यांचे अंतरंग-विचार, यांविषयीं ह्मणाल तर, एकाचा प्रवेश दुसऱ्याच्या हृदयांत होत नसतो, असें आढळतें. इतकेंच नाहीं, तर, या संबंधानें इतर लोकांच्या तोंडओळखीसारखीच या दोघांचीही तोंडओळख असते! ज्या स्त्रीपुरु

* प्रस्तुतस्थळीं **उत्तररामचरितांत रामचंद्रानें जानकी**चे प्रेमाबद्दल 'अद्वैतं सुख-दुःखयोरनुगुणं' इत्यादि वर्णन करून शेवटचे चरणांत 'भद्रं प्रेम सुमानुषस्य कथमप्येकं हि तत्प्राप्यते' हा जो उदगार काढिला आहे, त्याचें स्मरण रसिक व मार्मिक वाचकांस झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

यांमध्ये खरी प्रीति असते, त्या ठिकाणी देखील या गोष्टीचा अभावच असतो. कारण, पतीच्या मनात मी हिच्याहून श्रेष्ठ आहे, हिजवर माझा अधिकार आहे असा भाव रहातो. इकडे स्त्रीला वाटते की, मी यांची बोलूनचालून दासी आहे. यामुळेच एकमेकांवर एकमेकाचा पूर्ण भरवसा बसत नाही. आपले विचार किंवा आपली मते, ती जी चोरून ठेवीत असतात. ती तसे बुद्ध्याच करितात, असे माझे ह्मणणे नाही. माझे ह्मणणे इतकेच की, आपण होऊन दाखविण्याचा किंवा सांगण्याचा जो भाग असतो, तो बऱ्याच अंशाने छपविला जातो. ज्या ठिकाणी श्रेष्ठकनिष्ठत्वभाव असतो, अशा पितापुत्राच्या नात्यामध्येही अशीच गोष्ट पुष्कळांच्या पहाण्यात आली असेल. एकमेकांचे एकमेकांवर पुष्कळ प्रेम आहे, अशा ठिकाणीही मुलाच्या स्वभावाची खरी ओळख बापास झाली आहे, अशी किती बरे उदाहरणे आढळतील? त्या मुलाचे जे स्नेही किंवा बरोबरीचे असतात, त्यास याच्याविषयी खडानखडा माहीत असतो, ही गोष्ट पुष्कळांच्या अनुभवातली आहे. तेव्हा, या गोष्टी तले इंगित इतकेच की, श्रेष्ठपणाच्या नात्यामुळे, खरेपणाने व मन मोकळे करून बोलण्यास पुष्कळ अडचणी किंवा प्रतिकूळ गोष्टी असतात. आपल्याविषयी आपल्या वडिलांचे जे ठरीव मत झालेले असते, किंवा आपले-विषयी त्यांस जी ममता असते, ती कधीही कमी होऊ नये याकरितां जरी तो मुलगा सत्यप्रिय असला, तरी आपले विचार चांगले असतील तितकेच तो बापास कळवितो. किंवा चांगले असूनही बापास जर ते आवडण्यासारखे असतील, तर मात्र तो ते बापास कळवितो. आणि वास्तविक पहातां, सर्वसाधारणसिद्धांत असाच आहे की, जिव-लग स्नेही असूनही जर ते त्याच्या बरोबरीचे असतील, तरच त्यास तो आपले खरे विचार व खरी मते कळवील. स्त्रियांची गोष्ट तर याहून फारच निराळी. त्या दुसऱ्याच्या ताबेदार असतात. इतकेच नाही,

तर पतीला जेणेकरून सुख व समाधान होईल अशाच गोष्टी करण्याकरितां आपण जन्मास आलो आहो, अशी त्यांची पहिल्यापासून समजूत करून दिलेली असते. पतीची मर्जी जात राहील अशी कोणतीही गोष्ट करू नये हेच आपले कर्तव्य. असा पाढा तिला जन्मभर पढविलेला असतो. असो. तेव्हां, जिच्या स्वभावाची, जिच्या विचाराची, किंवा मताची पूर्ण ओळख करून घेण्यास पुष्कळ वेळ व पुष्कळ प्रसंग असतात, अशा आपल्या स्वतःच्या स्त्रीविषयीं जरी ह्मटले, तरी देखील वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे अनेक प्रकारच्या अडचणी येतात. इतकेही करून जी काय थोडीशी माहिती मिळविण्यांत येईल, तेवढ्यावरून जर दुसरा कोणी ह्मणू लागेल की, मी इतर स्त्रियांचेही स्वभाव ओळखीन, तर तसे कदापि होऊ शकणार नाहीं. एखाद्याने एकाच स्थितीतल्या किंवा सारख्याच स्थितीतल्या पुष्कळ स्त्रियांची माहिती प्राप्त करून घेतली, किंवा देशांतल्या साऱ्या स्त्रियांच्या स्वभावांची माहिती मिळविली, अशी कल्पना केली, तरीदेखील तेवढ्यावरून साऱ्या स्थितीतल्या किंवा साऱ्या देशांतल्या स्त्रियांची माहिती त्यास झाली आहे, असे ह्मणता येणार नाहीं. आणि इतकेही करून तो जी माहिती मिळविणार, ती इतिहासातल्या एखाद्याच काळाविषयीं असणार, हेही उघड आहे. यावरून, आह्मास इतके ह्मणण्यास कांहीं एक हरकत दिसत नाहीं की, पुरुष हे स्त्रियांच्या संबंधाचे जे ज्ञान प्राप्त करू शकतील, ते, भविष्य काळची त्यांची स्थिति मनांत न आणिता, केवळ भूतकाळास व वर्तमानकाळास उद्देशूनच असणार. आणि तेही फारच अपुरते व वरवरचे असे असणार. आणि ही स्थिति, जोपर्यंत स्त्रिया स्वतः, त्यांस जे कांहीं बोलून दाखवावयाचे असेल, ते बोलून दाखविण्यास समर्थ झाल्या नाहींत, तोपर्यंत अशीच कायम रहाणार.

२२. अशा प्रकारची वेळ अजून आली नाहीं. आणि यावयाची असेल तर तीही एकदम न येता, हळूहळूच येणार. स्त्रियांस शिक्षण मिळू लागून, समाजाला काय सांगावयाचें ते त्यांनी निर्धास्त-पणें सांगावें, अशा प्रकारची त्यांना मुभा मिळून, नुकतेच कांहीं दिवस लोटले आहेत. तेव्हां, त्यांच्यापैकीं थोड्याजणीच आपलें गाऱ्हाणें जगास सांगण्यास पुढें सरसावतात. तशांतूनही स्त्रियांचें सर्व शिक्षण पुरुषांवर अवलंबून असल्यामुळे, पुरुष त्यांचें गाऱ्हाणें ऐकण्यास बहुधा नाखुषच असतात. ही स्त्रियांची गोष्ट तर राहोच. पण एखाद्या ग्रंथकर्त्यानें रूढीविरुद्ध, किंवा संप्रदायाविरुद्ध आणि कांहीं अशी नवीनच, असे आपले विचार प्रकट केल्यास, परवांपरवांपर्यंत ते लोकांस आवडत नव्हते. किंवा अजूनही ते लोकांस आवडतील असें नाहीं. रूढि व लोकमत यांस अनुसरून चालणें, हेंच आपलें कर्तव्य होय, अशी स्त्रियांच्या मनाची समजूत घालून दिल्यामुळे, ग्रंथद्वारा आपले स्वतंत्र विचार प्रदर्शित करण्याचा यत्न जी स्त्री करील, तिच्या मार्गांत किती अडचणी येतात, याची साधारण कल्पना वाचकांच्या ध्यानांत येणार आहे.

**म्याडम् स्टाल्** या नांवाची एक प्रसिद्ध ग्रंथकर्त्री **फ्रान्स** देशांत होऊन गेली. या थोर स्त्रीनें जे ग्रंथ लिहून ठेविले, त्यांच्या योगानें तिनें आपल्या देशांतील ग्रंथकर्त्यांच्या मालिकेंत आपणास उत्तमोत्तम स्थान प्राप्त करून घेतलें. या बाईच्या **डेल्फिन्** नांवाचा जो ग्रंथ आहे, त्या ग्रंथाच्या मुखपृष्ठावर जो शिरोलेख, किंवा जें एक सांकेतिक वाक्य दिलें आहे, ते खालीं लिहिलेल्या अर्थाचें आहे:—

" लोकमताला गुंडाळून एकीकडे ठेवण्याचें धाष्टर्य पुरुषांच्या हातून होतें. पण तशी गोष्ट स्त्रीच्या हातून घडत नाहीं. तिला लोकमत शिरसा मान्य करावेंच लागतें. " प्रस्तुतकाळीं स्त्रियांच्या संबंधानें स्त्रिया जे कांहीं

करण्यास योग्य
व्यवहारांत किती व
महत्वाचा व परमगहन
आपणास पूर्ण ज्ञान आहे अ
देणें, किती कठिण व उपहासा
यांच्या संबंधानें स्त्रियांची स्थिति क
व्यवहाररीत्या आवश्यकता नाहीं. हं
वयाची. कारण, अर्वाचीन समाजतत्त्व
असतां, या प्रश्नाचा उलगडा प्रत्यक्ष स्त्रियांनींच
तो त्यांनी आपल्या अनुभवाप्रमाणें व बुद्धिसामर्थ्या
कोणा एका व्यक्तीला किंवा अनेक व्यक्तींना अमुक का
किंवा नाहीं, हें कळण्यास मार्ग किंवा साधन ह्मटलें ह्मणजे,
पहाणें. या शिवाय दुसरें साधनच नाहीं. त्याचप्रमाणें, अमुक गोष्ट
पासून सुख होईल व अमुक गोष्टी केल्यापासून सुख होणार नाहीं,
एकाकरितां दुसऱ्यानें ठरवावें ह्मटलें, तर तसें करण्यासही साधन नाहीं.

२४. स्त्रियांविषयीं एक गोष्ट मात्र आपणास खातरीनें सांगतां येईल. ती ही कीं, त्यांस केवळ मोकळीक किंवा स्वातंत्र्य दिलें ह्मणून तेवढ्यानेच त्यांच्या स्वभावास अगदी विरुद्ध असें एखादें कृत्य त्यांच्या हातून घडेल असें कधींही होणार नाहीं. तसेंच, सृष्टीच्या किंवा निसर्गाच्या तर्फेनें माणसांनी मध्यस्थी करण्याची खरोखर मुळींच गरज नाहीं. सृष्टीचे हेतु निष्फळ होतील, सृष्टीला आपले मनोरथ आपल्या हातून पार पाडितां येणार नाहींत, अशी भीति बाळगण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. कारण ही भीति व्यर्थ आहे. ज्या गोष्टी करण्यास स्त्रिया जात्याच असमर्थ आहेत, त्या त्यांनीं करूं नयेत, अशा-बद्दल यत्न करणें निरर्थक आहे. ज्या गोष्टी त्या करूं शक-

.बरी करावयाची आहे
.रितां येणार नाहीत अशा
करणे कठीण आहे असे सम-
.डून देतील. कारण, स्त्रियांवर
.ाहन मिळावे ह्मणून, अमुक गोष्ट करा.
ह्मणणे एवढेच की, एकट्या पुरुषांच्याच
गोष्टी आहेत, त्या नसाव्या. काही गोष्टी-
.ांची बुद्धि विशेष चालते, ही गोष्ट जर खरी
.कच गोष्टी स्त्रियांनी कराव्या व अमुक करू नये, असा
.दा असण्याची जरूर नाही. किंवा समाजाने बुद्धिपुरस्सर
.बंध करण्याची अवश्यकता नाही. ज्यास पाहिजे तो धदा
. करावा, अशी मुभा ठेविली असता जो अधिक बुद्धिमान् व
.धिक योग्य, अधिक समर्थ किंवा हुशार असेल, तोच त्या कामास
लायक ठरेल. या तत्वास अनुसरून जी जी कामे स्त्रियास उत्तम
प्रकारे करितां येतील ती तीच कामे त्या करतील, दुसरी करणार नाहीत.
जी कामे स्त्रियांपेक्षां पुरुषास उत्तमप्रकारे करिता येतील, त्या कामांत
स्त्रिया हातच घालणार नाहीत, हेही उघड आहे. तेव्हा, याप्रमाणे
यदृच्छेची निवडणूक झाली असता, व यदृच्छेने श्रमविभाग झाला
असतां स्त्रीपुरुषांपैकी उभयतांचेही बुद्धिसामर्थ्य व संघशक्ति एकवट
होऊन, एकंदर समाजाच्या सुखाची अभिवृद्धि होणार आहे. आणि
ही अशी व्यवस्था एकंदरीत अत्यत कल्याणप्रद व हितकारक अशी
होणारी आहे.

२५. पुरुषाचे साधारण मत असे दिसते की स्त्रियांस सृष्टीनें
लावून दिलेली कामे ह्मणजे दोन. बायको होणे व आई होणें.
'दिसते' असे ह्मणण्याचे कारण, प्रस्तुत समाजाची जी रचना आहे,

तिचा सूक्ष्म विच।
असावा, असे वाटते.
ज्या कामांची योजना स्त्रि
स्त्रियांस नापसत असून ती त्
यांस वाटले असावे. वर निर्दि
इतर कामे करण्याची त्याना मुभा ठे।
त्यांच्या हातात दिली, त्यांस इष्ट असत
काळ व आपले बुद्धिसामर्थ्य यांचा विनियोग
' सृष्टीनें लावून दिलेलें काम ' ह्मणून त्यांच्यावर
करण्यास राजी होणार नाहींत, अशी पक्की समजूत पुरु
खरोखर, एकदर पुरुषजातीची जर अशीच समजूत असे
उघड बोलून दाखवावी हीच गोष्ट चागली. कोणी एखाद्या पडि
लिहिलेले मत उघड उघड प्रतिपादन करावे (या विषयावर आज
लेख आलेआहेत त्यांचा रोखही असाच आहे): -"स्त्रियांनी लग्न करून प्र
उत्पन्न करणे हे समाजास अवश्य आहे. त्यांजवर जुलूम केल्याखेरीज ही गोष्ट त्या कबूल करणार नाहीत. तस्मात्, त्याजवर जुलूम करणे जरूर आहे !" असा एक सिद्धांत जगापुढे मांडला गेला, ह्मणजे त्याच्या गुणदोषांचे विवेचन करण्यास ठीक पडेल. अमेरिकेंतली गुलामगिरी योग्य आहे व अवश्य आहे ह्मणून अस्तिपक्षाच्या तर्फेने जे भाडत होते, त्यांचेही ह्मणणे अशाच प्रकारचें होते. ते ह्मणत:-"कापूस आणि साखर यांची लागवड करणे जरूर आहे. गोऱ्या लोकांस लागवड करितां येत नाही. सिद्दी किंवा काळे लोक यांस कितीही वेतन किंवा रोजमुरा दिला तरी लागवडीचें काम ते करणार नाहीत. तस्मात्, त्यांजवर जुलूम केलाच पाहिजे !" याहीपेक्षां जवळचे असे दुसरे एक उदाहरण ह्मटले ह्मणजे जुलूमाने खलाशी करावयाचे. ते असे:-"देशाचे सरक्षण करण्याकरितां लढाऊ

।. ते आपल्या खुशीनें
वारंवार घडते. तस्मात
.धिकार कोणाला तरी दिलाच
.त्य? आणि अशाच पांडित्याचा
ुष्कळ प्रसंगी लोकांनी लढविले आहे.
एक मोठी गोम नसती, तर आजकालसुद्धा
तर्कशास्त्र दडपून दिले असते. पण त्यांत
यहा:—वरच्या प्रतिपादनाचे खंडन अशा रीतीने
'अहो, प्रथम ग...र्शी लोकांस त्याच्या मेहनतीबद्दल
, किंवा योग्य मुशाहिरा द्या. आणि दुसऱ्या धन्याची
करण्यांत जितका फायदा त्यास होईल तितकाच फायदा
ा चाकरी करण्यापासून त्यास होईल, अशी तजवीज तुह्मी करा.
ह्मणजे इतरांप्रमाणे तुमची नौकरी करण्यास ते कबूल होतील व तुह्मां-सही चाकर मिळण्यास पंचाईत पडणार नाही.' या आमच्या बोलण्यावर तुमचे बोलणे ह्मणजे "असें करण्याची आमची खुषी नाही!" एवढेच असणार की नाही? प्रस्तुतकाली लोकांस गरीब बिचाऱ्या मजुराचा मुशाहिरा चोरण्याची लाज वाटते, एवढेच नाही, तर तसें करण्यास आजकाल लोक इच्छितही नाहीत. यामुळे आरमारांत लोकांनी यावे, ह्मणून त्यांजवर सक्ती करण्याची जी पूर्वी पद्धत होती ती योग्य होती, असें ह्मणून आजकाल कोणीही तिचा कैवार घेऊन भांडत नाही. स्त्रियांनी विवाहित स्थितींत शिरलेच पाहिजे ह्मणून बाकीच्या सर्व धंद्यात शिरण्याची मनाई करून, बायका-कडून सक्तीने लग्न करविण्याचा जे कोणी यत्न करितात, त्यांसही उत्तर तेच दिले पाहिजे. ते जे ह्मणतात, त्यात काही अर्थ असेल, तर त्यांचा अभिप्राय असें ह्मणण्याचा उघड असा दिसतो की, विवाहित

स्थिति स्त्रियांस इष्ट होण्यासारखी पुरुष करीत नाहीत. ह्मणजे, विवाहितस्थितीचा विचार स्त्रिया आपण होऊन स्वखुषीने करतील असा तिच्यात मुळचा कांही चांगुलपणाच नाही. एखाद्याने एखाद्यास कांही देणगी दिली, व ती अशी की, 'घेशील तर हीच घे. नाही तर कांहीच मिळणार नाही!' असा जेव्हां प्रकार होतो, तेव्हां ती देणगी देणाऱ्यास त्या दानविषयक पदार्थात अत्यन्त आकर्षक धर्म आहे असे वाटत असल्याचे हे लक्षण नव्हे. आणखी, मला असे वाटते की, स्त्रियांस आपल्या बरोबरीचे स्वातंत्र्य देण्याचे कामात जे लोक खरोखर विरुद्ध असतात, त्यांच्या अंतःकरणात हीच गोष्ट असते. माझी अशी समजूत आहे की, स्त्रिया लग्न करण्यास नाखुष असतील अशी आशंका किंवा भीति पुरुषाच्या मनात कधीच येत नाही. तर लग्न व्हावयाचे ते बरोबरीच्या नात्याने व्हावे, अशाविषयी त्या आग्रह धरतील, हीच भीति पुरुषास वाटते आणि लग्न करणे याचा अर्थ ज्यापेक्षा आपणास धनी करून घेणे एवढाच नव्हे, तर. आपली जी सर्व मालमत्ता तीही त्या धन्याला अर्पण करणे असा आहे, त्यापेक्षां खरोखर बुद्धिमान् व पाणीदार अशा सर्व स्त्रिया, त्यांच्या दृष्टीने कमीपणा उत्पन्न होत नाही असा दुसरा पाहिजे तो धंदा त्या पतकरतील, पण लग्न करणार नाहीत, अशीही भीति पुरुषाच्या मनांत असते. आणखी, लग्नाचा परिणाम आपण दुसऱ्याचा दास होऊन राहणे व आपल्या मालमत्तेवरील आपला सर्व हक्क गमावणे, असाच जर होत असेल तर, मला वाटते की, पुरुषांच्या मनात ही जी शंका येते, तिला बराच आधार आहे असे ह्मटले पाहिजे. मला खास असे वाटते की, संसारामध्ये प्रतिष्ठेची व मानमान्यतेची कामे करण्याची मोकळीक जर स्त्रियास असेल, तर एखाद्या विलक्षण मोहनीअस्त्राच्या किंवा मोहजालाच्या तडाक्यांत सांपडून त्याचे देहभान व विचारशक्ति सर्वथा नष्ट झाल्याशिवाय, दुसरा एखादा

व्यवसाय करण्याचें ज्यांना सामर्थ्य आहे, अशा स्त्रियांपैकीं थोड्याच स्त्रिया अशी स्थिति पतकरतील! विवाहाचा कायदा ह्मणजे जुलुमाचा प्रकार असलाच पाहिजे, असें एकदां पुरुषांनी ठरवून टाकिलें, ह्मणजे स्त्रियांना बायको होण्याचाच धंदा पत्करिला पाहिजे, हे ह्मणणें केवळ युक्तीच्या दृष्टीनें बरोबर आहे. परंतु असें असेल तर स्त्रियांच्या मनावरील अज्ञानाचें पटल दूर करण्याविषयीं शिक्षणदानादि वगैरे जे अर्वाचीन प्रयत्न करण्यांत येत आहेत, ते चुकीचे होत. स्त्रियांस उदार किंवा उच्चप्रतीचें शिक्षण देणे अगोदरच योग्य नव्हते. प्रस्तुतच्या लोकव्यवहाराच्या स्थितींत वाचावयास शिकलेल्या व विशेषत: लिहिण्यास शिकलेल्या स्त्रिया ह्या प्रस्तुत काळाशीं विसंगत असून, लोकसमाजाच्या शांततेचा क्षोभ करणाऱ्या आहेत. एवढेंच नव्हे, तर घरकाम करणारी एखादी मोलकरी दासी, किंवा तुर्कस्थानांतील सुलतानाच्या गोषांत रहाणारी एखादी बटिक, हिला अवश्य लागणारे जे गुण किंवा जें शिक्षण त्याशिवाय अन्यप्रकारचें शिक्षण स्त्रियांस देण्यांत आलें ही भयंकर चूक झाली!

---



# भाग २.



१. ग्रंथपर्यंत प्रस्तुत विषयाचा साधारण विचार झाला. आता आपल्या विषयाचा एक विवक्षित भाग घेऊन त्याचा विचार करूं. या देशात व इतर सर्व देशांत विवाहसंबंधाच्या कायद्यानें काय काय निर्बंध किंवा नियम करून ठेविले आहेत ते पाहूं. लोक-समाजानें स्त्रियांची वृत्ति व त्यांच्या आयुष्याचें मुख्य कर्तव्य ह्मटलें ह्मणजे 'विवाह करून घेणें' हेंच होय असें ठरवून टाकिलें. लग्न करणें हाच कायतो परमार्थ व तो प्राप्त करून घेण्यास सर्व स्त्रियांनीं झटावें, त्याखेरीज त्यास अन्य गतीच नाहीं, असें धर्मशास्त्रानें ठरवून टाकिलें.* अर्थात आमचे देशांत (इंग्लंडांत) ज्या स्त्रिया कुरूप असतात व त्यामुळें त्यांस कोणी पसंत करीत नाहीं, त्यांची गोष्ट मात्र निराळी. आतां कोणास असे वाटेल की, याप्रमाणे योग्य रीतीची विवाहव्यवस्था ठरल्यावर स्त्रियांची तक्रार नसावी. कारण न्याय्य गोष्ट तीच कायद्यांत सांगितली आहे.

* या प्रश्नाचे संबधाने आमचे प्राचीन आर्यग्रंथ पाहिले असता बरीच महत्वाची, मनोरंजक व बोधप्रद माहिती मिळण्यासारखी आहे. श्रीमद् विद्यारण्यानां जीवन्मुक्ति विवेक नामक ग्रंथांत 'स्त्रीणामपि प्राग्विवाहाद्वा वैधव्यादूर्ध्वं संन्यासेऽधिकारोऽस्तीति दर्शितम्' ह्मणजे स्त्रियाना विवाहापूर्वी अथवा वैधव्या नंतर संन्यास घेण्याचा अधिकार आहे असें ह्मटलें आहे या ग्रंथांत व अन्य ग्रथांतून उपलब्ध होणाऱ्या मैत्रेयी, सुलभा' वाचक्नवी, शार्ङ्गी, शांडिली या ज्ञाननिष्ठ तपस्विनींची परमपूज्य व परम पवित्र नांवें आह्मा आर्य ह्मणविणाऱ्यांनीं स्मरणांत ठेवण्यासारखीं आहेत.

ज्या स्त्रियांस जे पुरुष पसंत पडतील त्यांच्याशीच त्यांची लग्ने लागतात. आणि विवाह तर दोघांसही इष्ट असून स्वाभाविक आहे. तेव्हा स्त्रियांस विवाहाशिवाय गत्यंतर नाहीं असें जें ठरविलें आहे, त्यांत स्त्रियांवर कोणत्याही प्रकारचा जुलूम होत नसून त्यास कुरकूर करण्यास जागा नाहीं. यावर माझें असें ह्मणणें आहे कीं, वस्तुस्थिति याहून फार निराळी आहे. पूर्वीपासून लोकसमाजानें विवाहाच्या या कामांत आपला हेतु सिद्ध करून घेण्याचा योग्य व सरळ मार्ग सोडून देऊन अयोग्य व अन्यायाचा मार्ग धरिला आहे. विशेषेकरून स्त्रियांस लग्नाच्या विधीनें दास करून ठेवण्याच्या कामांत समाजाचा दुराग्रह आजपर्यंत जशाचा तसाच कायम आहे. अगदीं प्रथमारंभीं पुरुष स्त्रियांस जुलमानें आपल्या स्वाधीन करून घेत, किंवा त्यांच्या बापापासून बाजारांत इतर जिनसा जशा विकत घ्यावयाच्या त्याप्रमाणें खरोखरीच चकचकित मोल देऊन विकत घेत.*

आपल्या या युरोपखंडाचा इतिहास पाहतां असें दिसून येतें कीं फार थोड्या काळापूर्वी स्वपींस येईल त्या पुरुषास आपली मुलगी लग्नांत देण्याचा पूर्ण अधिकार बापास असे.† मुलीचा अभिप्राय किंवा विचार

* या आर्यावर्तांत एकाकाळीं चालू असलेल्या विवाहाच्या आठ प्रकारांपैकीं पैशाच, आसुर, राक्षस हे तीन प्रकार प्राचीन काळीं प्रचारांत होते त्याचा इतिहास वाचकांनीं लक्षांत आणावा. रोमन् लोकांमध्येंही बापापासून नवऱ्यानें मुलगी लग्नाकरितां विकत घेण्याचा विधि होता.

† मनूच्या व याज्ञवल्क्याच्या काळीं स्त्रियांचीं कर्तव्यें या संबंधाचे कांहीं नियम येणें प्रमाणें आहेत —"स्त्रीनें बालपणीं आपल्या बापाच्या ताब्यांत राहावें. यौवन दशेंत नवऱ्याच्या. तिचा पति जर मरण पावला तर तिनें आपल्या मुलांच्या हुकुमांत असावें. स्त्रीला कधींही स्वतंत्रता योग्य नाहीं. आपला पिता, पति किंवा पुत्र यांजपासून निराळें रहाण्याचा तिनें कधींही यत्न करूं नये. त्यांना जर तिनें सोडिलें तर आपल्या पतीच्या, त्याचप्रमाणें पित्याच्या–उभयतांच्याही कुळास तिनें कलंक लावल्यासारखें होईल. तिनें निरंतर आनंदित राहिलें पाहिजे गृहकृत्यें करण्यांत दक्षता

घेण्याची मुळींच गरज नसे. ही नीति, किंवा हा प्रकार ख्रिस्ती धर्माला अंमळ विरुद्ध होता. कारण ख्रिस्ती धर्माप्रमाणे नवरीची समति अवश्य असल्यामुळे विवाहाच्यावेळीं 'तूं या पुरुषाशीं लग्न करण्यास खुषी आहेस काय'? असा प्रश्न करून 'होय' ही अक्षरें नवरीच्या मुखानें वदवून घेण्याचा विधि उपाध्येबोवाला करून घ्यावा लागे. पण हें उघडच आहे कीं हें 'होय' स्वेच्छेचें नसून तो केवळ जुलमाचा रामराम असे. कारण बापानें हट्ट घेतलाच तर 'नाहीं' ह्मणण्याची खरोखर त्या मुलीची प्राज्ञा नव्हती. तिच्या मनांत नसलेच तर तिला एकच मार्ग मोकळा असे. तो हा कीं, तिनें आपलें आयुष्य धर्माचरण व तपश्चरण यांत घालविण्याचा निश्चय करून गोसावीण व्हावें.* आणि असें तिनें केलें ह्मणजे मग बिचाऱ्या बापाचा इलाज खुटे. कारण,

---

ठेविली पाहिजे, तिनें आपलीं भांडीं स्वच्छ घासून पुसून ठेवण्याची काळजी घेतली पाहिजे. व खर्चांत काटकसर केली पाहिजे. तिचा पिता किंवा पित्याच्या आज्ञेनें तिचा बंधु ज्याला देईल त्याच्या आज्ञेंत तिनें यावज्जीव राहिलें पाहिजे. आणखी, तो मृत झाल्यावर त्याची तिनें निंदा करूं नये तो यद्यपि सदाचारविहीन असला, चैनबाजी करणारा असला, त्याच्या अंगीं मुळींच सद्गुण नसले, तथापि पतिव्रता स्त्रीनें
उंच देवाप्रमाणें पतीला मान दिला पाहिजे. "पतीला सोडून स्त्रीनें व्रतवैकल्यें, दान
ह्मणून उपास वगैरे कांहीं एक करूं नये. जर पत्नी आपल्या पतीच्या आज्ञेंत राहील
समा तर त्याच कारणानें तिला स्वर्गप्राप्ति होईल"

भा (पहा मनुस्मृति. अ. ५ श्लोक १४८–१५१ व १५४, १५५)

· सनातन वैदिक धर्माचे कट्टे अभिमानी वे. शा स. रा. रा. बाळ गंगाधर टिळक बी. ए. एल् एल् बी यांनी आपल्या केसरी पत्राचे एका अंकांत (३१ मार्च १८९६) येणें प्रमाणें लिहिलें हे तें:–

"मुलीवर बापाची पूर्ण सत्ता आहे व तिच्या समतिखेरीज तिचें दानही जर त्यास करितां येतें तर वाङ्निश्चय करण्यास कोणती हरकत येते हें आह्मास समजत नाहीं."

* (पृष्ठ ७३ पानांत) दिलेली टीप पहा.

त्याकाळी धर्माचार्यांची सत्ताच अशी बलवत्तर असे. पण एकदां विवाह झाला ह्मणजे मग आपल्या स्त्रीस पाहिजे त्या रीतीने वागविण्याचा व तिचें हवें ते करण्याचा पूर्ण अधिकार पुरुषास असे. नवऱ्याविरुद्ध तिला कांहीएक करितां येत नसे. कायद्याच्या दृष्टीनें लग्नानंतर तिला स्वतंत्र अस्तित्वच नव्हतें. तिचें सर्वस्व काय तो नवरा. तो मारील किंवा तारील. आपल्या बायकोस पाहिजे तेव्हां सोडून देण्याचाही अधिकार पुष्कळ दिवस पर्यंत नवऱ्यास असे. परंतु, अशा प्रकारचा उलट अधिकार नवऱ्याच्या संबंधानें तिला नसे. ही स्थिति ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यापूर्वीची होती. इंग्लंडाच्या जुन्या कायद्यांत नवऱ्याला बायकोचा 'धनी' किंवा 'मालक' ह्मणत. फार काय, नवरा ह्मणजे बायकोचा 'राजा' असें समजत. पतिद्रोहाला किंवा पतिहत्येला जेवढी कडक शिक्षा असे, तेवढी कडक शिक्षा राजद्रोहाला किंवा राजहत्येलाही नसे. बायकोनें नवऱ्याचा वध केला तर त्या गुन्ह्याला 'राजद्रोह' असें ह्मणत. आणि अशा अपराध्याला जिवंत जाळून टाकण्याची शिक्षा ठरविली होती.

हे अनेक दुष्टपणाचे प्रकार आतां बंद झाले. ह्मणून पुरुष समजतात कीं, विवाहसंबंधाचा प्रकार प्रस्तुतकाळास उचित व जसा असावा (शा... आहे, त्यांत कमजास्त करण्यास जागाच नाहीं. आणि लोक धर्म, ...कांस नर है ...केका असें ह्मणून दाखवितात कीं, सुधारणा व ख्रिस्ती धर्म यांच्या प्र... स्त्रियांचे योग्य हक्क, त्यांस प्राप्त झाले आहेत. वास्तविक गोष्ट ... अशी आहे कीं, स्त्री आपल्या पतीची खरोखर गुलाम असून, हल्लीं चालू असलेल्या कायद्याच्या दृष्टीनेंही गुलामांपेक्षां स्त्रियांची स्थिति चांगली नाहीं. तिला नवऱ्याच्या आज्ञेत जन्मभर रहाण्याची जी प्रतिज्ञा विवाहप्रसंगीं करावी लागते, ती प्रतिज्ञा खरी करविण्याची सक्ती कायद्याला करितां येते. कांहीं लोक ह्मणतील कीं, स्त्रियांच्या

आज्ञाधारकपणाला कांहीं मर्यादा ठेविली आहे. ती ही की, कांहीं फौजदारी गुन्हा किंवा अपराध करीत असतां, नवरा स्त्रीला ह्मणेल की. ' तूं मला या कामीं मदत कर, ' तर तिनें बेलाशक ' नाहीं ' असें ह्मणावें. हे कदाचित् असें असेल, पण बाकीच्या सर्व गोष्टीत नवरा सांगेल ते तिला ऐकिलेंच पाहिजे, असा त्याचा अधिकार तिजवर ठेविला आहे. तिला त्याच्या परवानगी वांचून कांहींएक करण्याचा अधिकार नाहीं. तिनें कांहीं मिळकत मिळविली तर, त्या मिळकतीवर नवऱ्याचें स्वामित्व असते. ती मिळकत ज्या क्षणीं तिची होते. त्याच क्षणीं त्या मिळकतीवर नवऱ्याचा हक्क उत्पन्न होतो—मग ती तिला वारस या नात्यानें कां मिळेना—तिजवर तिचा मुळींच हक्कसंबंध रहात नाहीं ! या बाबतीत **इंग्लंडांतील** स्त्रियांची स्थिति इतर देशांतील गुलामापेक्षांही वाईट होय. उदाहरणार्थ, **रोमन्** लोकांचा इतिहास पाहिला तर **रोमन्** लोकांच्या कायद्याप्रमाणें प्रत्येक दासाला ' दासधन ' या नांवानें मिळालेलें जें धन किंवा जी मिळकत असे, तिजवर त्या दासाची बहुतेक पूर्ण सत्ता असे, व दुसऱ्याचा कांहींएक हक्क त्याच्या त्या वित्तावर चालत नसे. या देशांत ( **इंग्लंडांत** ) उंच प्रतीच्या लोकांनीं कायदा एकीकडे ठेवून, खाजगी खर्चाकरिता ह्मणून व विशेष कराराच्या योगानें, आपल्या स्त्रियांस **रोमन्** लोकांप्रमाणेंच कांहींएक प्रकारचा हक्क दिला आहे. पोरीच्या बापाचें प्रेम आपल्या जांवयापेक्षां आपल्या पोरीवर सहजच विशेष असतें. कारण, एक असतो पोटचा गोळा, व दुसरा असतो अगदीं परका मनुष्य. यामुळे, बहुतेक श्रीमान् लोक आपल्या पोरीच्या विवाहसमयीं पोरीला वारसाच्या हक्कानें जाणारी जी मिळकत, ती सर्व, किंवा तिचा कांहीं भाग तरी, नवऱ्याच्या हातांत राहूं नये, अशी व्यवस्था करितात. ह्मणून त्या मिळकतीवर त्या स्त्रीच्या नवऱ्याचा

कांहीएक अधिकार चालत नाहीं.* तथापि, या व्यवस्थेनें त्या मिळकतीवर सर्वस्वी तिची मालकी चालते, असें होतच नाहीं. फार झालें तर, इतकेंच होतें कीं, नवऱ्याला ती मिळकत उधळून टाकण्यास प्रतिबंध होतो. परंतु, त्या मिळकतीच्या योग्य मालकाला मिळकतीचा उपभोग करितां येत नाहीं. कारण, ती मिळकत दोघांच्याही ताब्यांत नसते. त्या मिळकतीचें उत्पन्न ह्मटलें तर, त्या स्त्रीच्या हितासाठी उत्तमोत्तम व्यवस्था जरी केलेली असली, तरी त्या व्यवस्थेनें इतकेंच होतें कीं, तिच्या मिळकतीचें उत्पन्न नवऱ्याच्या हातांत जात नाहीं. तें उत्पन्न तिच्याच हातांत गेलें पाहिजे, असा निर्बंध असतो. परंतु, तें तिच्या हातांत आल्याबरोबर त्यानें जर तें तिच्यापासून जुलमानें हिस-

* आमच्या या देशांत गुजराथी लोकांत स्त्रियांची ज्या वित्तावर पूर्ण मालकी राहील अशा प्रकारची कांहीं व्यवस्था करितात हिंदुधर्मशास्त्रांत 'स्त्रीधन' ह्मणून एक प्रकार मान्य करून शास्त्रकर्त्यांनीं त्याचे निराळे नियम सांगितले आहेत. त्याचप्रमाणें, मुलीला वारस या नात्यानें जी मिळकत मिळेल, तिजवर तिची पूर्ण सत्ता मानिली आहे मिल्ल साहेबांनीं वर ज्या कायद्यास उद्देशून लिहिलें आहे, तो कायदा त्याच्या वेळचा होता, हें वाचकांनी लक्षात ठेविलें पाहिजे प्रस्तुत निबंध प्रसिद्ध झाल्यापासून इंग्लंडातील पुष्कळ विचारी पुरुष व स्त्रिया यांच्या मनावर व विचारावर निबंधांत केलेल्या प्रतिपादनाचा परिणाम घडून, स्त्रियांच्या संबंधाच्या कायद्यांत योग्य फेरफार करण्याविषयीं खटपट सुरू झाली. त्या खटपटीचा शेवट असा झाला कीं, 'Women 's Property Act' 'स्त्रियांच्या मिळकतीच्या संबंधाचा कायदा' पास झाला. त्यातील मुख्य तत्व असें आहे कीं, स्त्रीनें लग्नापूर्वीं मिळविलेली मिळकत असो, किंवा लग्न झाल्यानंतर मिळविलेली मिळकत असो—नवऱ्याचा आपल्या बायकोच्या मिळकतीवर कांहींएक हक्क नाहीं. दोघेही आपापल्या मिळकतीचे पूर्ण व स्वतंत्र मालक आहेत, असें कायद्यानें ठरलें आहे. हा कायदा होऊन फारच थोडीं वर्षे झालीं. या संबंधानें आमचे इकडे इ० स० १८६५ सालीं पास झालेला "इंडियन् सक्सेशन् आक्ट" या नांवाच्या कायद्यांतील ४३।४४ वीं कलमें, त्याचप्रमाणें, इ० स० १८७४ चा ३ रा "मॅरिड वुमन्सप्रॉपर्टी आक्ट" ह्मणजे "विवाहित स्त्रियांचे मिळकतीच्या संबंधाचा कायदा" याचें कलम ४ व ७ पहा. परंतु, या कायद्याचा फायदा बापुड्या हिंदू स्त्रियांना मिळण्याचा नाहीं. कारण त्यांच्या मिळकतीची [illegible] हिंदुधर्मशास्त्रानेंच लागावयाची !

कावून घेतलें, तर त्याजबद्दल त्याला कांहीएक शिक्षा ठेविलेली नाहीं. कायद्याच्या दृष्टीनें बायको व तिचा नवरा एकच व्यक्ति, अशी कल्पना आहे. याचा हेतु एवढाच दिसतो कीं, जें कांहीं तिचें, तें त्याचें. याच्या उलट मात्र अनुमान करीत नाहींत कीं, जें त्याचें, तें तिचें! कायद्याच्या दृष्टीनें 'एक व्यक्ति' हें ह्मणणें पुरुषाच्या विरुद्ध मात्र लावीत नाहींत. तिऱ्हाईत माणसाच्या संबधानें जीं बायकोची कृत्यें त्या कृत्याबद्दलची जबाबदारी जेव्हां नवऱ्यावर आणणें असेल, ह्मणजे, आपल्या जनावराच्या किंवा दासाच्या कृत्याबद्दल जसा धनी जबाबदार धरितात, तसा जेव्हां त्यास तिच्या कृत्याबद्दल जबाबदार धरावयाचें असेल तेव्हां मात्र या ह्मणीचा उपयोग करितात. यावरून बहुतेक पुरुष दासापेक्षां अधिक चांगल्या रीतीनें स्त्रियास वागवीत नाहींत, असें माझें ह्मणणें नाहीं. पण पुरुषाच्या संबंधानें पहातां स्त्री ज्या अर्थानें व जितक्या प्रकारांनीं पुरुषाची दासी असते, त्या अर्थानें व तितक्या प्रकारांनीं दासाचा दासपणा कोठेंच दृष्टीस पडत नाहीं. खुद्द धन्याच्या अथवा यजमानाच्या निरंतर तैनातींत असणाऱ्या दासाशिवाय, दुसरा कोणताही दास, स्त्रीप्रमाणें प्रत्येक घटकेस, अथवा प्रतिक्षणीं, दास बनलेला नसेल! खरोखरच, जो दास असतो, त्यानें शिपायाप्रमाणें आपली नेमिलेली नोकरी बजावली असतां, किंवा त्याचा पहारा संपला ह्मणजे, तो राहिलेल्या वेळेचा पूर्ण मालक असतो. याशिवाय, त्याला आपल्या कुटुंबाचें ह्मणून जें कांहीं सौख्य असतें, तेंही मिळतें. त्यामध्यें धन्याची आडकाठी क्वचितच येते. पृथ्वीवर ज्या ज्या देशांत गुलामगिरी अद्यापि कायम आहे, त्या त्या देशांत व विशेषेंकरून ख्रिस्ती धर्म जेथें चालू आहे, तेथें, दासींना अथवा स्त्रीजातीच्या गुलामांना, एकप्रकारचा सर्व-मान्य हक्क असतो. तिच्या धन्यानें तिच्या पातिव्रत्याचा भंग करण्याचें मनांत आणिलें, तर तिनें बेलाशक 'नाहीं' ह्मणावें. परंतु बायकोची गोष्ट अशी नाहीं!

दुर्दैवाने कसाही दुर्वृत्त, केवळ पशुतुल्य नवरा जरी तिला मिळाला, आपला हा द्वेष करितो, हे जरी तिला पक्के ठाऊक असले, तिचा केवळ नित्य छळ करण्यातच ज्याला आनंद वाटतो, असा जरी तो मनुष्य असला, फार काय— अशा माणसाचा तिटकारा न येणे हे अगदी अशक्य आहे असे जरी तिला वाटले, तरीही मनुष्यप्राण्यांची ज्यांत अत्यंत मानखंडना होते अशी गोष्ट करण्याचा, ह्मणजे तिच्या मर्जीविरूद्ध तिजपासून रतिसुख प्राप्त करून घेण्याचा त्यास पूर्ण अधिकार कायद्याने दिलेला असतो! तिच्या शरीराच्या संबधाने याप्रमाणे हा गुलामगिरीचा अत्यंत नीच प्रकार झाला! आता तिचे व तिच्या धन्याचे. अशा उभयतांचे समान प्रेम ज्यांवर असते, अशा तिच्या मुलांशी कायद्याने कोणत्या प्रकारचा संबंध ठेविला आहे पहा. मुले कायद्या प्रमाणे एकट्या बापाची, त्यांजवर सर्व सत्ता, सर्व मालकी त्याची. आईला मुलाच्या संबधाने कोणतीही गोष्ट त्यांच्या बापाच्या संमती खेरीज व त्याने ती मंजूर केल्याशिवाय करिताच येत नाही. तो मेल्यावरही ती त्याची कायदेशीर पालनकर्त्री नाही. त्याने आपल्या मृत्युपत्रांतच जर लिहून ठेविले असेल, तर मात्र तिला पालन करण्याचा अधिकार मिळतो. त्याला पाहिजे तर ती मुले त्याने आपल्या बायकोपासून दूर नेऊन ठेवावी, किंवा त्या मुलांस तिला कधीही भेटता येणार नाहीं, किंवा त्यांशी तिला पत्रव्यवहारही ठेवितां येणार नाही, अशी व्यवस्था त्याच्या इच्छेस आल्यास त्याने करावी. तिला हूं का चूं करण्याचा अधिकार नाही! अशी स्थिति तर कायद्याने स्त्रियांची केली आहे. आणि अशा स्थितीपासून मुक्त होण्याचे साधनही तिच्या हातांत कांहींएक ठेविले नाही. तिने आपला नवरा जर सोडला तर आपलीं मुले तिला आपल्याबरोबर नेतां येत नाहीत, एवढेंच नव्हे: तर, जें कायदेशीर रीतीने तिचे आहे, ते सुद्धां तिला मिळत नाही!

त्याच्या मनास येण्याचा अवकाश, कीं कायद्याच्या मदतीनें किंवा बळ-जोरानें, एखाद्या पळून गेलेल्या ढोराप्रमाणे त्यास तिला बेलाशक परत आणितां येतें* ! तिने मोलमजूरी करून व कष्ट करून जें मिळविलें असेल, किंवा तिच्या इष्टमित्रांनी दया करून तिला जे कांहीं दिलें असेल, ते देखील त्याने खुशाल बुचाडून घ्यावें. कायद्याची बिलकूल ना नाही. कैदी सुटून गेल्यामुळे संतापलेल्या 'तुरुंगाधिपती' प्रमाणें खिजलेल्या नवऱ्याच्या कबजांत तिला पुनः जाणें नसेल, व आपण स्वकष्टानें संपादन केलेला पैसाआडका आपल्या उपयोगीं पडावा असें तिला वाटत असेल, तर तिनें कोर्टांत दावा केला पाहिजे व हुकुमनामा मिळविला पाहिजे. तेव्हांच तिला नवऱ्यापासून निराळें रहातां येतें. आणि असें न करिता जर ती निराळी राहील तर वीस वर्षांनंतर देखील तिचा नवरा पटकन् येऊन तिजवर झडप घालून तिच्या जवळ असेल नसेल तें सर्व बुचाडून घेऊन पळून गेला तरी तिचें कांहीएक चालत नाहीं. कोर्टाच्या मदतीनें मात्र विवाहसंबंध तोडितां येतो.

---

* प्रस्तुत स्थळीं दादाजी विरुद्ध रखमाबाई या खटल्याची आठवण आमचे वाचकास झाल्याखेरीज रहाणार नाहीं. एखादें ढोर धन्याकडे जाण्यास खुषी नसता त्या धन्यास तें ढोर जबरदस्तीनें पकडून आणून, आपल्या हवालीं करून घेतां यावें, त्याप्रमाणे रखमाबाईचा धनी जो दादाजी, त्याकडे जाण्यास ती खुषी नसल्या कारणानें न्यायमूर्तींसमोर दादाजीनें जावें, आणि "माझें पळपुटें ढोर माझ्या हवालीं जबरदस्तीनें करा, व तें नाहीं म्हणेल तर, त्यास कोंडवाड्यात तरी निदान अडकावून टाका" असें म्हणण्याचा हक्क ज्या कायद्यानें आमच्या इकडील नवऱ्यास दिला आहे, त्या कायद्याची योग्यता वर्णन करावी तेवढी थोडीच! यापेक्षा आमच्यानें अधिक कांहीं म्हणवत नाहीं. तथापि प्रस्तुतस्थळीं इतका उल्लेख केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं कीं आपणांस जुन्या चालींचा अत्यन्त मोठा अभिमान आहे असें जगास निरंतर भासविण्याचा यत्न करणारे 'केसरी'कार प्रो. बाळ गंगाधर टिळक यांस या कायद्याचा वीट येऊन तो अजीबात काढून टाकण्याविषयीं १८९१ चे डिसेंबरात नागपूर येथें जी "राष्ट्रीय सामाजिक परिषद" जमली होती तिजपुढें त्यांनीं निःशंकपणें सूचना आणिली होती.

पण ही कायदेशीर सोडचिठ्ठी मिळण्यास खर्च फार लागत असल्यामुळे श्रीमान् लोकांच्या बायकांशिवाय इतरांस ही गोष्ट अगदीं अशक्य असते. ती देखील नवऱ्यानें जर बायकोला टाकलीं असेल, किंवा तिला तो अत्यंत क्रूरतेनें व दुष्टपणानें वागवीत असेल, तरच मिळते. असें असतांही, प्रत्येक दिवशीं लोक हाका मारतात कीं, ही सोडचिठ्ठी मिळविणें फार सुलभ झालें आहे! खरोखर, अगोदर स्त्रीला समाजानें जुलमी धन्याचा बंदाचाकर होऊन रहाण्याशिवाय दुसरा कोणताच धंदा करण्याची मुभा ठेविली नाहीं. यामुळें तिचें सर्व सुख त्या धन्यावर अवलंबून रहाणार. अशा स्थितींत तिला धनी असा मिळाला कीं, तो तिला एखाद्या आवडत्या जनावरासारखा वागवील—केवळ ओझें लादण्याच्या जनावरासारखा वागविणार नाहीं—तर तिचें मोठेंच भाग्य समजावयाचें. परंतु अशा प्रकारचा धनी मिळविण्याची एकच संधि तिला देणें, ह्मणजे निष्ठुर होऊन तिच्या दुःखात भर घालण्यासारखें नव्हे काय? तेव्हां या एकंदर प्रकारावरून असें अनुमान उघड निघतें कीं, आयुष्यांत तिचें सर्वस्व ज्या अर्थी ‘ धनी चांगला मिळणें ’ या गोष्टीवर अवलंबून असतें, त्या अर्थी तसा धनी मिळेपर्यंत एक बदलून दुसरा करण्याची तिला मुभा असावी. वस्तुतः तिला हा असा हक्क द्यावा, असें माझें ह्मणणें नाहीं. कारण, हा विचार अगदीं स्वतंत्र आहे. एक पति सोडून देऊन स्त्रीला दुसऱ्याशीं पुनः लग्न करितां* यावें या हेतूनें सोडचिठ्ठी मिळविण्याचा तिचा हक्क, हा विषय

* या प्रकारास इंग्रेजींत ‘ डायव्होर्स ’ असें नांव आहे. चालू विषयाशीं या विषयाचा प्रत्यक्ष संबंध नसल्यामुळें, निबंधकारानें फक्त त्याचा उल्लेख करून तो विषय सोडून दिला आहे. कारण तो एक स्वतंत्र विषय आहे.

या सोडचिठ्ठीच्या संबंधानें ता. १३ एप्रिल १८९६ चे इंदुप्रकाशांत पत्रव्यवहाराचे सदरात आलेले एका गृहस्थाचे उद्गार प्रस्तुतस्थळीं संग्रह करण्यासारखे आहेत. ते गृहस्थ ह्मणतातः—ड्या लोकांत पुनर्विवाह करण्याची चाल बरेच दिवसांपासून रूढ आहे

माझ्या प्रस्तुत विषयास सोडून आहे. माझें ह्मणणें एवढेंच कीं, जिला गुलामगिरी किंवा दास्य पतकरण्याखेरीज समाजानें दुसरा मार्गच ठेविला नाहीं, तिला दास्यांतही निवडानिवड करण्याची मुभा ठेवणें, हें अंशतः तरी तिच्या दुःखाचें परिमार्जन करण्यासारखें आहे. आणि ही मुभा न ठेवणें, किंवा एवढाही अधिकार न देणें, ह्मणजे तिला पुरतेपणीं दास करण्यासारखें आहे, असें मी समजतों. कारण, ज्या देशांत गुलामगिरी चालते, तेथें, गुलामाच्या संबंधानें केलेल्या कायद्यांत, धन्यानें दासास अगदीं वाईट रीतीनें वागविलें असतां, तो दास दुसऱ्याला विकून टाकण्यास कायदा धन्याला भाग पाडितो. परंतु, आमच्या या सुधारलेल्या इंग्लंडांत बायकोला नवरा कितीही वाईट रीतीनें वागवित असला, तरी तीत व्यभिचाराची भर पडल्या-खेरीज आपल्या गांजणाऱ्याच्या हातून त्या बिचारीची सुटका होण्यास मार्गच नाहीं!

२. मला अतिशयोक्ति करण्याची अगदीं इच्छा नाहीं, व अतिशयोक्ति करण्याचें कारणही दिसत नाहीं. स्त्रियांची कायद्याच्या दृष्टीनें जी खरो-

---

व ज्या लोकांत नवऱ्यानें बायकोस सोडचिठ्ठी देण्याची वहिवाट आहे, त्या लोकांमध्यें कधीं कधीं हट्टी नवरे आपले बायकोस विनाकारण त्रास देण्याचे इराद्यानें आपण होऊन बायकोस सोडचिठ्ठी देत नाहींत, त्यास तशी देण्यास भाग पाडण्याविषयीं कायदा असल्यास चांगलें. कांहीं नवरे नपुसक असतात, कांहीं महारोगी असतात व कांहीं निव्वळ खुळे असतात. त्यापासून बायकोस संसार सुख मिळत नाहीं व त्याचे नवरे त्यांस तें मिळवूं देत नाहींत, व कायदा आड येतो. हा जुलूम नव्हे काय? जातीचे पंच पूर्वीं एकत्र जमून अशी कांहीं भानगड पडल्यास योग्य तो निकाल करीत असत व त्या निकालाप्रमाणें लोकही ते वेळीं बिनतक्रार वागत असत. हल्लीं जसें आमचें राज्य गेलें त्याबरोबर आमचे सर्व अधिकारही गेले. तेव्हा आतां जातीचे पंचास पुसतो कोण? सोडचिठ्ठी मिळविण्याकरितां दिवाणी कोडतांत दावा लावितां येत नाहीं. आमच्या हिंदुधर्मशास्त्रांत सरकारांनीं व न्यायाधीशांनीं पुष्कळ दुरुस्त्या केल्या आहेत. त्यांत मी वर दर्शविलेल्या संबंधानें एखादी दुरुस्ती झाल्यास पुष्कळ बायका सरकारास दुवा देतील.

खर स्थिती आहे, तिचें वर्णन मी केलें. वास्तविक लोक आपल्या स्त्रियांस कोणत्या प्रकारें वागवितात, याबद्दल मी एक शब्दही लिहीत नाहीं. बहुतेक देशांतील कायदे, ते अमलांत आणणाऱ्या लोकांपेक्षांही वाईट असतात. ज्या कायद्यांची अंमलबजावणी करण्याचा कधींच प्रसंग येत नाहीं, असे कायदे बहुत काळपर्यंत केवळ नांवापुरतेच रहातात. माझें ह्मणणें असें आहे कीं, केवळ कायद्याच्या दृष्टीनें जर पाहिलें, तर कायदे ज्या पद्धतीचे आहेत तदनुसार निरनिराळ्या स्त्रीपुरुषांची स्थिति असती तर, खरोखर समाज ह्मणजे इहलोकींचें नरककुंड झालें असतं ! सुदैवानें अशी गोष्ट आहे कीं, माणसांत दुष्ट दुसऱ्याला पीडा करण्याविषयींची जी प्रवृत्ति असते, तिचें आकलन किंवा संयमन मनुष्यांमध्यें उत्पन्न होणाऱ्या साधुवृत्तींनीं होत असतें. या साधुवृत्तींचें उत्कृष्ट उदाहरण मुख्यत्वेंकरून स्त्रीपुरुषांचा साधारण जो परस्परसंबंध असतो, त्यावरून दृष्टीस पडतें. अशा सारखें दुसरें उदाहरण ह्मटलें ह्मणजे, त्याचा आणि त्यांच्या मुलांचा परस्पर संबंध. हा संबंध किंवा हा पाश, पहिल्या ह्मणजे स्त्रीसंबंधाच्या पाशाला अधिक दृढ करतो. जी पूर्ण सत्ता पुरुषांस कायद्यानें दिली आहे, तिचा पूर्ण उपयोग बहुधा पुरुष करीत नाहीं. स्त्रियांस जितक्या वाईट रीतीनें त्यांस वागवितां आलें असतें, तितक्या वाईट रीतीनें ते वागवीत नाहीत. एवढ्यावरूनच चालू रूढीचे जे कैवारी आहेत, त्यांस असें वाटतें कीं, प्रस्तुत स्त्रीपुरुषसंबंधाच्या व्यवहाराची दुष्टता न्याय्य आहे ! आणखी, त्यांस असेंही वाटतें की, सध्यां जी रूढि आहे तिच्यांत जे दोष आहेत ते टाळण्यासारखे नाहींत, ह्मणून त्याबद्दल कुरकुर करणेंही व्यर्थ आहे. कारण, प्रत्येक चांगल्या गोष्टीच्या मागें वाईट गोष्ट लागलेलीच आहे !* हा किंवा दुसरा कोणत्याही प्रकारचा

* आपल्या भाषेंत एक ह्मण आहे 'गुळाच्यामागें डोंगळे असतातच'! इंग्रेजीतही एक ह्मण आहे कीं, 'कांट्याशिवाय गुलाब नाहीं'

जुलमी कायदा पूर्ण अमलांत राहूनही माणसांची खरोखर वागणूक बऱ्याच सौम्यपणाची असणें हें संभवते. परंतु यावरून जो जुलमाचा प्रकार आहे, तो कायमच राहणें इष्ट आहे व योग्य आहे, असे मात्र सिद्ध होत नाहीं. कितीही वाईट रूढि प्रचारांत असल्या, तरी त्यांच्यांशीं टक्कर देण्याची किंवा झुंज खेळण्याची शक्ति मानवी स्वभावांत विलक्षण आहे, एवढेच काय तें सिद्ध होतें. राज्यव्यवस्थेंत जुलमाच्या प्रकाराचे मंडन करण्याकरितां जे प्रतिपादन करितां येईल, तेंच प्रतिपादन कुटुंबव्यवस्थेंतल्या जुलुमाचें मंडन करण्याकरतां येणार आहे. प्रत्येक जुलमी राजा आपल्या राजवाड्याच्या खिडकींत बसून आपल्या पीडित प्रजांचे सुस्कारे किंवा हुंदके ऐकून आनंद पावतो किंवा प्रजाजनांच्या शरीरावरील जीर्ण झालेली रकटीं हिसकावून घेऊन, रस्त्यांत त्यांनी हिंवांत कुडकुडत रहावें ह्मणून त्यांस हांकून देतो; अशांतला प्रकार थोडाच घडतो. **फिलिप् लीवेल्**, अथवा **नादिरशहा**, किंवा **क्यालिग्यूला** या इतिहासप्रसिद्ध जुलमी बादशहांच्या बरोबरीचा जुलूम **फ्रान्सचा सोळावा लुई** यानें केला असे नाहीं. तथापि **फ्रान्सदेशांत** जे प्रसिद्ध बंड झाले, ते होण्यापुरता **लुई** यानें केलेला जुलूम बस्स झाला. आणि त्या बंडाच्या धामधुमींत कांहीं कांही कृत्ये घडलीं, ती जरी फारच भयंकर व निंद्य होतीं, तरी तींही **लुई**च्या जुलमापुढें फिक्कीच पडण्यासारखी होती !*

बायका व त्यांचे नवरे यांमध्यें असणारे परस्पर अलौकिक प्रेम उदाहरणास घ्यावें तर, गुलामांच्या इतिहासांतही अशी उदाहरणे

* फ्रान्सदेशांत राजक्रांतीस अनुलक्षून, प्रस्तुतस्थळीं निबंधकारानें जें ह्मटलें आहे, तेंच आमच्या या देशांत इ० स० १८५७ या सालीं शिपायांनीं जें बंड केलें त्याच्या संबंधानेंही ह्मणता येईल, हें मर्मज्ञ वाचकाच्या लक्षांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

आढळतात. **ग्रीस** व **रोम** यांच्या इतिहासांत असे आढळते की, दास, आपल्या धन्याचा विश्वासघात करण्यापेक्षां प्रसंग पडल्यास आपले हाल हाल करून घेत व मरण्यासही राजी होत. **रोमन** लोकांत आपसांत तंटे माजले व मोठमोठ्या माणसांचा छल होऊं लागला. कित्येकांस देहांत प्रायश्चित्तें मिळाली. कित्येकांस देश सोडून जावें लागले. अशा धामधुमींत प्रत्येक पुत्राने आपल्या बापाचा विश्वासघात केला, अशीं उदाहरणें आढळतात. परंतु **रोमन** स्त्रिया व दास यांनीं विलक्षण शौर्य, पतिनिष्ठा व स्वामिभक्ति दाखविली. असे असतांही पुष्कळ **रोमन** लोक आपल्या दासांस निष्ठुरपणाने व निर्दयपणाने वागवीत, असे इतिहासावरून स्पष्ट दिसते, परंतु याविषयीं आपणास इतकें नवल वाटण्याचें कारण नाही. कारण, स्वामिनिष्ठा, पतिनिष्ठा, राजनिष्ठा, अशा प्रकारचे हे तीव्र मनोधर्म माणसांच्या मनांत जे उत्पन्न होतात, ते विशेषेकरून ज्या ठिकाणीं अत्यंत दुष्ट व भयंकर अशा चाली पडल्या आहेत, त्या ठिकाणी उत्पन्न होतात; व त्यांची तीव्रताही फार असते. या संसारांत जे अनेक चमत्कार आहेत, त्यांतलाच हाही एक चमत्कार आहे की, ज्यांच्या हातांत दुसऱ्यास अगदीं जमीनदोस्त करून टाकिता येईल, अशी 'कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं' सत्ता असते, असे जे सत्ताधीश त्यांनीं आपण होऊन त्या भयंकर सत्तेचा उपयोग केला नाही.—तर जे त्या सत्तेला वश असतात, ह्मणजे ज्या माणसांवर त्यांची ती सत्ता चालण्यासारखी असते, त्या माणसांच्या ठिकाणीं अत्यंत भक्तियुक्त अशी कृतज्ञताबुद्धि उत्पन्न होते! बहुतेक पुरुषांच्या व्यवहारांत हा भाव किंवा हा आशय, धर्मश्रद्धा व धर्मनिष्ठा अशा कामांत देखील किती ओतप्रोत भरून राहिलेला असतो, या गोष्टीचा विचारच न करणे हे बरे! फार काय, आपण प्रत्यही असे पहातो कीं, देवाची आपणावर जशी

कृपा आहे, तशी आपल्या शेजाऱ्यावर नाहीं, असा विचार मनांत आणूनच पुष्कळ लोक देवाचे आभार मानितात असे दिसते!*

३. ज्या रूढीचें मंडन करावयाचें आहे, ती गुलामगिरी असो, अथवा अनियमित राजसत्ता असो, किंवा कुटुंबाचा जो धनी त्याची अनियंत्रित सत्ता असो—त्या रूढीचे जे कैवारी असतात, ते त्या त्या रूढीचीं चांगलीं उदाहरणें मात्र पुढें मांडून त्यांच्यावरून त्या त्या रूढीची योग्यायोग्यता ठरवू पहातात! त्यांच्या प्रतिपादनाचा बहुधा प्रकार असा असतो. 'अहो, अमका अमका पुरुष आपला अधिकार कसा सदय अंतःकरणानें बजावीत आहे पहा! आणि त्याच्या हाताखा-लचीं माणसें तरी पहा. किती नम्रतेनें व प्रेमानें धन्याशीं वागतात! तो धनी तरी आपल्या आश्रित मनुष्याचें ज्यांत अत्यंत हित होईल, अशाच गोष्टी करितो. काय त्याच्या भलेपणाचें व शहाणपणाचें वर्णन करावें! त्याचीं चाकरमाणसें तरी कशीं नेहमीं हास्यमुख असतात व धन्यास दुवा देत असतात!' हे सर्व खरें. परंतु हें ह्मणणें केव्हां सयु-क्तिक होईल? 'या जगांत चांगलीं माणसेंच नसतात,' असें जो प्रति-पादन करील, त्यास हें उत्तर देणें ठीक आहे. मनुष्यच जर मुळीं उत्तम असेल, तर त्याच्या अनियंत्रित अधिकाराखालीं असणारीं मनुष्यें फार सुखी असतील, भली असतील, व प्रेमळ असतील. आणि सर्व कांहीं यथास्थित असेल. याबद्दल संशय कोणाला आहे? पण हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, कायदेकानू व रीतिभाती सत्पुरुषांच्या-

* केरळकोकिळ या नांवाच्या मासिक पुस्तकाचा एक अंक वाचीत असतां 'अमेरिकेंतील भयंकर अनर्थ' या सदराखालीं ता० ६ जून सन १८९२ रोजीं अमे-रिकेमध्यें एक मोठा अनर्थ घडला आणि पुष्कळ जीवाचीं हानि झाली. त्या हृदयद्रावक प्रसंगाचें वर्णन करीत असतां त्या पुस्तकाचे संपादक आरंभीं ह्मणतातः—"जगदीशानें तेथील लोकांवर एवढा क्षोभ कां केला तें समजत नाहीं" व सरतेशेवटीं ह्मणतात —"आपल्या आर्यावर्तावर असा प्रसंग येत नाहीं ही परमेश्वराची केवढी कृपा आहे बरें?"

करितां नव्हत, तर दुर्जनांकरितां आहेत. त्यांतून असे पाहिले पाहिजे की, एक तर विवाहपद्धति जी आहे, ती थोड्या माणसांपुरतीच नाही. दुसरे असे की, विवाहविधि होण्यापूर्वी दुसऱ्यावर पूर्ण अधिकार योग्य रीतीने चालविण्यास ही माणसे लायक आहेत, अशा प्रकारचे लेखी दाखले पुरुषांपासून कोणी मागत नाही!

असा एक साधारण नियम आहे की, ज्यांच्या अंतःकरणांत साधारण भूतदया किंवा प्राणिमात्रांविषयी प्रेम अधिक असते, त्यांचे प्रेम आपल्या बायकांमुलांवरही विशेष असते. असेही पुष्कळ पुरुष आढळतात की, त्यांस आपली बायको व आपली मुले यांच्याखेरीज कोणत्याच प्रकारचे पाश नसतात. ह्मणजे, इतर प्राण्यांविषयी त्यांना मुळीच कळकळ वाटत नाहीं. पुरुषांमध्ये सुष्टपणाचे आणि दुष्टपणाचे जसे अनेक प्रकार आढळतात, तशी भूतदयाही कमजास्त प्रमाणाने आढळते. ही भूतदया कमी होतां होतां शेवटी असा एक वर्ग असतो की, त्या वर्गा-तल्या माणसांची हृदये अगदी शुष्क असतात. ही पूर्ण तमोगुणी, ह्मणजे माणसें अत्यंत कठोर अंतःकरणाची व निर्दय असून, त्यांस कोणत्याच सामाजिक पाशाचे बंधन नसते. या माणसांस दाबांत ठेवण्याकरितां समाजाला अगदी शेवटला उपाय करावा लागतो. ह्मणजे, कायद्यांत सांगितलेल्या शिक्षेच्या द्वारानेच त्यांस प्रतिबंधांत ठेवावे लागते! अशा निंद्य स्वभावाची जी माणसें असतात, त्यांच्याही हातांत नवरेपणाचे कायदेशीर हक्क दिलेले असतात! प्रत्येक नीच व दुष्ट मनुष्याचे हातांत एक तरी दुर्भाग्य अशा स्त्रीचा गळा दिलेला असतोच. आणि तिज-वर त्याची अशी सत्ता असते की, एक तिचा जीव घेण्याखेरीज इतर पाहिजे तो जुलूम त्याने तिजवर करावा. फार काय, जर तितकी सावध-गिरी राखील, तर कायद्याच्या शिक्षेंत न सांपडतां, तिचा जीवही तो घेऊं शकेल! प्रत्येक देशांत नीच जातींमध्यें असे हजारो लोक असतात

की, दुसऱ्या कोणत्याहि बाबतींत कायद्याच्या दृष्टीनें ते गुन्हेगार होत नाहींत. परंतु दुसरीकडे कोठें अंमल चालत नाही ह्मणून, आपल्या दुर्दैवी बायकोच्या अंगावर हात टाकण्यांत, व तिला अत्यंत निद्य प्रकारें छल करण्यांतच नेहमीं आनंद मानतात. कारण, एक तर ती अबला, व विवाहाच्या चमत्कारिक सबंधामुळे बद्ध असल्याकारणानें त्याच्या त्या पशुतुल्य आचरणापुढे त्या बिचारीचें कांहीएक चालत नाही. ती सर्वस्वी त्याजवर अवलबून असल्यामुळे, त्याच्या नीच व रानटी स्वभावास उत्तेजन येते. वस्तुतः ही सर्वथा पराधीन आहे, असा विचार त्याच्या मनांत येऊन त्याने सहनशील व सदय असावें, व जिने आपलें जीवित विश्वासाने आपल्या हवाली केले, तिजशीं त्याने ममतेने व स्नेहपूर्वक वागावे. परंतु असे न होतां त्याच्या मनाची समजूत उलट झालेली असते. त्याला वाटते, "या वस्तूचा कायदेशीर मालक मी, व माझ्या खुषीस येईल त्याप्रमाणे मी तिचा उपयोग करीन, व इतर लोकांशी जसा आर्जवाने, सभ्यतेनें व चांगुलपणाने मी वागतों, तसा बायकोशीं कां ह्मणून वागेन?" कुटुंबांत घडून येणाऱ्या जुलमाची परमावधि होत असतां, पुष्कळ दिवसपर्यंत त्या जुलूम करणाऱ्या गुन्हेगारास शिक्षा करण्याचा कांहीच मार्ग कायद्यांत नव्हता. अलीकडे थोड्या वर्षांपासून अशा प्रकारच्या जुलमाचा प्रतिबंध करण्याचा मळमळीत यत्न कायद्याने केला आहे. ही गोष्ट जरी खरी आहे, तथापि तो यत्न सर्वथा निष्फळ होय, असें ह्मटले तरी चालेल. आणखी, असें होणें यांत कांही नवलही नाहीं. कारण, जोपर्यंत गरीब बिचारी गाय खाटकाचे हातांत आहे, तोंपर्यंत त्याची ती हिंसक व पशुतुल्य वृत्ति प्रतिबंधांत ठेवितां येईल, असे समजणें ह्मणजे निवळ भ्रांति नव्हे काय?

आपल्या बायकोच्या शरीराला इजा केल्याचा गुन्हा नवऱ्यावर शाबीद झाल्याबरोबर—निदान प्रथम एकदां त्याने बायकोस मारल्याचा

गुन्हा त्याजवर शाबीद होऊन तोच अपराध त्यानें पुनः केला, असें सिद्ध झाले की, त्या बायकोला सोडचिठ्ठी मिळण्याचा अथवा दुसरा नवरा करण्याचा हक्क असावा. निदान त्या नवराबायकोचा लग्नसंबंध तरी कायद्यानें तोडून टाकावा. आणि जोपर्यंत असा कायदा होणार नाही तोपर्यंत—हल्लीच्या कायद्यांत स्त्रीला जो इलाज ह्मणून ठेविला आहे, तो नुसता नांवाला आहे, त्याचा कांहीएक उपयोग होत नाही. कारण, एक तर बायकोला मारणें तें वाजवीपेक्षां जास्ती किंवा फाजील मारणें कायद्यास लागत असतें; व दुसरें, फिर्यादीचे कामीं येणाऱ्या अनेक अडचणींमुळें फिर्यादीच्या खटपटींत स्त्रिया बिचाऱ्या पडतच नाहींत. याचा परिणाम अर्थात् असा होतो की, स्त्रिया आपलीं दुःखें निमूटपणें गिळून टाकतात.

४. कोणत्याही मोठ्या देशांत अगदीं पशूसारख्या माणसांची संख्या केवढी मोठी असते, व वैवाहिक संबंधाच्या कायद्याच्या द्वारानें, एक तरी बळी या नरपशूंच्या हस्तगत होणें किती साहजिक असतें, या गोष्टीचा विचार केला असता, प्रस्तुतच्या दुष्ट व्यवस्थेमुळें मानवी जातीच्या विपत्तीचा विस्तार फारच भयंकर होत जातो, हें सहज लक्ष्यांत येणार आहे. वर निर्दिष्ट केलेली उदाहरणें ह्मणजे अगदी परमावधीची होत. ही उदाहरणें ह्मणजे मानवजातींतील अगदीं गाळ ह्मटला तरी चालेल. परंतु याहून कमी कमी होत जाणारे प्रकार, किंवा थरांवर थर, हे मानवजातींत आहेतच. गृहव्यवस्थेंत आढळणारा जुलूम काय, किंवा राज्यकारभारांत घडणारा जुलूम काय, प्रकार एकच!—जुलमी व सर्वसत्ताधीश मनुष्यें कोणती भयंकर गोष्ट केव्हां करतील याचा नेमच नसतो. सर्वगुणसंपन्न साधुपुरुष जसे विरळा, त्याप्रमाणेच निव्वळ पिशाचस्वरूपाची किंवा राक्षसस्वरूपाची माणसेंही विरळा! परंतु भयंकर जंगली माणसें की ज्यांची वृत्ति बहुतेक हिंसक पशुतुल्य

असून, प्रसंगविशेषीं ज्यांच्यांत मनुष्यपणाची उगीच छाया मात्र भासते, अशाच माणसांची संख्या जगांत जास्त आढळते. मनुष्यजातीचे उत्तम मासले—ह्मणजे ज्यास आपण केवळ 'देवमाणसे' ह्मणतो, अशा माणसांमध्यें व अत्यंत नीच ह्मणजे अगदीं राक्षसवृत्तीची माणसे त्यांच्या मध्यें, अनेक प्रकार व अनेक नमुने असतात. कांहीं बाहेरून मोठे साळसूद, दयाळू, भले, प्रतिष्ठित असे दिसतात. अशा माणसांच्या अंमलांत किंवा कचाट्यांत जोपर्यंत एखादा मनुष्यप्राणी सांपडला नाहीं, तोंपर्यंतच त्यांचा संभावितपणा ठीक असतो. परंतु त्यांचा खरा स्वभाव ज्या हतभाग्य प्राण्यांस त्यांच्या सत्तेत रहावें लागते, त्यांस विचारावा! त्यांचे दुःख त्यांसच ठाऊक. बिचाऱ्यांस खरोखर जिवाचा कंटाळा आलेला असतो. फार मागील काळापासून इतिहास पाहिला तर सत्तेचा दुरुपयोग पुरुष कसा करतात, व बहुतेक माणसे अधिकारापन्न झालीं असतां, सत्तारूप मदानें अंध होऊन जाऊन कसकसे थेर करितात, हें आमच्या वाचकांपैकीं बहुतेकांस विदित असेलच. तेव्हां त्या गोष्टीच्या सिद्धतेकरितां प्रत्यक्ष उदाहरण देण्याचें कारण दिसत नाहीं. त्यांतून असें पहा कीं, ज्या सत्तेचा विचार प्रस्तुत आपण करीत आहों, ती सत्ता एखाद दुसऱ्या पुरुषास मिळते, अशांतली गोष्ट नाहीं; तर प्रत्येक वयांत आलेल्या पुरुषास ती प्राप्त होते. मग तो अत्यंत नीच व भयंकर स्वभावाचा कां असेना?

मिळणारच. कोणताही पुरुष, बाह्यतः मोठा धर्मशील यवहारांत ज्याच्यावर त्याची कोणत्याही प्रकारची सत्ता गणार नाहीं, अशा माणसाशीं तो मोठ्या प्रतिष्ठितपणानें भावितपणानें वागतो. किंवा जीं माणसें तो वांकवील रुण्याला बांधलेलीं नाहींत, अशा माणसांबरोबर नीट क्रोधाच्या ऐन भरांत येऊन, त्यांच्या अंगावर धांवून

जात नाहीं; एवढ्यावरून गृहस्थाश्रमाच्या निर्बंधावस्थेंत त्याचें वर्तन कोणत्या प्रकारचें असेल, याची कल्पना करणें अशक्य आहे. अगदी सामान्य प्रकारचीं माणसें देखील आपली क्रूर, तामसी व निवळ स्वार्थसाधक, अशी वृत्ति परक्यापाशीं प्रकट न करितां, ज्या कोणावर त्यांची सत्ता चालेल, व ज्यास त्या सत्तेचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य नाही, अशा माणसाशींच प्रसंग पडल्यास प्रकट करितात. अशा प्रकारचे जे दुर्गुण माणसांच्या प्रकृतीत असतात, त्यांचा मुख्य उगम म्हटला म्हणजे, वरिष्ठ व कनिष्ठ यांचा परस्पर संबंध. ज्या ज्या ठिकाणीं हे दुर्गुण दृष्टीस पडतात, त्या त्या ठिकाणीं त्यांची उत्पत्ति सेव्यसेवकभावापासून उत्पन्न झालेली आहे, असें समजावें. आपल्याबरोबरीच्या माणसांशीं जो मनुष्य तुसडेपणानें अथवा दुर्वृत्तपणानें वागतो, तो मनुष्य बहुधा आपल्याहून कनिष्ठ प्रतीच्या लोकांत राहिलेला असतो, असें आढळतें. कारण, ज्यांस धाक दाखवून व त्रास देऊन आपल्या अंकित करून ठेवितां येईल, अशाच लोकांच्या सहवासांत त्याचा जन्म गेलेला असतो. लोक म्हणतात कीं, उत्कृष्ट कुटुंब म्हणजे भूतदया, अंतःकरणाचा कोमलपणा, निःसीम प्रेम, स्वार्थपराङ्मुखता इत्यादि सद्गुणांची केवळ एक शाळाच असते! अशी जरी लोकांत म्हण आहे, तरी वारंवार असे पहाण्यांत येतें कीं, कुटुंबाचा जो मुख्य अधिपति, किंवा पुढारी असतो, त्याच्या संबंधानें पहातां, कुटुंब म्हणजे हटवादीप[illegible]
पणा, जुलूम व अमर्याद, मूर्तिमंत असा आपमतलबी[illegible]
अनेक दुर्गुणांचीच एक शाळा असते, असें म्हणण्यास हर[illegible]
बायको व मुले यांच्याविषयीं काळजी घेणें, म्हणजे त्याचा इत[illegible]
समजावयाचा कीं, त्या पुरुषाच्या स्वतःच्या पदार्थांची व मालमि[illegible]
काळजी घेणें, यापेक्षां कांहीं जास्त नाही! फार काय, त्या व[illegible]

व्यक्तिमात्राच्या सुखाचा विचार केला असतां, अगदीं बारीकसारीक गोष्टीमध्येही ते सर्वथा मुख्य यजमानाच्या मर्जीवर अवलंबून असतें; ह्मणजे, त्याच्या मर्जीस आलें, तरच त्यांस ते मिळते, नाहीं तर मिळत नाहीं. प्रस्तुत जी रूढि चालू आहे, ती जोपर्यंत कायम राहील तोपर्यंत, आहे यापेक्षां चांगली स्थिति कोठून येणार? मनुष्यस्वभावाच्या दुष्ट प्रवृत्ति पाहिजे तशा बहकू दिल्या नाहीत, किंवा खवळूं दिल्या नाहीत तरच त्या कांहीं मर्यादित रहातात, ही गोष्ट आपणास माहितच आहे. आणि ज्याला दुसरे लोक वश किंवा नम्र होऊन रहातात, तो आपले घोडे बहुधा पुढे पुढेच ढकलीत जातो! असे हें त्याच्या हातून बुद्धि-पुरःसर जरी घडलें तरी 'मऊ सांपडलें ह्मणजे, खणीतच जावयाचें, किंवा ऊस गोड लागला ह्मणजे, मुळासुद्धां उपटून खाऊन टाकावयाचा' या ह्मणी प्रमाणें करणें, ही आपली मनुष्यमात्राला संवयच लागून गेलेली असते. हेंही आपणास ठाऊक नाहीं असें नाहीं. परंतु असा हा दडपून नेण्याचा क्रम बहुत कालपर्यंत चालत नाहीं. त्याची मजल थोडक्यांतच आटपते. कारण, मनुष्याच्या सहनशक्तीसही कांहींएक मर्यादा असतेच. त्या मर्यादेचें उल्लंघन झालें ह्मणजे, वश झालेल्या माणसास विरोध करणें भाग पडतें.* मनुष्याची सर्वसाधारण प्रवृत्ति तर पडली अशा प्रकारची! तेव्हां, प्रस्तुतच्या सामाजिक व्यवहारांत प्रत्येक पुरुषास बहुतेक अनियंत्रित अशी जी सत्ता, दुसऱ्या एका मानवी प्राण्यावर (स्त्रीवर) दिलेली असते—आणखी तीही कोणावर, तर ज्या मानव प्राण्याशीं त्याचा निरंतर सहवास असतो, व जो प्राणी त्याच्या नेहमी डोळ्यांसमोर असतो, त्याच प्राण्यावर तिचा परिणाम काय होतो तो पहा.—ती सत्ता त्या पुरु-

* प्रस्तुत स्थळीं, निबंधकारानें जें एक साधारण तत्त्व किंवा जो एक सामान्य नियम सांगितला आहे, त्याचें उत्कृष्ट उदाहरण मर्मज्ञ वाचकांच्या डोळ्यासमोर तत्काळ उभें रहाणारें असें ह्मटलें ह्मणजे, १८५७ सालची धामधूम! या संबधानें फ्रान्स देशांतील राज्यक्रांति हीही दुसरी एक ऐतिहासिक गोष्ट ध्यानांत आणण्यासारखी आहे.

याच्या प्रकृतिरूप मंदिराचे जे फार दूरदूरचे कोनेकोपरे असतील, त्यांत छपून राहिलेली जी अप्पलपोटेपणाची बीजें, ती हुडकून काढून बाहेर आणते. अथवा, स्वार्थसाधूपणा हाच कोणीएक अग्नि ह्मणा. तो विझून जाऊन, त्याची जी राख राहिली असेल, त्या राखेमधून, जे थोडेथोडे विझलेले निखारे सांपडतील, किंवा त्या निखाऱ्यांतून ज्या अतिशय मंद अशा ठिणग्या उडत असतील, त्यांस ही द्वाड सत्ता वारा घालून, पुनः तो अग्नि प्रज्वलित करिते! त्या पुरुषाची मूळची खरी प्रकृति परक्यांस कळून येत नाहीं. कारण, तिचा बराच अंश, तो परक्यांशीं व्यवहार करीत असतां, मुद्दाम दाबून ठेवीत असतो. पण ही समाजानें दिलेली सत्ता त्याच्या हातांत न राहती तर आपल्या स्त्रीच्या व्यवहारांतही तो पुरुष आत्मसंयमन करता, आणखी, त्याची मूळची प्रकृति अगदीं बदलून जाती. परंतु, या सत्तेच्या योगानें त्याच्या प्रकृतींतल्या दुर्गुणांस पुष्टि मिळून, उलट उत्तेजन मिळतें!

या प्रश्नास दुसरी एक बाजू आहे, हें मी जाणतों. बायकोला जेथें नवऱ्याशीं विरोध करितां येत नाहीं, किंवा तिच्या विरोधाचा जेथें उपयोग होत नाहीं, अशा ठिकाणीं 'जशास तसें' या न्यायानें तिला वागतां येईल, हें मी कबूल करितों. अशा जोडप्यांत पुरुषाचें जीवित जितकें दुःखमय व कष्टमय करितां येईल तितकें करण्याचें बायकोच्याही हातांत असतें. आणि हें बळ तिला अनुकूळ असल्यामुळें, ज्या गोष्टीमध्यें खरोखर तिचा पगडा चालावा व ज्या गोष्टींमध्यें चालूं नये, अशा दोन्हीं प्रकारच्या गोष्टींमध्यें तिचा पगडा चालतो. परंतु, स्वसंरक्षणाचें हें जें एक हत्यार तिच्या हातांत असतें—ज्या हत्याराला 'कजाग बायकोचें हत्यार' असें ह्मणतां येईल, व अशा हत्याराचा उपयोग करणाऱ्या शिरजोर बायकांना कृत्या, कैदासिणी, त्राटिका, कैकेयी अशा प्रकारची नांवें व्यवहारांत देतात—त्या हत्यारांत एक मोठा घातक दोष असतो.

तो असा की, या हत्याराचा उपयोग, जो नवरा अगदी गरीब व मुळीच जुलूम न करणारा, अशावरच ते विशेष चालते; व तेही अत्यंत अयोग्य अशा चाकर माणसांच्या बऱ्याकरितां! दुसरी आणखी एक अशी गोष्ट असते की, वास्तविक ज्या नीच बायकांच्या हातांत हे हत्यार देण्याची मुळीच सोय नाही, अशा नीच बायकांच्या हातांत विशेष करून ते हत्यार जात असते. कारण, बहुधा नामर्दी, हट्टी व द्वाड अशाच बायकांचे हे शस्त्र असते. ह्मणजे, पुरुषांस मिळालेली सत्ता ज्यांच्या हातांत गेली असतां, ज्यांच्या हातून क्वचित तिचा दुरुपयोग होईल, अशाच बायकांच्या हातांत ती सत्ता जात असते. ज्यांची मने कोमल व प्रेमळ असतात, अथवा ज्यांच्यात स्वाभाविक सौजन्य असते, अशा स्त्रियांच्या हातून वर सांगितलेल्या हत्यारांचा कांहीच उपयोग होत नाही. आणि, ज्या स्त्रिया थोर व उदार मनाच्या असतात, त्या अशा प्रकारच्या हत्यारांस तुच्छ मानितात. आणि उलट पक्षाच्या बाजूने पाहिले तर, ज्या नवऱ्यांविरुद्ध या हत्यारांचा उपयोग मोठ्या जारीने करण्यांत येतो, ते नवरे बहुधा सौम्य व शांत स्वभावाचे असे असतात. दुसऱ्यांनी चिडविले असताही आपल्या अधिकाराचा विशेष कडक रीतीने उपयोग करून घेण्याचे ज्यांच्या मनांत येतच नाही, अशा प्रकारचे ते नवरे असतात. नवऱ्याला त्रास देण्याचे जे बळ बायकांस असते, त्याचा परिणाम एवढाच होतो की, उभयपक्षीही लट्ठालठ्ठी सुरू होते! आणि कधीकधी तर असे होते की, ज्या नवऱ्यापासून मुळीच कांही त्रास किंवा उपद्रव बायकास होत नाही, किंवा जुलमी होण्याची ज्या नवऱ्यांमध्ये फारच थोडी प्रवृत्ति असते, असे नवरे कजाग बायकांच्या जुलमाला बळी पडतात!

५. तर मग या सत्तेपासून होणारे जे दुष्परिणाम त्यांना सौम्य करणारे असे व्यवहारांत असते तरी काय? व अशी ही सत्ता

पुरुषांच्या हातांत असतांही वस्तुतः जितका भलेपणा किंवा चांगुल्पणा आपणास जगांत दिसतो, त्याची कारणें काय, असतात? स्त्रियांच्या मुसल्या चोचल्यांचा कांहीं कांहीं व्यक्तीवर जरी बराच परिणाम होतो, तथापि वर सांगितलेल्या साधारण ज्या प्रवृत्ति त्यांवर ह्मणण्यासारखा विशेष परिणाम होत नाहीं. कारण, स्त्रीचे ते नखरे किंवा ते चोचले यांचे सामर्थ्य, जोपर्यंत ती स्त्री तरुण व मोहक असेल तोपर्यंतच टिकते! कधीं कधीं तर, जोपर्यंत त्यांत कांहीं नवेपणा असतो व निकट संबधानें किंवा अतिपरिचयाच्या योगानें तिच्या सौंदर्याचें मृगजळ नष्ट झालें नाहीं, तोंपर्यंतच टिकते! असेही पुरुष हरीचे लाल आढळतात कीं ज्यांच्या मनावर स्त्रियांच्या सौंदर्याचा परिणाम मुळींच घडत नाहीं! तेव्हां, अधिकाराच्या योगानें जुलूम करण्याची जी नैसर्गिक प्रवृत्ति असते, ती प्रवृत्ति कमी होण्याचीं किंवा क्षीणबल व सौम्य होण्याचीं खरीं कारणें [illegible] व कोणचीं असतात, याचें केवळ [illegible] दोन व्यक्तींमध्यें कालेंकरून वाढणारी परस्पर ममता होय.—इतकें मात्र खरें कीं, त्या पुरुषाच्या स्वभावांत ममतेचें कांहीं बीज मूळचेंच असलें पाहिजे आणि त्या स्त्रीचीही मूळची प्रकृति त्याच्याठायीं ममत्व उत्पन्न करण्यासारखी असली पाहिजे. दुसरें, मुलांविषयीं स्त्रीपुरुषांचें परस्पर—सामान्य अशा प्रकारचें प्रेम. त्याचप्रमाणें तिऱ्हाईत माणसाच्या संबंधानें उभय—सामान्य, ह्मणजे उभयतांच्या हिताचे, असे जे पाश, तेही अनेक प्रकारें कारणीभूत होतात. त्यांतही कमीजास्त प्रकार असतातच. तिसरें कारण असें आहे कीं, पुरुषाच्या नित्याच्या सोयीला, सुखाला व उपभोगाला स्त्रीची फारच अवश्यकता असते. यामुळें, केवळ स्वहिताकडे दृष्टि देऊन व स्वसुखाच्या अपेक्षेनें तो बायकोची जी किंमत समजत असतो, तीही लक्षांत आणली पाहिजे. त्या पुरु-

याचें अंतःकरण कोमल असलें, ह्मणजे दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणारें असलें, तर तो कालेंकरून आपल्या स्त्रीवर, केवळ स्वसुखाचीच अपेक्षा न धरितां, प्रेम करूं लागतो. ह्मणजे, त्याच्या त्या प्रेमास निर्मळ, शुद्ध व उदात्त असें स्वरूप प्राप्त होतें. सरतेशेवटीं, अशीही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, बहुतेक सर्व मानवी प्राण्यांवर नेहमीं त्याच्याजवळ असणाऱ्या माणसांचें साहजिकच वजन अधिक असतें.* तीं जवळचीं माणसें त्यास खरोखर अप्रिय होणारीं अशीं मात्र नसलीं पाहिजेत. नवरा व बायको यांचें परस्पर सान्निध्य इतर माणसांपेक्षां अधिक असतें, हें सर्वांस माहितच आहे. तेव्हां, हीं जवळचीं माणसें कधींकधीं प्रत्यक्ष विनवण्यांनीं, व कधींकधीं आपले मनोविकार आणि आपले स्वभाव यांच्या अपरिज्ञात संसर्गानें, आपल्या धन्याच्या वर्तनावर विलक्षण व अयोग्य अशा प्रकारची सत्ता प्राप्त करून घेतात. असो. अशा अनेक साधनांनीं, बायको आपल्या नवऱ्यावर आपला पगडा, वाजवीपेक्षां फाजील बसविते, अशीं अनेक उदाहरणें आढळतात. नवऱ्यावर तिचा पगडा बसल्यामुळें ज्या कामांत तिच्या सल्लामसलतीपासून कांहींएक चांगलें होण्याचा संभव नसतो अशा कामांतही नवरा तिच्या सल्लामसलतीस अनुसरून चालत असतो. अशा प्रसंगीं कदाचित् असेंही घडतें कीं, तिचा अभिप्राय खरोखर

* नवराबायकोचा मुळींच छत्तीसाचा आंकडा असला, व एकमेकांस खरोखर तीं पाण्यांत पहात असलीं, तरी बायकोला नवऱ्याची सत्ता सौम्य करून टाकणें अगदीं अशक्य असतें. किंवा असें समजा कीं, नवरा बाहेरख्याली असला, अथवा परद्वारगमन करणारा असला, तर त्याच्या प्रीतींतली जी स्त्री असेल तिचा, त्याच्यावर जबरदस्त पगडा असल्यामुळें ही वर सांगितलेल्या प्रकारची अनुकूलता बायकोला नसते. तथापि, निबंधकारानीं सांगितलेला नियम साधारणतः दृष्टीस पडतो. संस्कृतांत एका कवीची अशी उक्ति आहे कीं, राजे, स्त्रिया व लता ( वेली ) हीं जवळच्याचा आश्रय करितात. शाकुंतलातील "सर्वः सगन्धेषु विश्वसिति" हें वाक्य ध्यानांत ठेवण्या सारखें आहे. सान्निध्य व सहवास यांचें फल स्नेह होय.

शहाणपणाचा नसून, नीतिविरुद्धही असण्याचा संभव असतो. यामुळे, अशा प्रसंगी बायकोच्या सल्लामसलतीनं न वागतां नवरा आपल्या स्वतःच्याच विचारानें वागला असतां अधिक श्रेयस्कर व इष्ट असते. परंतु, कुटुंबाच्या कारभारांत, किंवा राज्यकारभारांत सत्तेचा लाभ हा स्वातंत्र्याच्या नाशाचा योग्य मोबदला होत नसतो. बायकोचा पगडा नवऱ्यावर असल्याकारणानें ज्या गोष्टींविषयीं तिला मुळींच हक्क नसतो, त्याही तिला मिळतात. तथापि तेवढ्यानें आपले हक्क बोलून दाखविण्याचें सामर्थ्य तिला येतें असें मात्र नाहीं.

**सुलताना**च्या जनानखान्यांतील जी एखादी आवडती दासी असेल, तिच्या सत्तेखालीं इतर दासी असतात. व त्या दासींवर ती जुलुमानें अम्मलही चालवीत असते. परंतु वस्तुतः इष्ट असंत तें हें कीं. तिलाही दासी नसाव्या, व तिनें स्वतःही दुसऱ्याची दासी होऊन राहूंनये.

पतीच्या अस्तित्वांत आपलें अस्तित्व विसरून जाणें, उभयतांचाही संबंध ज्यांत आहे अशा एखाद्या कामांत, पतीच्या इच्छे—व्यतिरिक्त आपली स्वतंत्र अथवा निराळी ह्मणून इच्छा न ठेवणें—निदान अशी इच्छा अपणांस नाहीं असें आपल्या पतीस भासविणें—व त्याच्या मनोवृत्तींवर निरंतर दाब राखण्यांत आयुष्याची कृतकृत्यता मानणें, इत्यादि साधनानीं एखाद्या स्त्रीला फार झालें तर एक गोष्ट घडवून आणण्यांत आनंद मानितां येईल. ती कोणती ह्मणाल तर, ज्यांच्या विषयीं कोणत्याही तऱ्हेची कल्पना करण्याची योग्यता तिनें संपादन केली नाहीं, अथवा कल्पना केली तरी ती तिची आवडनिवड व दुराग्रह यांच्या योगानें सर्वथैव चुकीचीच असणार, अशा प्रकरच्या इतर व्यवसायसंबंधांत आपल्या पतीला सर्व प्रकारें अनिष्ट असें वर्तन करण्यास लाविणें. याचा परिणाम असा होतो की, हल्लीच्या परिस्थितींत जे नवरे आपल्या

स्त्रियांशीं फारच ममतेनें वागतात, त्यांच्या सहवासानें किंवा वर्जनानें, घराबाहेरील इतर सर्व प्रकारच्या संबंधांत स्त्रियांची वर्तणूक चांगली किंवा वाईट होण्याचा सारखाच संभव असतो. किंबहुना कदाचित् अधिक वाईटही होते. कारण, हल्लींच्या रूढीस अनुसरून बायकोची अशी समजूत घालून दिलेली असते कीं, गृहकृत्यांखेरीज इतर गोष्टींमध्यें मन घालण्याचें तिला मुळींच कारण नाहीं. यामुळें सहजच असें होतें कीं, इतर गोष्टींविषयीं प्रोक्त व समंजस असे विचार तिच्या मनांत येत नाहींत. गृहकृत्यांशिवाय इतर गोष्टींमध्यें कांहीं एखादा थोर उद्देश मनात आणून ती वागेल असें घडतच नाहीं. आणि यदाकदाचित् घडलेंच तर, आपल्या स्वतांच्या फायद्याची दृष्टी ठेवील. राजकारणात खरी बाजू कोणती, याविषयीं तिला मुळींच पर्वा नसते. परंतु आपल्या घरांत प्रतिष्ठा किंवा पैसा कोणत्या द्वारानें येईल, आपल्या नवऱ्यास एखादी बडी किताबत कशी मिळेल, अथवा आपल्या मुलास एखादी हुद्याची जागा, किंवा आपल्या मुलीस चांगलेसें स्थळ कसें प्राप्त होईल, या गोष्टी मात्र तिला अवश्य कळत असतात. पण कोणी असें ह्मणेल कीं, कोणताही समाज राजसत्तेखेरीज किंवा राजशासनाशिवाय कसा राहूं शकेल? जसा राज्यकारभारांत, तसा कुटुंबांतही कोणी तरी एक शास्ता अथवा अधिकारी पाहिजेच पाहिजे. विवाहित माणसांमध्यें एखाद्या गोष्टीच्या संबंधानें मतभेद पडला तर, त्या गोष्टीचा निर्णय ठरविणें तो कोणीं ठरवावा? उभयतांच्याही मताप्रमाणें ती गोष्ट घडून येणें तर असंभव असतें. आणखी, त्या गोष्टीचा निर्णय करणें तर जरूर असते. तेव्हां हे जुळावें कसें! या आक्षेपाचे समाधान मी करितो तें येणेंप्रमाणें:—

७. दोन माणसांमध्यें जो यदृच्छेनें घडून आलेला योग किंवा व्यवसायसंबंध त्या संबंधांत 'दोघांपैकीं एकाच्या हातांत पूर्ण सत्ता असलीच पाहिजे' असे जे कित्येकांचें ह्मणणे आहे, ते खरें नाहीं.

विवाहसंबंधाशिवाय दुसरी उदाहरणे व्यवहारांत नेहमी आपल्या पहाण्यांत येतात. त्यांपैकी उदाहरणाकरितां व्यापाराची सर्कत हीच कां घ्याना! प्रत्येक भागीदारीच्या किंवा सर्कतीच्या व्यवहारांत भागीदारांपैकी किंवा सर्कतदारांपैकी हरएक कामांत सर्व अखत्यार एकालाच असावा, व बाकीच्यांनी त्याच्या केवळ हुकमतीत असावे, आणि तो हुकूम फर्मावील तसे वागावे, असे ठरविणे अवश्य आहे, असे कोणी प्रतिपादन करील काय! उघडच आहे की, असे ठरविणे लोकांस अवश्य वाटत नाही. कारण, अशा प्रकारच्या सर्कतीच्या व्यवहारांत, मालकाची जबाबदारी तेवढी शिरावर घेऊन, हातांत खरोखर सत्ता किंवा अधिकार पाहिला तर, एखादा कारकून किंवा गुमास्ता असावा याच्याच इतका! तेव्हा, अशा अटी कोण कबूल करील? कोणीही कबूल करणार नाही.

विवाहाच्या संबंधाने जी व्यवस्था कायद्याने केली आहे, त्या प्रकारची व्यवस्था जर इतर करारांच्या संबंधानेही कायदा करील, तर त्यास असा ठराव करावा लागेल की, एका भागीदाराने सर्व दुकानांचा समाईक व्यापार किंवा कारभार आपल्या खाजगी कारभाराप्रमाणेच करावा, बाकीचे भागीदार केवळ मुकत्याराप्रमाणे समजले जावे, आणि जो एक भागीदार दुकानाचा कारभार मालकाप्रमाणे चालवील त्याची योजना कांहीएका साधारण तत्त्वास अनुसरून करण्यांत यावी. उदाहरणार्थ, सर्वांत वडील असणे! कायद्याने अशा प्रकारचे मूर्ख ठराव कधी केले आहेत काय? कधी नाहीत. त्याचप्रमाणे, भागीदारांचे अधिकार किंवा हक्क कमजास्त असावे, अथवा भागीदार आपल्यांतच ठराव करून जी कांही व्यवस्था करतील, किंवा ज्या अटी कबूल करतील, त्यांत, कायद्याने हात घालावा, व दुसऱ्याच कांही अटी कबूल करण्यास भाग पाडावें, असे ठरविण्याची अवश्यकताही अनुभवावरून दिसत

नाही. उलट अस:
जो कनिष्ठ किंवा कमी
हक्काला विशेष धोका न ये
येईल. कारण, त्या सर्कती
तोडण्याची मोकळीक भागीदारास
अगदी निराळी आहे. कारण, वाय
किंवा सत्ता मुळीच नसते. आणि जरी
सत्तेचा उपयोग करून घेण्यापूर्वी, दुसऱ्या
तिने करावी, हेंच इष्ट असते.

८. ज्या गोष्टीच्या संबधाचा निर्णय रोजच्यारोज कर
ज्याची हळुहळू आपल्या आपणच व्यवस्था लागत नाही,
गोष्टीचा निर्णय सर्वांचा एक विचार झाल्यावेरीज व
नाही, अशा कामांत निर्णय व्हावयाचा तो, एकाच माणस
नुसार झाला पाहिजे ; ह्मणजे, एकाच माणसाला सर्व प्रकार
असली पाहिजे, हे स्पष्ट आहे. परंतु एवढ्यावरून अ
त्यारी असावयाची, ती नेहमी एकाच माणसाला अस
मात्र ठरत नाही. स्वाभाविक व्यवस्था ह्मटली ह्म
सत्तेचा विभाग झाला पाहिजे. प्रत्येकाकडे जी ज
असतील, ती ती बजावण्याच्या कामांत त्यास पू
पाहिजे. व तीं कामें चालविण्याच्या पद्धतीत कि
करणें झाल्यास तो उभयतांच्या संमतीने झाला
वांटणी व्हावयाची ती पूर्वीच कायद्याने ठर
नसते. खरोखर, कायद्याने ती ठरवूं नये,
व्यवसायविभाग व्हावयाचा तो प्रत्येक व्यक्त
अवलंबून असतो. या उभयतांची इच्

.चो ती लग्नापूर्वीच करून
। व्यवस्थाही लग्नापूर्वीच कांहीं
.वी. परस्परांच्या संमतीने अशी
.चण येईल, असे दिसत नाही. आतां
., ज्या ठिकाणी स्त्रीपुरुषांचे पहिल्यापासूनच
., सर्व बाबतींत व सर्व कामांत तटेबखेडे माजून
अत्यंत दुःखभागी होतात, अशा प्रकारच्या नवऱ्या-
.ाष्टच निराळी आहे. त्यांबद्दल आमचें कांहीं ह्मणणे नाहीं.
.तक्या दुःस्थितींत असणारी युग्मे, अल्पसंख्येत गणिली पाहिजेत.
ह्मी विचार करीत आहों तो बहुसंख्येचा. असो. तेव्हां वर सांगि-
ाप्रमाणे परस्परांच्या अधिकाराचा एकदा विभाग ठरला, ह्मणजे
च त्यांच्या कामांची व त्यांच्या परस्परकर्तव्यांची व्यवस्था लागेल.
ही गोष्ट अर्थात् उभयतांच्या सल्ल्यानेच झाली पाहिजे. निदान,
ी तरी ती ठरवू नये. सामान्यतः, रूढीनेच ती ठरली जावी.
विवाहित माणसांस आपल्या खुषीस योग्य वाटेल तो फेरबदल
ऱ्या.

ां असे पहा की, दोघांपैकी कायद्याने कोणासही अधिकार
खरोखर संसारांतील कामांचा निर्णय, बहुतेक दोघांच्या
अवलंबून रहाणार. प्रस्तुत जो लोकव्यवहार आहे,
गोष्ट दृष्टीस पडते. नवरा बहुधा बायकोहून वडील
ोष्ट नवऱ्याला कांहीं एक प्रकारची पुरी वजनदारी किंवा
स्स होते. निदान, उभयतांच्या वयामध्ये जे अंतर
निरुपयोगी होऊन, ती उभयतां अनुभवाने व ज्ञानाने
ामे असतेच. दुसरे असे आहे की, नवराबायकोपैकीं
ाचे साधन मिळवील त्याला व त्याच्या शब्दाला

*

वजनदारी अधिक
हाच्या कायद्यावर अ
प्रस्तुत जी साधारण स्थिति ७.
स्वभावाची उदात्तता, मनाची ।
साधारण असो, किंवा कांहीं विशेष क.
व्हावयाचा, तो अवश्य होणारच, व हल्लीह।
आढळण्यांत येते. यावरून, व्यापाराच्या क.
जसे दृष्टोत्पत्तीस येते, त्याप्रमाणे समाजाच्या सर्व .
जी स्त्रीपुरुषे, त्यांच्यावरील जबाबदाऱ्या व त्यांच्याव‹
यांची योग्य व्यवस्था परस्परांच्या संमतीने व करारानें हे।
अशी जी समजूत आहे. तिला मुळीच आधार नाहीं, असें उघड '
ज्या ठिकाणीं दोन माणसें विवाहपाशानें बद्ध झाल्यामुळें, सर्व५
दुःखभागी झाली आहेत, अशांची गोष्ट निराळी. परंतु प्रस्तुतचा लोकव्यवहार पाहिला असतां, नवराबायकोम ्यें अशी व्यवस्था नेहमी करण्यात येते. ज्या माणसांचा विवाहसंबंध सर्वस्वी चुकीचा घडलेला नसतो, व परस्पराचा संबंध तुटला असता उभयपक्षीं फार सुखाची गोष्ट होणार आहे, असा प्रकार ज्या ठिकाणीं नाहीं, त्या ठिकाणीं, एका पक्षीं केवळ सत्तेचा जोर, व दुसऱ्या पक्षीं केवळ आज्ञाधारकत्व, असाच केवळ प्रकार नसतो. कोणी असें ह्मणतील की, नवराबायकोमध्ये मतभेद पडला असतां, त्यांची आपसांत जी समजूत होत असते, व समाराँतील
माचा जो निकाल लागत असतो, त्याचे कारण कायद्यानें पुरुषास
; सत्ता दिलेली असते व तिचा अमल जबरदस्तीने न होण्याची जी
'ति स्त्रीला असते, ती होय. लोक लवादाकडे आपला तटा नेऊन तोडून
तात, याचे कारण इतकेच असते की, त्यांनी तसें केलें नाहीं तर, कोर्ट
पांजकडून आपला हुकूम सक्तीनें अमलांत आणील. परंतु, माझें असें

नाहींत. या दोन्ही गोष्टी
ण अशी कल्पना करू की,
ाची चौकशी करून उभय पक्ष-
ाग्य वाटेल, त्याच्याच तर्फेने कोर्ट जसे
ारता, समजा की, मुकद्दम्याची चौकशी कोर्ट
कोर्ट आपलें नेहमी एकाच पक्षाच्या तर्फेने—
ादीच्याच तर्फेने—निकाल देते. असे असत तर
लवाद जो कांहीं ठराव करील, तोच कबूल करणे भाग
इकडे प्रतिवादीच्या संबधानें वादीच्या अगदीं उलट प्रकार
ता. तो कांहींच कबूल करिताना! कारण की, कोर्टात गेल्याबरोबर
फैसल्ला आपल्या तर्फेनेच होणार, हें त्यास पक्कें ठाऊक! यावरून
हें उघड होतें की, बायको वस्तुतः नवऱ्याच्या पूर्ण सत्तेखालीं असल्यामुळें आपमांतील तडजोडीनें जो कांहीं अधिकार मिळेल तेवढ्यावरच राजी असते याचें कारण कायद्यानें नवऱ्याला जी सर्वतोमुखी प्रभुता, अथवा जो सत्तात्मक अधिकार दिला आहे, तो आहे, असें ह्मणता येईल. परंतु, नवरा आपला अधिकार स्वेच्छेनें कमी करून घेतो, या गोष्टीचें कारण ती प्रभुता होणार नाहीं. कां की, नवऱ्याला कायद्याची व कोर्टाची भीति बाळगण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. सदाचारसंपन्न व सभ्य अशा लोकांत, स्त्रीपुरुषांच्या व्यवहारांत ऐक्यभाव असून, उभयतांमध्यें सत्तेचा विभाग चांगल्या प्रकारें झालेला आढळतो. आणि हे केव्हां? तर दोघांपै
एकाला—अर्थात् पुरुषाला—नीतीचा किंवा लोकाचाराचा पाश, उ
करण्यास मुळींच भाग पाडीत नसतांही, अशी गोष्ट असते. दो
माणसांचा विवाहपाशानें बद्ध झालेला जो संसार, त्याची व्यवस्थ
दोघांच्याही संतोषानें व इच्छेने दोघांसही मान्य होण्यासारखी करि

येते, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. या नियमास प्रतिकूल व अपवादक अशा काही गोष्टीखेरीज, बहुतेक सर्वत्र लागू पडणारी, अशी कांही स्वाभाविक कारणे, या चमत्काराला असलीच पाहिजेत. दोघांपैकी एकालाच कायद्याने सत्ता देणे, याचा उपयोग व्यवहारांत मुळीच होत नाही असे दिसते. कारण वस्तुतः त्यासत्तेची अमलबजावणी कधीच होत नाही. संसाराच्या स्वतंत्र इमारतीची रचना जी व्हावयाची ती, एका पक्षाला पूर्ण सत्ता, व दुसऱ्या पक्षाला पूर्ण परवशता, अशा पायावरच रचली पाहिजे; जो अधिकार, पूर्ण सत्ताधीश, दुसऱ्या पक्षाला केवळ मेहरबानीने, राजीखुषीने व स्वसंतोषाने देईल, तोही त्याने पाहिजे तेव्हां परत घ्यावा, अशा प्रकारचा ठराव कायद्याने करणें यांत काय लाभ असेल तो असो! मला तर असें वाटतें कीं, त्यापासून खरोखर कांहींएक फायदा नाही. शिवाय, अशा प्रकारच्या अनिश्चित अटीवर मिळालेल्या स्वातंत्र्याची किंमत विशेष नसणार, हे उघड आहे. ज्या अर्थी एकाच पारड्यांत कायदा इतके वजन घालतो, त्या अर्थी असल्या स्वातंत्र्याच्या अटी विशेष न्यायाच्या असतील, असें संभवनीय नाही. शिवाय अशा प्रसंगीं आपसांत समजूत होत असते ती, अशा दोन माणसांतच होत असते कीं, त्यांपैकी एकाला सर्व प्रकारचे अधिकार कायद्याने दिलेले असतात; [illegible]
पहिल्याच्या इच्छेबाहेर कांहींच अधिकार कायद्याने [illegible]
तात; एवढेच नव्हे, तर जुलुमाची कितीही परमावधि
त्याजविरुद्ध (नवऱ्याविरुद्ध) बंड न करण्याविषयी, [illegible]
जबरदस्त लोढणे त्याच्या गळ्यांत अडकावून [illegible]
अशा स्थितीत नवराबायको एकमेकांशी
त्याची खरी कारणे कायद्याने दिलेल्या
असतात, हे उघड नाही काय?

१०. यावर एखादा दुराग्रही प्रतिपक्षी असे ह्मणेल की, नवरे आपल्या बायकांचे योग्य हक्क मान्य करण्यास कबूल असतातच. ते मान्य करण्याचे त्यांस भाग पाडण्याची गरजच नाही. परंतु बायकाच असे करण्यास कबूल नसतात. बायकांना जर कांही हक्क दिले, तर त्या दुसऱ्याचे कोणतेच हक्क मान्य करणार नाहीत. ह्मणून पुरुषानें केवळ सत्तेच्या जोरावर प्रत्येक कामांत त्यांजवर जुलूम करणे अगदी जरूर आहे. अशा प्रकारचे प्रतिपादन करण्याचा प्रघात, कांही काळापूर्वी लोकांत जारीने सुरू असे. त्या काळी, स्त्रियांवर अनेक प्रकारचे दोष लादण्याची रीतच पडून गेली होती. पुरुषांनी आपण होऊन, स्त्रियांस जी स्थिति प्राप्त करून दिली होती, त्या स्थितीचे वर्णन करून, उलट आपणच त्यांची निंदा व निर्भर्त्सना करणे हेच पुरुषांस त्या काळी मोठें भूषण वाटे! परंतु हल्ली कोणताही प्रतिष्ठित अथवा सभ्य मनुष्य अशा प्रकारचे प्रतिपादन करणार नाही. सांप्रत बहुतेक सुशिक्षित पुरुषांचे असे मत आढळते की, स्त्रियांचा ज्या माणसांशी अत्यंत दृढ संबंध झालेला असतो, त्यांच्यांशी त्या, पुरुषांपेक्षां कमी ममतेनें किंवा प्रेमानें वागतात असें नाही. फार काय, लोकांचे नेहमी
रूट असे ह्मणणे पडते की, स्त्रिया पुरुषांपेक्षां अधिक चांगल्या व
मनाच्या असतात. आश्चर्य हे की, जे पुरुष स्त्रियांचा इतका
ह्मणून वर्णन करितात, तेच पुरुष, स्त्रिया चांगल्या आहेत
तदनुसार त्यांस वागविण्याला मात्र सर्वस्वी विरुद्ध अस-
णाम असा होतो की, वरील [illegible] किंमत मान-
होत नाही. तिचा उद्देशच अन्यायाला मनोहर
**गलीव्हर** यानें वर्णन केलेल्या **लिलीपट**
आपल्या अपराध्याला अत्यंत कडक
गीत भरलेल्या भाषणांची रेलचेल

करून देत असे त्याचप्रमाणे हा प्रकार होय.* पुरुषांपेक्षां स्त्रिया जर एखाद्या कामांत अधिक चांगल्या, असे असेल तर कुटुंबरक्षणांत जो विलक्षण आत्म-निग्रह त्या दाखवितात तो होय. आपल्या कुटुंबा तील माणसांविषयीं त्यांस किती कळकळ वाटत असते व किती झीज त्या सोशीत असतात! परतु या गोष्टीला मी कांहींच महत्व देत नाहीं. कारण, जोपर्यंत, 'आपला जन्म दुसऱ्याकरतां आहे, व स्त्रीजातीला देवानें केवळ कष्ट करण्याकरितांच निर्माण केले आहे,' अशी त्यांच्या मनाची समजूत करून दिलेली असते तोपर्यंत या गोष्टीला महत्व आहे, असें मानितां येत नाहीं. माझें मत असें आहे की, 'स्त्रीपुरुषांचे हक्क सारखे आहेत' या तत्वावर जेव्हां या जगांत व्यवहार सुरू होतील, 'आत्मसंयमन, परदास्य, व स्व सुख-निरपेक्षता, हाच स्त्री-धर्म,' असे जे प्रस्तुत कृत्रिम स्वरूप स्त्री-स्वभावाच्या उदात्त कल्पनेस प्राप्त झालें आहे, ते जेव्हां नष्ट होईल तेव्हांच स्त्री-स्वभा-वाची खरी परीक्षा होईल. आणि तेव्हाच, कितीही चांगली बायको घेतली, तरी ती उत्तम पुरुषांपेक्षा अधिक आत्म-निग्रही आढळणार नाहीं. परतु उलट असें होईल की, पुरुषांची स्वार्थ-दृष्टि हल्लींपेक्षा पुष्कळ कमी होईल. व आत्म-निग्रहाच्या कामी ते अधिक दक्ष होतील. कारण, आपलीच इच्छा काय ती बलीयसी, व ती इच्छाच आपला कायदा, असे मानून तिच्याच अनुरोधानें दुसऱ्या मानवी-प्रा ण्यानें सर्वस्वी चालावें, असे ते मानणार नाहींत, देवाच्या ठिकाणींच आपण, आपण काय ते पूज्य-दैवत, असें मानणें, याशिवाय दुसरी कोणतीही गोष्ट पुरुष अधिक लौकर शिकत नाहीं. आजपर्यंत जि-तक्या म्हणून माणसांस वरिष्ठ हक्क प्राप्त झाले, किंवा ज्या ज्या जाति अधिकार-संपन्न झाल्या, त्यांस 'अहंविशेषः' एतद्रूप जबरदस्त

* पहा. गलीवरचा वृत्तांत, लिलीपटची सफर भाग ७.

व्याधि जडून त्यापासून बहुत पीडा झाली आहे, असे आढळते. मानवी–जातीमध्ये जे अनेक उच्चानीच प्रकार आढळतात, त्यांत, जो जों खाली खाली जावे, तों तों या अहंभावरूप विकाराची तीव्रता अधिकाधिक दृष्टीस पडते. आणि विशेष करून ज्यांना, आपली दुर्दैवी स्त्री व आपली अभागी मुले, ह्यांच्याशिवाय इतर मनुष्य-प्राण्यांवर सत्ता कशी ती मुळी प्राप्त झालीच नाही, किंवा प्राप्त होण्याची ज्यास आशाही नाही अशा लोकात हा विकार अथवा दोष विशेष आढळतो. मानवी–जातींत इतर जे सर्वसाधारण दोष आढळतात, त्यांत अपवादक अशी पुष्कळ उदाहरणें असतात. परन्तु, या दोषापासून मुक्त असलेली माणसे फारच थोडीं सांपडतात. या दुष्ट प्रवृत्तीचें नियंत्रण, धर्म व तत्त्वज्ञान, या उभयतांच्याही हातून आजपर्यंत मुळीच झाले नाही, असे ह्मटले असतां चालेल. तर उलट तिला उत्तेजन देण्याविषयी त्यांचा निश्चय झालेला दिसतो ! ‘ सर्व मनुष्य–प्राण्यांचे हक्क सारखे आहेत, ’ असे जे ख्रिस्तीधर्म–शास्त्रांत मानलेले एक तत्त्व आहे, त्याच्यामुळे या दुष्ट प्रवृत्तीला जो कांहीं प्रतिबंध वस्तुतः होतो, तो होतो. एका मनुष्यप्राण्याने दुसऱ्या मनुष्यप्राण्यावर सत्ता चालवावी, या तत्त्वावर उभारलेल्या ज्या रूढि किंवा संस्था, त्यांस ख्रिस्तीधर्म निःशंक आपली संमति देत असल्यामुळे ख्रिस्तीधर्म शास्त्रांतच आढळणारे जे हे मनुष्यप्राण्याच्या समतेचे महाप्रमेय तदनुसार वर्तन ठेवण्याविषयी ख्रिस्तीधर्म लोकांस उपदेश करीत नाहीं.

११. आतां ही गोष्ट खरी की, ज्यांस समानतेचें तत्त्व आवडत नाहीं, अशा स्त्रियाही पुष्कळ आढळतात. आपलाच हेका धरून बसणाऱ्या, आपल्याच मर्जीप्रमाणे सगळ्या गोष्टी झाल्या पाहिजेत असें मानणाऱ्या, पुरुषाप्रमाणे पुष्कळ स्त्रियाही असतात. काडी मोडून देण्याच्या कायद्याला असली मंडळी योग्य विषय होत;

कारण, अशा माणसांनीं वनवाशासारखे एकटेराहणे हेच उचित होय! अशा माणसांचा व इतर मनुष्यांचा सहवास जबरदस्तीनें घडवून आणणे हे फारच अयोग्य व अन्यायाचे आहे. परंतु, स्त्रियांमध्ये अशा स्वभावाच्या व्यक्ति, प्रस्तुतची कायदेशीर परवशता जोपर्यंत कायम राहील, तोपर्यंत कमी न होतां, उलट्या अधिकच वाढत जातील. पुरुषांस जितकी सत्ता कायद्याने टेविली आहे, त्या सर्व सत्तेचा जर तो पूर्ण उपयोग करून घेईल, तर त्याच्या सत्तेखाली असलेली स्त्री एखाद्या मुंगीसारखी सहज चिरडली जाईल. परंतु असे न करितां तिला जर त्याने लडिवाळपणाने वागविलें, ती नाचेल तशी नाचू दिली, व तिला नवऱ्याने आपल्या डोक्यावर बसू दिली तर ती आपला पगडा कोठपर्यंत चालवील त्यास मर्यादाच रहाणार नाही! हल्लीच्या कायद्याप्रमाणे तिच्या हक्काला किंवा अधिकाराला कोणत्याच प्रकारची मर्यादा ठेविलेली नाही, कारण, हल्लीच्या कायद्याप्रमाणे तिला मुळी कांही हक्कच नाहीत. परतु याचा परिणाम व्यवहारांत असा होतो की, ती युक्तिप्रयुक्तीने जेवढी सत्ता मिळवील तेवढीच सत्ता खरोखर तिला प्राप्त होते.

तेव्हां, नवराबायकोचा हा विशेष संबंध न्यायास अनुसरून व उभयपक्षांस हितावह व्हावा, असे जर असेल तर तसें होण्यास, कायद्याच्या दृष्टीने विवाहितमाणसांचे हक्क सारखे असणे, हा काय तो एकच मार्ग आहे. एवढेच काय, परंतु मनुष्यांमध्यें नित्य घडून येणारा परस्परव्यवहार, नीतिशिक्षणाची केवळ शाळाच होऊन रहावी, असा जर हेतु असेल तर, तो हेतु या एकाच साधनानें तडीस जाणें शक्य आहे.

१२. खऱ्या नीतिशिक्षणाची एकच शाळा आहे. ती कोणची! तर सारख्या सारख्या माणसांचा सहवास. हें तत्त्व, कित्येक पिढ्या

गेल्या तरी, लोकांच्या मनांत पूर्णपणें भिनणार नाही, किंवा सर्वसामान्य होणार नाहीं. ही गोष्ट निराळी. मानव जातीचें नीति शिक्षण आजपर्यंत बलात्काराच्याच तत्त्वावर चालत आलें आहे. यामुळे, केवळ बलात्कारापासून जे संबंध उत्पन्न होणारे आहेत, तेवढ्या पुरतेंच तें शिक्षण उपयोगी आहे. रानटी स्थितीतली माणसें आपल्या बरोबरीच्या माणसांचा संबंध मुळींच मान्य करीत नाहींत. कारण, अशा समाजांत कोणाच्या बरोबरीचें होणें ह्मणजे, प्रत्यक्ष त्याचा शत्रूच होण्यासारखें असतें! अगदीं उच्चस्थितीपासून तों अगदीं नीचस्थितीपर्यंत कोणताही समाज पाहिला तर, तो एखाद्या शिडीसारखा किंवा एखाद्या लांब सांखळीसारखा दिसतो. त्या सांखळीची एखादी कडी, किंवा त्या शिडीची कोणतीही पायरी घेतली, तर ती आपल्या शेजारच्या कडीच्या किंवा पायरीच्या एक वर तरी असते, किंवा खालीं तरी असते! त्याचप्रमाणें समाजातल्या प्रत्येक माणसाची स्थिति आढळते. जो मनुष्य सत्ताधीश नाही, तो बहुधा सत्तावश असतो. ज्याच्या नशिबीं हुकमत नाहीं, त्याच्या भोगाला आज्ञाधारकत्वच येते. यामुळे, प्रस्तुतची जी नीति आहे, ती मुख्यत्वेंकरून आज्ञा करणारा व आज्ञा मानणारा यांजमधील जो संबंध, किंवा ज्याला सेव्य—सेवक —भाव असेही ह्मणतां येईल, त्या संबंधाच्याच योग्य आहे. दुर्दैवानें आज्ञा करणें आणि आज्ञा मानणें ह्या अवश्य गोष्टी होऊन राहिल्या आहेत. परंतु खरें पाहतां ही स्थिति आगंतुक आहे. मनुष्यजातीची खरी नैसर्गिक स्थिति ह्मटली ह्मणजे, समतेची होय. आधुनिक काळी व जो जो सुधारणा अधिकाधिक होत जाईल तो तों हुकूम करणें व हुकूम मानणें, ह्मणजे निव्वळ सेव्यसेवकभाव, याचें प्रमाण लोकव्यवहारांत कमी कमी होत जाऊन समतेचे तत्त्व सर्वसाधारण होत जाईल. पूर्वीच्या युगांतली नीति, सत्तेला सर्वथा वश

होणे, यांतच होती. त्यामागून जो काल आला, त्या कालांत जे दुर्बळ असतील, त्यांचे संरक्षण व त्यांचा परामर्ष प्रबलाकडून व्हावा, हाच त्यांचा हक्क समजत, व हीच स्वर्गी नीति मानीत. समाजाच्या एका स्थितीत योग्य मानलेली जी नीति ती दुसऱ्या समाजाने किती दिवस पतकरून रहावे? परवशतेच्या तत्त्वांतून निघालेल्या नीतीचे कांही दिवस गेले. त्यानतर पराक्रम व औदार्य या गुणांनी युक्त अशा नीतीचेही कांही दिवस गेले. आतां असा काल आला आहे की, नीति ही न्यायास अनुसरून असावी. पूर्वीच्या काळी, ज्या ज्या वेळी समतेचे तत्त्व समाजांत आणण्याचा यत्न झाला, त्या त्या वेळीं **न्याय**-**देवतेने** सद्गुणाचा व सद्धर्माचा पाया केवळ न्यायावर रचण्याविषयींचे बोलणे लाविलें. हा प्रकार प्राचीन कालच्या लोकसत्तात्मकराष्ट्रांत घडून आला. परंतु त्या लोकसत्तात्मकराष्ट्रांत जीं उत्तम राष्ट्रें होतीं, त्यामध्ये देखील पुरुषजातीपैकी स्वतंत्र असे जे नगरवासी लोक होते, तेवढ्यांतच समतेचे तत्त्व मर्यादित झाले होते. दास, स्त्रिया व ज्यांना नगरवासीजनांचे हक्क नव्हते अशीं जीं माणसें होतीं तीं जुलमाच्याच कायद्याखाली होतीं. हा भेदाचा प्रकार **रोमन** लोकांत जी पुढे सुधारणा झाली तिने व ख्रिस्ती धर्माने उभयतांनीं मिळून नाहींसा केला. यद्यपि ते शास्त्र अमलांत फारसे येत नसे, तथापि निदान धर्मशास्त्राने आपल्याकडून तरी, लिंग, जाति, अथवा गरीबश्रीमंत, वगैरे भेद मानूं नयेत, कायद्याच्या दृष्टीने सर्व मनुष्यांस सारखे हक्क आहेत, असे ठरविलें होते. हे भेद जो नुकतेच कोठें नाहींतसे होत चालले होते, इतक्यांतच उत्तरेकडील लोकांनी सर्व देश काबीज करून, आपला पगडा सर्वत्र बसविल्याकारणाने, त्या लोकांनी ते भेद पुनः जशाचे तसेच पूर्ववत् उपस्थित केले. आणि बहुतेक सर्व अर्वाचीन इतिहास पाहिला असतां हे भेद **क्रमाक्रमानें**

कसे नाहींतसे होत गेले, ही गोष्ट स्पष्टपणें दिसून येते. हल्ली आलेला काळ काहीं निराळा आहे. प्रस्तुतच्या मन्वतरांतली व्यवस्था अशी होणार आहे कीं, न्याय हा पहिला अथवा मुख्य सद्गुण मानण्यांत येणार. पूर्वीप्रमाणे समतेचें तत्व तर त्यांत रहाणारच. विशेष ह्मणून इतकाच होणार कीं, या समतेच्या तत्वाबरोबर, सहानुभूति किंवा भूतदया, हा गुणही सामावलेला राहील. स्वसंरक्षणापुरता, ह्मणजे फक्त आपल्या बचावापुरताच जो सारखेपणाचा भाग पूर्वी होता, तेवढाच भाग हल्ली नसून, परस्परप्रेम व परस्परांविषयीं पूज्यबुद्धि या गुणांचीही भर त्यात पडेल. या नवीन व्यवस्थेतून कोणताही मनुष्यप्राणी वगळला न जातां, सर्वांसच सारखे माप घातलें जाईल. भावी काळास अनुलक्षून आपल्यामध्यें अवश्य होणारे फेरबदल माणसास स्पष्टपणें दिसत नाहींत. आपले विचार व आपल्या कल्पना पूर्वीच्याच काळाला योग्य असून पुढे येणाऱ्या काळाला उचित नाहींत, ही गोष्ट त्याच्या ध्यानांतच येत नाहीं. आणि असें होतें याचेंही नवल मानण्याचें कारण नाहीं. मनुष्यजातीची भावी स्थिति ध्यानांत आणणें किंवा जाणणें, हें काम, जीं विलक्षण बुद्धिमत्तेचीं थोडींशीं माणसें जगांत असतात, त्यांच्याकडून एक होत असतें; किंवा त्यांचे जे विद्यार्थी असतात, त्यांच्या हातून होत असतें. त्या भावी स्थितींतील विचार व कल्पना यांचा, प्रत्यक्ष रीतीनें जे अनुभव घेतात, असे हरीचे लाल तर फारच थोडे असतात! आणि जे असतात त्यांना, बहुधा लोकांचा छल सोसावा लागतो! किंबहुना त्यांस आपल्या जिवाचा बळीही द्यावा लागतो *!

---

*ख्रिस्त, सॉक्रेटीस, न्यूटन, ग्यालिलिओ, लूथर, तुकाराम, ज्ञानदेव वगैरे, अनेक तत्वज्ञांचा सुधारकांचा व भगवद्भक्तांचा छल त्या त्या कालीं, त्या त्या कालच्या लोकांनीं कसा केला ही गोष्ट इतिहासज्ञांच्या लक्ष्यांत येणार आहे.

नवीन काळास किंवा स्थितीस आरंभ झाल्यानंतर बराच काळपर्यंत संस्था, ग्रंथ, शिक्षण, व समाज, पूर्वींच्या काळास जे मार्ग उचित होते तेच मार्ग, मानव-प्राण्यांना पुढेही शिकवीत सुटतात! तेव्हां नवीन काल अजून यावयाचा आहे अशा स्थितीत जुना प्रकार चालू राहतो यांत नवल काय? परंतु मनुष्यप्राण्यांचा खरा सद्गुण ह्मटला ह्मणजे, बरोबरीच्या नात्यानें एकत्र रहाण्याची त्यांच्या ठायीं योग्यता येणें; दुसऱ्यास आपण जें स्वेच्छेनें देणार नाहीं, तें दुसऱ्यापासून घेण्याची इच्छा न करणें; आपल्याहून इतर मनुष्यप्राण्यांना कोणत्याही प्रकारें आपल्या आर्जित किंवा सत्तेंत ठेवण्याची अपेक्षा अल्प कालपर्यंतच टिकणारी आहे, असें समजणें; ज्या ज्या वेळेस शक्य असेल, त्या त्या वेळेस दुसऱ्याच्या अनुरोधानें आपण चालणें व आपल्या अनुरोधानें दुसऱ्यास चालविणें, असा प्रकार परस्परांच्या संबधांत ठेवण्याविषयीं यत्न करणें. प्रस्तुतच्या लोकव्यवहाराची जी स्थिति आहे, ती ध्यानांत आणिली असतां, या गुणांच्या अभिवृद्धीस किंवा उत्कर्षास कारणीभूत होण्यासारखें कांहींच दिसत नाहीं. आमचें कुटुंब ह्मणजे निव्वळ बलात्काराचें तत्व शिकविण्याची शाळा! या कुटुंबरूपी शाळेंत बलात्काराच्या ज्या चांगल्या गोष्टी किंवा चांगले गुण आहेत तेवढ्यांचीच अभिवृद्धि होते, असें नाहीं. तर त्या गुणांबरोबर दुर्गुणांचीही अभिवृद्धि होते. स्वतंत्र देशांत नगरवासी लोकांमध्यें समतेनें वागणारास समाजाचें शिक्षण अंशतः मिळतें. परंतु अलीकडल्या आधुनिक व्यवहारांत नगरवासीपणाचा भाग फार थोडा असतो. यामुळें माणसांचा जो नित्याचा व्यवहार असतो, त्याच्या नेहमींच्या ज्या संवयी असतात, किंवा त्यांच्या अंतःकरणांतले जे विकार असतात, त्यांशीं नगर-वासीपणाचा विशेष संबंध नसतो.

कुटुंबाची रचना व व्यवस्था, यथान्याय व योग्य प्रकारें होईल तर,

स्वातंत्र्यापासून प्राप्त होणारे जे सद्गुण, ते शिकण्याची कुटुंब ही एक खरी शाळा होणार आहे. फार काय, इतर सर्व गुणही त्याच शाळेंत खास शिकवितां येतील. कुटुंबरूप शाळेंत मुलांनी आज्ञाधारक होण्यास शिकणें, व आईबापांनीं मुलांस आपल्या आज्ञेत ठेवणें, हा प्रकार नेहमीं रहाणारच. परंतु जी सुधारणा पाहिजे आहे, ती ही कीं, त्याच शाळेंत प्रत्यक्ष आईबापांनीं प्रेमानें एकत्र रहाणें, व तेंही बरोबरीच्या नात्यानें राहून, परस्परांनीं परस्परास मान देणें, व परस्परांवर ममत्व ठेवणें, असें असून एकाच्या हातांत सत्ता किंवा हुकमत, व दुसऱ्यानें त्याच्या हुकुमात रहाणें, हा प्रकार मुळींच नसला पाहिजे. आणि असें होईल तेव्हांच, समाजांतील इतर जे नानाविध संबंध किंवा पाश, त्यास योग्य करणारे जे सद्गुण, ते आईबाप या कुटुंबरूप शाळेंत शिकत असल्यासारखें होईल. आईबापांची परस्पर वर्तणूक, व परस्परांविषयीं प्रेम व पूज्य–बुद्धि, इत्यादि पाहून त्या मुलांची ती अल्पकाळ टिकणारी आज्ञा–धारकतेची स्थिति संपल्यावर, आपल्या आईबापांच्या कित्त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवण्याच्या सवयी त्यांस सहजच लागणार आहेत. माणसांत जी अनेक प्रकारें सुधारणा होत आहे, तिचा जो मुख्य हेतु त्या हेतूस अनुसरूनच, मनुष्य-जातीचें नीति--शिक्षण असलें पाहिजे, हें उघड आहे. परंतु मानवी- समाजाच्या नैसर्गिक--रचनेंत उपलब्ध होणारा नीति--संबंधाचा जो मुख्य नियम ( व्यक्तिमात्रांचें स्वातंत्र्य व समता ) तो नियम कुटुंबाच्या व्यवस्थेंत, जोपर्यंत अमलांत आणिला नाहीं, तोपर्यंत तें शिक्षण त्या हेतूस अनुसरून कधींच असणार नाहीं. त्या शिक्षणाची ती दिशा खचित चुकेल. ज्या माणसांवर त्याची सर्वस्वी पूर्ण सत्ता आहे, ज्या माणसांचा तो आपणास मालक व यजमान समजतो, अशा माणसांशींच फक्त ज्याचा अत्यंत निकट संबंध व अत्यंत स्नेह व अत्यंत परिचय, अशा पुरुषाची स्वातंत्र्य-विषयक जी भक्ति असा-

वयाची ती खरी व ख्रिस्तिधर्मास मान्य अशी भक्ति नव्हे. तर ही .. भक्ति ह्मणजे प्राचीन काळच्या लोकांत व मध्य--युगें ( Middle Ages ) ह्मणून ज्या काळास संज्ञा दिली आहे, त्या काळच्या लोकांत साधारणतः ज्या प्रकारची असे तशीच ह्मणावयाची-- ह्मणजे काय, तर प्रत्येक पुरुषाला फक्त आपली प्रतिष्ठा व आपली महती काय ती मुख्य आहे असे वाटणे. जी पारतन्त्र्यरूप बेडी, तो आपल्यापुरता विचार करीत असतां त्यास अत्यंत निंद्य व तिरस्कार्य वाटे, त्याच बेडीचे, एकदर मानव--जातीच्या संबंधाने विचार करीत असतां, त्यास कांहीच वाटत नसे. एवढेच नव्हे तर ती बेडी किंवा शृंखला, तो आपल्या स्वतःच्या हिताकरितां, गौरवाकरितां व प्रतिष्ठेक-रितां दुसऱ्यांच्या हातापायात घालण्यास खुशाल एका पायावर तयार असे!

१३. कायद्याच्या प्रस्तुत स्थितीतही पुष्कळ विवाहित माणसे, समतेचे तत्त्व कायद्याने ठरविल्याप्रमाणेच मानून परस्परांशी योग्य प्रकारे वर्तन करितात, ही गोष्ट मी कबूल करितो. आणि मागें पुढे हे समतेचे तत्त्व सर्वमान्य होईल अशी जी थोडीशी आशा मला वाटते, ती या गोष्टीवरूनच. ही स्थिति विशेषेकरून इंग्लंदांतील उंच प्रतीच्या लोकात बरीच आढळेल. कोणताही एक काळ घेतला तरी त्या काळी चालू असणारे जे कायदे, त्यांच्यापेक्षां अधिक नीतीची व अधिक उदात्त विचाराची माणसे जगांत जर बरीचशी नसती, तर कायद्यामध्ये सुधारणा ह्मणून कधीच झाली नसती, आणि ज्या तत्त्वाचें उद्घाटन किंवा प्रतिपादन या ग्रंथांत मी करीत आहे, ती तत्वे, मी ह्मणतों की, अशाच माणसांनी पसंत करावी. कारण, योग्य वर्तन करणारी जी युग्में असतील त्यांच्याचसारखी जगांतील इतर विवाहित स्त्रीपुरुषांची युग्मे बनावी, हाच त्या तत्त्वांचा उद्देश आहे. परंतु जी

माणसें स्वतः नीतिमान व सदाचारसंपन्न असतात त्यास स्वतंत्र विचार करण्याची सवय नसते. त्यांस बहुधा असें वाटत असते की, ज्या रूढि प्रचारांत आहेत त्या ठीकच आहेत. कारण जे कायदे किंवा ज्या रूढि असतात, त्यांजपासून होणाऱ्या अनिष्ट परिणामाचा अनुभव त्यांस प्रत्यक्ष नसतो. यामुळें, त्याजपासून इतरांवर वाईट परिणाम घडतात, असें त्यांच्या स्वप्नींही कधीं येत नसते. एवढेंच नव्हे, तर उलटें त्यांस असें वाटतें की, ज्या अर्थी ते कायदे किंवा त्या रूढि सर्वमान्य झाल्यासारख्या दिसतात, त्या अर्थी समाजास त्या इष्ट व हितकारकच असल्या पाहिजेत; आणि त्या बंद करूं पाहणें, किंवा त्यांचा प्रतिकार करण्याचा यत्न करणें, हे अगदीं गैर होणार आहे. तथापि असें समजणें ह्मणजे, त्या विवाहित माणसांची खरोखर केवढी मोठी चूक आहे? कारण ज्या विवाहपाशानें ते स्वतः बद्ध झालेले असतात, त्याच्या कायदेशीर अटी, जरी बारा महिन्यांतून एकदांही त्यांच्या मनांत येण्याचा प्रसंग आला नाहीं, आणि कायद्याच्या दृष्टीनें आपले हक्क समसमान आहेत, असें समजूनच जरी त्या पति-पत्नीचा परस्परांशीं सर्वथा आचारविचार असला, तरी एवढ्यावरून ज्या ठिकाणीं नवरा केवळ नर-पशु किंवा राक्षसी स्वभावाचा नाहीं, त्या ठिकाणचीं विवाहित सर्व जोडपीं आपल्यासारखींच असतील, असें मानणें ह्मणजे हा केवढा भ्रम आहे बरें? असे मानणें ह्मणजे, जगांत खरोखर घडून येत असलेल्या गोष्टींविषयीं व एकंदर मनुष्य-स्वभावाविषयीं सारखेंच अज्ञान दाखविणें आहे. ज्या मानानें एखादा मनुष्य सत्ताधारी होण्यास कमी लायक असेल, ज्या मानानें दुसऱ्यांच्या संमतीनें किंवा राजीखुषीनें एका माणसास त्या दुसऱ्या माणसावर सत्ता चालवूं देण्याची परवानगी मिळण्याचा संभव कमी असेल, त्या मानानें कायद्यानें दिलेल्या सत्तेचें किंवा अधिकाराचें महत्त्व त्या मनुष्यास अधिक वाटून,

तो त्या सत्तेस अधिकच बिलगून रहातो. एवढेंच नव्हे, तर आपल्या अधिकाराचा जितका कडक व पूर्ण अमल त्यास चालवितां येईल, व लोक-प्रचार (अर्थात् त्याच्या सारख्या इतर पुरुषांनी पाडिलेला प्रचार) त्यास चालवूं देईल तितका चालवितो. फार काय, अमुक एक सत्ता किंवा फलाणा एक अधिकार आपल्या हातांत आहे, ही जी गोड समजूत किंवा उल्हास-जनक कल्पना, ती त्या सत्तेला चिकटून रहाण्याविषयीं त्या माणसाला अधिक प्रोत्साहन देत असते. यामुळे, त्या सत्तेचा होईल तितका व यथेच्छ उपभोग करून घेण्यांत त्यास सुख वाटतें. एवढेंच नव्हे, तर नीच जातींमध्यें जे लोक स्वभावत: अत्यंत पशु-तुल्य वृत्तीचे असतात, व ज्यांस नीति-संबंधाचें मुळींच कांहीं शिक्षण मिळालेलें नसतें, अशा लोकांस एखाद्या चीजवस्तेसारखा किंवा जनावरासारखा बायकोचा प्रत्यक्ष कबजा नवऱ्यास मिळविण्याचा कायद्यानें दिलेला हक्क, व कायद्यानें ठरविलेली स्त्रियांची दास्यत्वाची स्थिति, या दोन गोष्टींमुळें उलट असें वाटत असतें कीं, आपल्या बायकोखेरीज इतर परक्या स्त्रीशीं, किंवा मानवी प्राण्याशीं संभावितपणानें व पूज्य-बुद्धीनें वागणें, हें नीटच आहे. परंतु जी स्त्री प्रत्यक्ष आपली बायको असेल, त्या बायकोस तुच्छ मानणें, तिचा उपमर्द करणें, व ती आपल्याहून फारच कमी दर्जाची आहे असें मानणें, हेंच योग्य! तेव्हां अर्थात् अशा या कल्पनेमुळें आपली बायको ह्मणजे, तिचे पाहिजे तसे हाल करण्याचा, वाटेल त्या रीतीनें तिचा अपमान करण्याचा व पायमल्ली करण्याचा, आपणास पूर्ण अधिकार आहे, असें ते नर-पशु समजतात. ज्याला सूक्ष्मावलोकनानें माणसांच्या अंत:करणांतल्या गोष्टी त्यांच्या बाह्य-लक्षणांवरून कळत असतील, त्यानें योग्य प्रसंग पाहून अवलोकन करावें, व मी ह्मणतो तसा प्रकार खरोखर आहे किंवा नाहीं याचा अनुभव घ्यावा. आणि तसा प्रकार त्यास आढळेल तर

माणसांची मने दूषित किंवा घाणेरी करून टाकणे, हाच ज्या रूढींचा साहजिक परिणाम होय, अशा रूढींचा जितका राग व जितका वीट येईल, तेवढा थोडाच आहे, असे त्यालाही खास वाटेल.

१४. आतां कदाचित् कोणी आह्मांस असे सांगतील की, स्त्रियांनी पुरुषांच्या आज्ञेत रहावे, अशी धर्म-शास्त्राचीच आज्ञा आहे. अर्थात् ज्या गोष्टी वाईट आहेत असे सिद्ध होऊन, ज्यांचे मंडन युक्ति-वादाने करितां येतच नाही, त्या करण्याविषयी धर्म शास्त्राची आज्ञा, ही आपली 'दत्त' ह्मणून नेहमी उभी असतेच ! **ख्रिस्ती** धर्मावर कांही सत्र-ग्रंथ आहेत, त्यांमध्ये या आज्ञा-धारकतेचें समर्थन केलेलें आढळतें, हें खरें, परंतु, अशा प्रकारची आज्ञा धारकता प्रत्यक्ष **ख्रिस्ती** धर्मांत कोठें आढळण्यांत येत नाही, किंवा त्या धर्माच्या मूलतत्त्वांवरूनही ती अनुमानानें सिद्ध होत नाही. आतां कोणी हें वाक्य पुढे आणतील की, ***सेंटपॉल** ह्मणाला पत्न्यांनो! तुह्मी आपल्या पतीच्या आज्ञेत रहा. पण **सेंटपॉलचें** असेंही वाक्य आहे की, 'दास हो! तुह्मी आपल्या धन्याच्या आज्ञेत रहा.' **ख्रिस्ती** धर्माचा प्रसार करणें हा **सेंटपॉलचा** मुख्य उद्देश होता. तेव्हां त्याच्या काळी जे कायदेकानू किंवा ज्या रूढि प्रचारांत होत्या, त्यांविरुद्ध लोकांस वागण्याचा उपदेश करण्याचें कांही त्यास कारणच नव्हतें. तो त्याचा हेतुच नव्हता. त्या धर्म-प्रसारकानें असाही उपदेश केला आहे की, 'जे राज्य-कर्ते आहेत, ते ईश्वराच्याच इच्छेनें आपली सत्ता चालवितात, असे समजावें.' परंतु एवढ्यावरून आमचे लोक बादशाही अंमल कबूल करतील काय? **ख्रिस्ती** धर्माला संमत अशीच राज्य-पद्धति घेऊन, एकाच मनुष्याच्या पूर्ण-सत्तेखाली प्रजाजनांनी रहावें, असें मानून

---

* **सेंटपॉल** या नांवाचा एक महंत किंवा साधु पुरुष **ख्रिस्ती** धर्माच्या इतिहासांत होऊन गेला. त्यानें **ख्रिस्ताच्या** मागें त्याच्या धर्माचा प्रसार केला.

त्याच्या उलाढाली टाकून देणें किंवा अधिकारापन्न प्रधान मंडळास नालायक ठरवून, त्यांची योग्य प्रसंगीं उचलबांगडी करण्याची खटपट बिलकूल न करणें या गोष्टी लोकास पसंत पडतील* काय ? जर नाहीं तर आपल्या काळच्या रूढि व लोक-व्यवहार **सेंटपॉल** साधूनें पसंत केल्या कारणानें सदरहू लोक-व्यवहार व रूढि यांजमध्यें योग्यकालीं फेरबदल किंवा सुधारणा करण्याचा यत्न करूं नये, व तसें करणें **ख्रिस्ती** धर्माला असंमत आहे हें ह्मणणें किती शोभेल बरें ? आणि असें ह्मणणें ह्मणजे, **ख्रिस्ती** धर्माला **महंमदी** धर्माच्या किंवा ब्राह्मणाच्या धर्माच्या बरोबरीला आणून ठेवण्यासारखें होणार आहे.

**ख्रिस्ती** धर्मानें ही गोष्ट केली नाहीं, ह्मणजे सुधारणेच्या आड तो धर्म आला नाहीं; यामुळेंच मानव जातीपैकीं ज्या लोकांचें पाऊल पुढें पडलें आहे, त्यांचा तो धर्म होऊन बसला. आणि **मुसलमानी धर्म, ब्राह्मण-धर्म,** वगैरे धर्म, ज्या लोकांचें पाऊल मागें आहे, त्या लोकांतच ते धर्म अद्याप चालू आहेत. † **ख्रिस्ती** धर्माच्या सर्वकाळीं,

---

* **इंग्लंडांत** हल्लीं जी राज्य-पद्धति आहे, तिजमध्यें लोक-सत्तात्मकतेचाच भाग विशेष असून, राणी ही फक्त नवाला असते व लोक-नियुक्त-सभा ( पार्लमेंट ) ही पाहिजे तेव्हां त्या वेळेला आपलें प्रधान-मंडळ बदलूं शकते. या गोष्टीस उद्देशून वरील मजकूर निबंधकारांनीं लिहिला आहे, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल.

† निबंधकारांचें हें जें मत आहे तें आह्मांस मान्य नाहीं कारण, एकच धर्म खरा, असें आमचें मत नाहीं. यामुळें कोणत्याही धर्माचा खरेपणा किंवा खोटेपणा हा, कोणत्याही राष्ट्राच्या उन्नतीस किंवा उत्कर्षास कारणीभूत होतो, असें आह्मांस वाटत नाहीं. **ब्राह्मण-धर्म ख्रिस्ती** धर्माहून कमी समजणें, ह्मणजे त्या धर्माविषयीं अज्ञान प्रगट करणें होय. निबंधकाराच्या वडिलांस **हिंदुस्थानाच्या** इतिहासाची जितकी माहिती होती, तितकीच माहिती **ब्राह्मणांच्या** धर्माविषयीं किंवा त्यांच्या धर्म-ग्रंथांविषयीं प्रस्तुत निबंधकारास होती. असें ह्मटलें असतां चालेल इंग्रज, अमेरिकन् व युरोपांतील इतर सुधारलेले लोक यांचा जो जयजयकार किंवा उत्कर्ष आजकाल दृष्टीस पडतो तो केवळ ख्रिस्ती धर्माचा प्रभाव आहे असें ह्मणणें निवळ भ्रांतिमूलक होय या संबंधानें मिस्तर **हरबर्ट स्पेन्सर** यांचें मत मिल्ल साहेबांच्या अगदीं उलट आहे.

त्या धर्मास असले वाईट स्वरूप देण्याचा ज्यांनी यत्न केला, अशा बरींच माणसे होऊन गेली. ह्मणजे, त्यांनी ख्रिस्ती धर्मानुयायी लोकांस एक प्रकारचे **ख्रिस्ती-मुसलमान**च करण्याचा प्रयत्न केला. फरक एवढाच की, **कुराणाच्या** ऐवजी **बायबल** दिले. व प्रत्येक सुधारणेला प्रतिबंध केला. अशा माणसांच्या हातात जवर सत्ता होती, व त्या सत्तेशी ज्यांनी विरोध केला, त्यांपैकी पुष्कळ लोकांस आपले जीव बळी द्यावे लागले! सारांश ही गोष्ट खरी की, सुधारणेला जे प्रतिकूळ लोक त्यांच्याशी आपणांस झगडावे लागले; व विरोध करावा लागला. आपली सभ्यांची जी स्थिति आहे, ती त्या विरोधाचेंच फल होय, आणि पुढेही आपली जी उन्नति व्हावयाची ती विरोधाच्याच योगाने होईल. हे लक्ष्यांत ठेविले पाहिजे.

१५. स्त्रियांनी पुरुषांच्या आज्ञेत रहावें हाच त्यांचा धर्म होय. या मताच्या संबंधाने इतका वेळपर्यंत वर जे विवेचन झाले, त्यावरून, आपल्या स्वतःच्या मिळकतीवर स्त्रीचा हक्क असावा, याविषयी कांहीं बोलण्याचें कारणच आलें नाहीं. विवाहाच्यापूर्वी कोणत्याही स्त्रीची जी मिळकत असेल, तिजवर विवाहानंतर तिचीच पूर्ण सत्ता रहावी, हीच गोष्ट योग्य व न्याय्य आहे, असे ज्यांस वाटत नसेल, किंवा अशाविषयी ज्यांना कांहीं सकारण प्रतिपादन लागत असेल, अशा माणसांच्या मनावर माझ्या या ग्रंथापासून कांहीं ठसा बठेल, अशी आशा करणे व्यर्थ होय. स्त्री धनाच्या संबंधाचा मी ह्मणतो तो नियम फारच स्वल्प आहे; तो असा:—बायको काय किंवा नवरा काय, त्या दोघांचें लग्न होण्याच्या पूर्वींची तिची किंवा त्याची जी कांहीं मिळकत असेल, तिजवर, लग्न झाल्यानंतरही व पुनः त्यांचा संबंध तुटेपर्यंत, तिची किंवा त्याची एकट्याची पूर्ण सत्ता रहावी, ह्मणजे, लग्न होण्यापूर्वी नवऱ्याची जी मिळकत असेल, ती लग्न

झाल्यानंतरही त्याच्याचकडे रहावी. त्याचप्रमाणें बायकोची जी असेल ती बायकोच्याच मत्तेंत रहावी, या नियमानें लग्नाच्या वेळीं, पुढें होणाऱ्या मुलांच्या संगोपनाकरितां, जी कांहीं एक मिळकतीची व्यवस्था (marriage-settlement) करीत असतात, त्या व्यवस्थेला या नियमानें बाध येण्यासारखा नाहीं. दोन जीवांचा एकत्र काल्पनिक-संयोग किंवा मिश्रण, ही जी विवाहाची कल्पना आहे, ती कल्पना, पैशाअडक्याच्या संबंधांत वगैरे पति-पत्नीचा निराळा विचार असावा, या कल्पनेशीं जुळत नाहीं; असें कित्येकांस वाटून त्यांच्या मनाला मोठा धक्का बसतो! मला स्वतःला देखील एकत्रपणा व एकविचार फार आवडतो. परंतु, तो केव्हां? तर जेव्हां त्या मालकांचीं अंतःकरणें खरोखर एक असतील तेव्हां. ह्मणजे अशा व्यवस्थेंत जितके हिस्सेदार किंवा भागीदार असतील, त्या सर्वांचा एकच विचार असून, त्या सर्वांना सारखा अधिकार असला पाहिजे. परंतु ज्या समाइकीचें व एक विचाराचें मुख्य तत्त्व ह्मणजे, 'जें तुझें तें माझें; आणखी माझें तें माझेंच!' अशा प्रकारची जी व्यवस्था ती मला मुळींच पसंत नाहीं! अशा प्रकारची व्यवस्था प्रत्यक्ष माझ्याच फायद्याची जरी असली तरीही ती मला मान्य होणार नाहीं.

१६. स्त्रियांच्या संबंधानें घडत असलेला या प्रकारचा हा अन्याय व हा जुलूम साधारण लोकांच्या दृष्टीसही इतर गोष्टींपेक्षां अधिक ठळक दिसतो. यामुळें बाकीच्या अन्यायाच्या गोष्टी जरी तशाच राहिल्या, तथापि, एवढ्या कामांत सहज उपाय होण्यासारखा आहे. हा अन्याय फार लौकर दूर करण्यांत येईल, यांत शंका नाहीं.* **अमे-**

* यासंबंधानें पृष्ठ ९६ याखालीं दिलेली टीप अवश्य पाहण्यासारखी आहे. तीवरून वाचकांच्या ध्यानांत येईल कीं, मिल्ल साहेबाचा हा निबंध प्रसिद्ध झाल्यानंतर बराच काळ जावा लागला तेव्हां त्याच्या ह्मणण्याप्रमाणें कायदा इंग्लंडांत पास झाला. कारण, इंग्लंडांतही स्त्रीधनासंबंधाचा कायदा थोड्क्याच वर्षांपूर्वीं पास झाला. त्यांतील मुख्य

रिकेंतील बहुतेक जुन्या व नव्या स्वतंत्र संस्थानांतून जे कायदे पास झाले आहेत त्या कायद्यांत, स्त्री-धनाच्या बाबतीत पुरुषांच्या बरोबरीचे अधिकार स्त्रियांस आहेत, हे तत्त्व मान्य करण्यांत आलें आहे. यामुळे ज्या स्त्रियांची स्वतःची ह्मणून कांहीं मिळकत असते, त्यांच्या स्थितींत, लग्नाच्या संबंधांत, बरीच सुधारणा झाली आहे; व तेणेकरून त्यांच्या हातांतून गेलें नाहीं, किंवा त्यांच्यापासून हिसकावून घेतलें नाहीं, असे हे एक तरी शस्त्र त्यांच्या हातांत शिलक राहते. त्याचप्रमाणें, लग्न-संबधाचा दुसराही जो एक अन्यायाचा व जुलमाचा प्रकार होत असे, तोही बंद झाला आहे. तो असाः—एकादा दुष्ट मनुष्य विवाहाच्या रूढीचा अत्यंत निंद्य असा दुरुपयोग करी. ह्मणजे, तिचा पैसा उपटण्याच्या उद्देशानें एखाद्या पोरीला फसवून तिला स्त्रीधन वगैरे कांहींएक न देतां, तिच्याशीं लग्न करी. लग्न झाल्यानंतर, जुन्या कायद्याप्रमाणें, 'जें तिचें, तें त्याचें' अशी स्थिति असल्यामुळें तो लबाड नवरा तिला सोडून गेला, तर ती बिचारी अगदीं अनाथ होई. ही स्थिति हल्लीं अमेरिकेंत राहिली नाहीं. ज्या वेळेस कुटुंबांचा निर्वाह वडिलोपार्जित किंवा स्वकष्टार्जित मिळकतीवर चालत नसून, केवळ स्वतःच्याच रोजमुऱ्यावर अवलंबून असतो, त्या वेळेस नेहमीची जी साधारण व्यवस्था ह्मणजे, पुरुषानें मिळवून आणावें, आणि बायकोनें घरांतला जमाखर्च वगैरे पहावा,

---

तत्त्व हें:—कोणत्याही स्त्रीची लग्नापूर्वी मिळविलेली मिळकत असो, किंवा लग्न झाल्यानंतर मिळविलेली असो, तिच्या नवऱ्याचा तिच्या मिळकतीवर कांहीएक हक्क नाहीं. लग्नाच्यापूर्वीप्रमाणेंच दोघेही आपापल्या मिळकतीचे पूर्ण व स्वतंत्र मालक आहेत! हें तत्त्व अमेरिका व इंग्लंड या दोन सुधारलेल्या देशांतून हल्लीं सर्वमान्य झालें आहे.

हा कायदा Married Women's Property Act (विवाहित स्त्रियांच्या मिळकतीं संबंधाचा कायदा) या नांवानें प्रसिद्ध आहे. आमच्या स्त्रियांस हिंदुधर्मशास्त्रांतील असमतेचा कायदा जाऊन समतेच्या तत्त्वांवर केलेला हा कायदा प्राप्त होईल काय!

व घरांतील देखरेख करावी, अशा प्रकारच्या या व्यवस्थेनें, दोन माणसांमध्यें श्रम-विभागमात्र उत्तम तऱ्हेनें होतो, असें मला वाटतें. नऊ मासपर्यंत गर्भाचें ओझें सहन करून, व शारीरिक यातना सोसून, व बालकांचे लहानपणी संगोपन करणे व त्यांस योग्य शिक्षण देणे वगैरेचीही सर्व जबाबदारी घेऊन, नवऱ्याने मिळविलेल्या पैशाअडक्याचा विनिमय, बायको एकंदर कुटुंबाच्या सुखाकरितां काळजीपुरःसर व मित-व्ययाने करीत आहे, तर त्या उभयतांच्या संसारास लागणारे जे शारीरिक व मानसिक कष्ट त्या कष्टांचा योग्य वांटा ती उचलिते एवढेंच नव्हे, तर बहुधा मोठाच वांटा तिच्या हिश्शाला जातो, असें ह्मटलें पाहिजे. याखेरीज दुसरी कांहीं कामें जर तिनें पत्करिलीं, तर वर सांगितलेलीं जीं गृह-कृत्यें त्यांच्यापासून तिची मुक्तता न होतां तीं गृह-कृत्यें तिच्याकडून बरोबर होत नाहीत. घराची व मुलाबाळांची जर तिने काळजी घेतली नाहीं, तर दुसरा कोणी तिकडे पहात नाहीं. यामुळें जीं मुलें मरत नाहीत, तीं वांचलीं तरी कशीबशीं वांचतात; व त्यांची अतिशय हेळसांड होते. आणि घरचें कोणी पाहण्यास नसल्यामुळें, घरांतली व्यवस्था इतकी वाईट होऊन जाते कीं, मित-व्ययाच्या दृष्टीनेही त्या बायकोच्या द्रव्योपार्जनाची किमत कांहींच राहत नाहीं. याजकरितां वस्तुस्थिति न्यायास अनुसरून जशी असावी तशी असती तर, बायकोनें आपण श्रम करून कुटुंबाच्या उत्पन्नास भर घालण्याची ही चाल इष्ट वाटली नसती. परंतु वस्तु स्थिति चमत्कारिक व अन्यायाची असल्या कारणानें, तिने असें करणें, ह्मणजे बायकोनें आपल्या श्रमानें कुटुंबाच्या प्राप्तीत भर घालणें ही गोष्ट तिच्या फायद्याची व कल्याणाची आहे. कां तर, जो मनुष्य तिचा कायदेशीर धनी मानिला जातो, त्या मनुष्याच्या दृष्टीने तिची किमत वाढते. परंतु कधीं कधीं उलट परिणाम असा होतो की, आपल्या अधिकाराचा

दुरुपयोग करण्याविषयीं मात्र तो प्रवृत्त होतो. ह्मणजे तो असें करितो कीं, तिला मात्र कष्ट करण्यास लावून, व कुटुंबाच्या पोषणाचा भार तिजवर लादून, आपण आपला बहुतेक काळ आळसांत व मद्य-पानांत घालवितो ! ज्या स्त्रीला स्वतंत्र अशी कांहीं मिळकत नाहीं, त्या स्त्रीला द्रव्योपार्जन करण्याचा अधिकार असणें ही गोष्ट तिच्या मानमान्यतेची व प्रतिष्ठेची आहे. विवाहसंबंध जर बरोबरीच्या नात्याचा असता; एकानें दुसऱ्याच्या आज्ञेत असावें अशी अट नसून उभय पक्षांचे हक्क जर सारखे असते; प्रस्तुतप्रमाणें दोन पक्षांपैकीं, एकाच पक्षाला ( अर्थात् स्त्रियांना ) हा लग्नसंबंध निव्वळ अपकारक व बलात्काराचा असा नसून, ज्या स्त्रीनें योग्य कारण दाखविलें तिला आपल्या नवऱ्यापासून स्वतंत्रपणानें निराळें* राहतां आलें असतें; व त्या निराळ्या स्थितीत तिला पाहिजे ते प्रतिष्ठेचे व मानमान्यतेचे उद्योग करण्यास पुरुषाप्रमाणेंच पूर्ण मुभा असती; सारांश, या सर्व गोष्टी जर तिला अनुकूल असत्या, तर विवाहित स्थितींत आपल्या बुद्धि सामर्थ्यानें द्रव्यसंपादन करण्याचा अधिकार केवळ तिच्या रक्षणार्थ तिला मुद्दाम देण्याचें प्रयोजन राहिलें नसतें.

पुरुष जसा उदर निर्वाहार्थ एखादा धंदा [illegible]तो, त्याचप्रमाणें ज्या स्त्रीनें एकंदरें लग्न केलें, तिनें गृह-कृत्ये कर[illegible]ळांचें संगोपन करणें, त्यांस शिक्षण देणें, ह्मणजे ज्यास आ[illegible]कंदर संसार किंवा प्रपंच असें लौकिकांत ह्मणतो -तोच धंदा करण्याचें पत्करिलें, व त्या कामाकरितां तिच्या आयुष्याचे जितके दिवस लागतील तितके दिवसपर्यंत तिचें पहिलें कर्तव्य तेंच, असें समजावें. आणि इतर सर्व व्याप किंवा व्यवसाय तिनें सोडून दिलेच पाहिजेत, असें जरी ह्मणतां

* ' प्रस्तुत स्थळीं काडीमोडून देणें किंवा घटस्फोट करणें ( Divorce ) या विषीस उद्देशून मी बोलत नाहीं ' असें निबंधकारांनीं मुद्दाम सुचविलें आहे.

आलें नाहीं, तथापि ज्या गोष्टींनीं तिच्या प्रपंचाची गैरसोय होणार, अशा गोष्टी तिनें सोडून दिल्या, असें समजून चाललें पाहिजे. घरांत राहून जे व्यवसाय करितां येत नाहींत, अथवा जे व्यवसाय घराबाहेर राहूनच व नियमितपणें केले पाहिजेत, ते सर्व व्यवसाय, वर सांगितलेल्या नियमाप्रमाणें बहुतेक विवाहित स्त्रियांस वर्ज्य होणार, हेही उघडच आहे. परंतु माझें ह्मणणें एवढेंचः—साधारण नियमांची योजना करितांना अशी करावी कीं, व्यक्तिमात्रांच्या विशेष गुणांचा विकास होण्यास ठेवितां येईल तितका पुष्कळ अवकाश ठेवावा. विवाहित-स्थितींत देखील, इतर धंद्यांत विशेष बुद्धीचा किंवा विशेष गुणाचा विकास होण्यास कोणताही प्रत्यवाय किंवा अडथळा नसावा. मात्र, कुटुंबाची मालकीण या नात्यानें, तिला केलींच पाहिजेत अशीं जीं नित्यकृत्यें, तीं सर्व तिच्याकडून न घडल्यास, ती उणीव दुसऱ्या कांहीं योग्य साधनानें दूर केली पाहिजे. सारांश, लोक–मताचा ओघ या विषयाकडे जर बरोबर रीतीनें वळेल, तर अशा या बारीक सारीक गोष्टी कायद्यानें ठरविण्याची गरजच राहणार नाहीं. त्या गोष्टी लोकमतावर बिनधोक सोपवाव्या, हेंच मला प्रशस्त दिसतें.

—

# भाग ३.

— ༄ ༅ —



१. स्त्री-पुरुषांचे हक्क सारखे आहेत, हें तत्त्व आपण एकदा मान्य केलें की, त्याबरोबर आपण प्रबल पुरुषांनीं जे उद्योग व जे व्यापार आपल्या एकट्यापुरतेच ह्मणून दडपले आहेत, त्यांत, स्त्रियाही वांटेकरी होणारच होणार, हेंही कबूल केलें पाहिजे. या गोष्टीविषयीं कोणाचीही खात्री करणें कठिण नाहीं. कुटुंबाच्या संबंधांत किंवा गृह-व्यवस्थेंत स्त्रिया परवश असाव्या, असें पुरुषास वाटत असल्यामुळें इतर कामांतही त्यांस परवश ठेवण्याविषयीं पुरुष उत्सुक असतात, हें उघड आहे. कारण बहुतेक पुरुष-जातीस इतर माणसांशीं बरोबरीच्या नात्यानें वागण्याची कल्पना अद्यापि रुचतच नाहीं, हेंच खरें. असें नसतें तर, अर्थ-शास्त्र व राज्य तंत्र यांविषयीं लोकांत जीं मतें प्रस्तुत पसरलीं आहेत, त्यांचा विचार करितां, ज्या धंद्यांत चांगली किफायत होते असे बहुतेक धंदे, व समाजांत प्रतिष्ठेचे मानलेले मोठमोठे अधिकार, हे, मानवी जातीच्या अर्ध्या भागास सर्वथा वर्ज्य किंवा निषिद्ध केले जावे, ही मोठ्या अन्यायाची गोष्ट आहे, असें प्रत्येकजण कबूल करिता. पुरुषांपैकीं अगदीं नीच व मूर्खशिरोमणि अशा मनुष्यासही, जे अधिकार किंवा जीं कामें कायदेशीर रीतीनें मिळविण्याचा पूर्ण हक्क आहे, अशीं कामें करण्यास स्त्रिया मात्र योग्य नाहींत, किंवा योग्य होण्याचा अगदीं संभव नाहीं, असा ठराव, त्यांच्या जन्मापासून करून

टाकणें; अथवा त्या कशाही योग्य व पात्र असल्या तरी, अशीं कामें केवळ पुरुषांच्याच कल्याणार्थ राखून ठेवून, तीं कामें करण्याची स्त्रियांस मनाई करणें, हा सर्व प्रकार फारच अनुचित व अन्यायाचा आहे, असें प्रत्येकजण कबूल करिता. आलीकडल्या दोनशें वर्षांत प्रस्तुत विषय कोठें निघालाच, व स्त्रिया अमुक अमुक कामें करण्यास अनाधिकारी किंवा अयोग्य असें कां ठरविलें, किंवा ठरवावें, असा प्रश्न विचारिला, तर लोक त्याचें उत्तर देत:–" अशी व्यवस्था आजपर्यंत चालत आली आहे. ह्मणूनच हेंच कारण ! " कां की त्या वेळेस सार्वजनिक कृत्यांत पडण्याचा अधिकार सर्वत्र स्त्रियांस निषिद्ध नसल्यामुळें, खरोखर त्यांची बुद्धि कशी आहे, याची अनेक प्रसंगीं पारख होत असे. यामुळें स्त्रियांची मानसिक शक्ति पुरुषापेक्षां कमी आहे, ही सबब त्या वेळेच्या लोकांस सांगता येतच नसे. आणि कोणी कदाचित् सांगू लागलाच तर, अशा सबबीवर वस्तुत: कोणाचा भरवसाही बसत नसे. त्या काळीं स्त्रिया अमुक कामास अयोग्य आहेत, असें न ह्मणतां, ' स्त्रियांस अमुक काम न करूं देणें हेंच लोक समाजाच्या हिताचें आहे,' असें ह्मणत, 'लोक-समाजाच्या' ह्मणजे अर्थात् ' एकट्या पुरुषांच्या ' हिताचें, हे उघडच आहे. जसें हल्ली राज-कारणांत लोकांवर अंमल करीत असणारें सरकार कोणतीही गोष्ट करणें ह्मणजे त्यास ' राजकीय कारण ' लावून मोकळें होतें. व त्या सबबीवर कधीं कधीं फारच अनिर्वाच्य व अश्लाघ्य अशीही कामें करून जातें.* त्याचप्रमाणें स्त्रियांच्या संबंधानें त्या काळीं तसाच प्रकार होता. प्रस्तुत काळीं अधिकारसंपन्न माणसें वर लिहिलेल्या

*या गोष्टीचा अनुभव या आमच्या हतभाग्य देशांत दयाळू राणी-सरकारच्या व बादशाहीणीच्या अमलांत आमच्या लोकांस किती वेळ आला असेल, त्याची नामावळि सांगत बसणें हृदय-भेदक होणार नाही काय ? हल्ली अह्मां इंडियन् लोकांवर अमल करित असणारें श्वेतद्वीपस्थ आमचे दयाळू मायबाप इंग्रज सरकार कोणतीही गोष्ट करणें झालें तरी

भाषेहून अमळ सौम्य भाषेचा उपयोग करितात. यामुळे, ज्याजवर जुलूम करणे त्यांस प्रशस्त वाटत असेल, त्यांजवर ते जुलूम करितात अमुक एक गोष्ट ही ज्याजवर जुलूम करावयाचा त्याच्या हिताचीच आहे, असा त्यांस बहाणा करावा लागतो. या नियमास अनुसरून, स्त्रियांवर अधिकार चालविणारे पुरुष जेव्हा एखादी गोष्ट स्त्रियांस मना करावी ह्मणून इच्छितात, तेव्हा, ती गोष्ट करण्याविषयी स्त्रियांनी उमेद बाळगणे ह्मणजे आपल्या खऱ्या कल्याणाचा व सुखाचा मार्ग त्या सोडतात, असे होते,' वगैरे निव्वळ लबाडीचे प्रतिपादन त्यांस करावे लागते. हे प्रतिपादन घटकाभर खरे आहे, असे धरून चालले तरी त्या प्रतिपादनाप्रमाणे पुरुष वर्तन कोठे करितात? अपणास हमेषा जो अनुभव येतो, त्यावरून पाहिले तर, पुरुषांना खरोखर स्त्रियांच्या कल्याणाकडे व सुखाकडे पाहून जितक्या गोष्टी करावयास पाहिजेत, तितक्या करण्यास ते तयार असतात, असें दिसत नाहीं.* बुद्धि-सामर्थ्यानें पुरुषांपेक्षा स्त्रिया एकंदरीत कमी असतात; असें प्रतिपादन करून बस्स होत-नाहीं. त्याचप्रमाणे, अत्यंत बुद्धि-सामर्थ्याची जी कामें, किंवा जे व्यवसाय, ती करण्यास योग्य अशा स्त्रियांची संख्या पुरुषांच्या सरख्ये

त्यांस 'राजकीय कारण' ( Political Reason ) लावून मोकळे होते व त्या सबबीच्या जोरावर ( वस्तुतः सद्दीच्या जोरावर ) कधीं कधीं फारच अश्लाघ्य अशीं कामें करून जातें या संबंधानें वाचकास इल्बर्ट बिलाच्या धामधुमीचा इतिहास स्मरल्या वांचून राहणार नाहीं प्रतिपक्षी चहापिकविणार ( टीप्लांटर ) व अन्य यूरोपियन् हे पुरुष व एतद्देशीय मंडळी बायका एवढी कल्पना केली ह्मणजे प्रस्तुत निबंधांत केलेलें प्रतिपादन आमच्या स्थितीशीं अगदीं बरोबर जुळतें.

* प्रस्तुत स्थळीं आमच्या इकडल्या संबंधानें पुष्कळशीं उदाहरणें देण्यास अवकाश नाहीं. परंतु ता० ३० जुलै १८८८ च्या ज्ञान-प्रकाशांत 'केशवपन' या सदराखाली एका विधवा झालेल्या बाईनें जें हृदय-द्रावक पत्र लिहिलें होतें, त्याचें स्मरण मर्मज्ञ वाचकांस होईलच होईल.

हून कमी असते, असे ह्मणण्यानेही कार्य भागत नाहीं.* तर स्पष्ट असा सिद्धांत ठरविणे अवश्य आहे कीं, अशा प्रकारच्या अत्यंत बुद्धिमत्तेचीं कामे करण्यास लायक अशी एकही स्त्री जगांत आढळणार नाहीं, किंवा नसते. शिवाय, आणखी असेही सिद्ध केले पाहिजे कीं, अत्यंत बुद्धिमान स्त्रिया घेतल्या तरी, त्यांची मानसिक शक्ति, प्रस्तुत ती कामे ज्यांकडे आहेत, अशा अगदीं सामान्य बुद्धीच्या पुरुषांहूनही कमी प्रतीची असते! माझें ह्मणणे इतकेंच कीं, कोणतेही बुद्धिमत्तेचें काम करण्याची पात्रता उमेदवारांच्या केवळ गुणांकडे लक्ष देऊन ठरविली पाहिजे. मग निवडणूक करण्याची कोणती का पद्धति घ्याना—इतकेंच कीं, लोकांचे खरें हित जिच्यायोगानें साधेल, त्याच पद्धतीचा स्वीकार

* स्त्रियांवर अधिकार चालविणारे पुरुष जेव्हां एखादी गोष्ट स्त्रियांस वर्ज्य करावी ह्मणून इच्छितात, तेव्हां ती गोष्ट स्त्रिया करण्याविषयीं असमर्थ आहेत, व ती करण्याविषयीं स्त्रियांनी उमेद बाळगणें हें त्यांस अहितकारक आहे, लांछनास्पद आहे, श्रेयस्कर नाहीं असें ह्मणणें पुरुषांस भाग पडतें। कांहीं कांहीं स्त्रिया कांहीं कांहीं पुरुषांपेक्षां कमी बुद्धीच्या असतात—अथवा ज्या कामास अत्यंत बुद्धिमत्तेची गरज आहे अशा कामास योग्य असे पुरुष जितके सापडतील तितक्या स्त्रिया सापडणार नाहींत—एवढेंच सिद्ध करून फारसा उपयोग नाहीं. जे सिद्ध केलें पाहिजे तें हें—'एकदर स्त्रिया मोठमोठे हुद्दे करण्यास नालायक आहेत. हल्लीं असे हुद्दे करीत असलेले साधारण बुद्धीचे पुरुष घेतले तरी यांच्यापेक्षां उत्तमोत्तम स्त्रिया मानसिक शक्तीनें कमी असतात.' असें सिद्ध केलें पाहिजे. सार्वजनिक हिताकडे योग्य नजर देऊन चांगली चांगली माणसेंच मोठमोठ्या हुद्द्याकरितां मिळावीं, या हेतूनें जो मार्ग लोकांनी पसंत केला असेल, किंवा परीक्षा घेऊन योग्य माणसें निवडण्याचें ठरविलें असेल तर तो मार्ग, अथवा ती परीक्षा स्त्रियांसही लागू करून त्यांची योग्यायोग्यता ठरविणे, हें रास्त दिसतें. आणि असें झालें असतां, महत्वाचीं कामें करण्यासाठीं साधारणतः ज्या पुरुषांची योजना करण्यांत येते त्या पुरुषांहून कमी हुशारीच्या स्त्रियांस तीं कामें मिळतील अशी भीति व्हावयास नाहीं. शिवाय, आणखीही अशी एक गोष्ट कदाचित् घडून येईल कीं, कांहीं एका प्रकारच्या धंद्यांत किंवा कामांत पुरुषांच्या संख्येपेक्षा स्त्रियांची संख्या कमी सांपडेल. सांपडो. कारण हा परिणाम कांहीं केलें तरी होणारच. कां तर, दुसऱ्या एखाद्या धंद्यांत, तो धंदा विशेषंकरून स्त्रियांसच योग्य असल्यामुळें, स्त्रियांचीच अधिक संख्या होईल

करावा, एवढी गोष्ट मात्र ध्यानांत ठेविली पाहिजे. आणि असे झालें असतां, महत्वाची कामे करण्यासाठी साधारणतः ज्या पुरुषांची योजना करण्यांत येते, त्या पुरुषांहून कमी हुशारीच्या स्त्रियांस ती कामे कदाचित् मिळतील, अशी धास्ती बाळगण्याचे कारणच नाही. झाला तर एवढाच परिणाम होईल कीं, कांही एका प्रकारच्या धंद्यांत किंवा कामांत पुरुषांच्या संख्येपेक्षां स्त्रियांची संख्या कमी येईल. येईल तर येवो. कारण असा हा परिणाम कांही केले तरी होणारच. कां तर, दुसऱ्या एखाद्या धंद्यांत, तो धंदा विशेषकरून स्त्रियांसच योग्य असल्यामुळे व त्यांच्याशी स्पर्धा करण्यास पुरुष न आल्यामुळे स्त्रियांचीच अधिक संख्या होईल. स्त्रियांचा कसाही मोठा निंदक किंवा हाडवैरी असला तरी, एवढी गोष्ट कबूल करील कीं, प्राचीन काळचा इतिहास व आलीकडल्या काळांतील अनुभव ताडून पहातां, पुष्कळ स्त्रियांनी जी जी कामे केलीं, तीं मोठ्या नेकीनें, शहाणपणाने, पुरुषाच्या बरोबरीने केली आहेत असें आढळतें.* तेव्हां, फार फार तर इतकेंच ह्मणतां येईल की, कांहीं कांही पुरुषांच्या हातून जशी अनेक अलौकिक कामे घडली आहेत, तशी त्या स्त्रियांच्या हातून घडली नाहीत. ह्मणजे अगदी पहिल्या पाहिरीला येऊन पोंचली नाहीत. तथापि, केवळ बुद्धि—सामर्थ्यावर अवलंबून असणारी जी कामे त्यांत त्याच स्त्रिया

* आमच्या इकडे प्राचीनकाळच्या व आर्वाचीनकाळच्या चतुर व प्रतापी अशा स्त्रियांच्या नांवांची संख्या लहान आहे काय? **सुलभा, मैत्रेयी, वाचक्नवी, सुवर्चला, गार्गी, सावित्री, कल्याणदेवी, सीता, मंदोदरी, तारा, द्रौपदी,** इत्यादि सर्वमान्य अशा प्राचीन स्त्रियांची नांवें सांगतां येतील. परंतु अर्वाचीनकाळच्याही **झांशीची राणी,** पेशव्यांची **रमाबाई, अहिल्याबाई** होळकरांची **मुक्ताबाई, जनाबाई,**— फार काय, आमच्यापिढींतल्या परंतु आमच्या दुर्भाग्यामुळें काळानें अकालीच व अकस्मात् झांप घालून नेल्या अशा दोघी—एक प्रसिद्ध कलकत्त्याकडील कवयित्री **तोरुदत्त** व दुसरी अमेरिकेहून आयुर्वेद शिकून आलेली प्रतापशाली **आनंदीबाई जोशी**—अशा स्त्रियांची बुद्धि लोकोत्तर होती, ही गोष्ट कसाही स्त्रीद्वेष्टा पुरुष असला तरी नाकबूल करण्याचें धाष्टर्य करील काय!

दुसऱ्या पाहिरीपर्यंत पोचल्या नाहींत, अशी फारच थोडी उदाहरणें आहेत. अशी गोष्ट उघड उघड असतां, मोठमोठीं सार्वजनिक कामें स्त्रियांस सर्वथा निषिद्ध असावीं, व तीं मिळविण्याविषयीं खटपट करण्याचा हक्क पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रियांस असूं नये, हा स्त्रियांवर केवढा जुलूम आहे? शिवाय, या गोष्टीमुळे समाजाचें ही किती नुकसान होत आहे, याची कोणास कल्पना तरी होत असेल काय? तीं तीं कामें करीत असलेल्या पुरुषापेक्षा शतपट हुशार अशा स्त्रिया असतात, व खरोखर त्या पुरुषांची व त्या स्त्रियांची परीक्षाच घेतली तर, पुरुषांस स्त्रिया खास मागे टाकतील, अशी स्थिति वास्तविक व्यवहारांत आढळते, हें कोण नाकबूल करणार आहे?* या वर सांगितलेल्या स्त्रिया दुसरी कांही कामे करीत असलेल्या इतर कांही पुरुषांपेक्षां बुद्धि-सामर्थ्यानें कमी आहेत, असे जरी असलें, तरी त्यावरून सिद्ध होणार ते काय? प्रत्येक धंद्यांत अशी गोष्ट आहेच आहे. उंच प्रतीचीं कामे करण्यास अत्यंत योग्य व वाकबगार अशा पुरुषाची इतकी का रेलचेल समाजांत आहे की, लोक-समाजानें खरोखर हुषार माणसांचा अनादर करावा व त्यांच्या हातून कामे घेण्याचें नाकारावें? जगात जेवढी ह्मणून माणसें आहेत, त्यांच्यापैकी अर्धी माणसें एकदम नालायक ठरवून, त्यांच्या बुद्धि व त्यांच्या शक्ति, कितीही अलौकिक असल्या तरी, ती आमच्या अगदीं उपयोगी नाहीत, असा निश्चय-पूर्वक ठराव करून टाकणे, ह्मणजे केवढा अन्याय आहे? यापेक्षां अधिक शोचनीय गोष्ट कोणती असावी? लोकोपयोगी व महत्वाचें असें एखादें काम उभे राहिले, तर त्यास सर्वथा पात्र व लायक असा पुरुष-जातीपैकी नेहमी सांपडेलच सांपडेल, अशी खातरी कशावरून बाळगावी? आणि क्षणभर अशी आमची खातरी

* आमचे लोक देखील मुलांपेक्षां मुली मोठ्या चलाख व तीव्र-बुद्धीच्या असतात, ही गोष्ट कबूलच करितात. याच्या उलट ज्यांची समजूत आहे, किंवा जे प्रतिपादन करितात, असे फारच थोडे लोक सांपडतील.

आहे, असे जरी ह्मटले, व वायकांच्या शहाणपणावांचून आमचें अडत नाहीं असें जरी असले, तथापि, आपापला धंदा आपापल्या खुपीनें व आपापल्या जबाबदारीवर पसत करण्याचा जो हक्क प्रत्येक मनुष्यास आहे तो अमान्य करणें; प्रतिष्ठा, कीर्ति, किंवा नाव मिळविण्याविषयीं मनुष्यमात्रास नैसर्गिक जी इच्छा असते, तिचा उच्छेद करून टाकणे, ही गोष्ट न्यायास अनुसरून आहे काय? हा निव्वळ जुलूम नव्हे काय? आणि हा अन्याय केवळ स्त्रियांस बाधक होतो असे नाहीं, तर त्यांच्याकडून मोठमोठीं कामे करून घेण्याविषयीं जे कोणी उत्सुक असतील, त्यांसही बाधक होतो. अमुक व्यक्तींनी वैद्याचा धंदा करू नये, किंवा वकिलीचा धदा करू नये, किंवा अमुक माणसाचा वर्ग पार्लमेंट सभेचे सभासद होण्यास नालायक आहे, असा नियम करून टाकणे, ह्मणजे, ज्यांस हा नियम लागू होतो, व बाधक होतो, तेवढ्यांचेच नुकसान करण्यासारखे आहे, असे नाही. तर ज्यांना ज्यांना ह्मणून वैद्यांची गरज आहे व वकिलांची गरज आहे व ज्यांना पार्लमेंटामध्ये आपल्या तर्फे सभासद नेमण्याकरितां योग्य माणसांची निवड करण्याचा हक्क आहे, त्या सर्वांचे अत्यत नुकसान करणे होय. ते असें:—एक तर स्त्रिया नालायक ठरविल्यामुळे, परस्परांत जी योग्य ईर्षा उत्पन्न होते तेणेकरून काम करणाऱ्यांवर जो एक प्रकारचा लोकोपयुक्त व उत्साह-कारक परिणाम होतो, त्यास त्यांच्यामध्ये जागाच रहात नाहीं. आणि दुसरें असे की, योग्य वाटेल ती व्यक्ति, विवक्षित कामाकरितां, ज्यांतून निवडून काढावयाची, तो प्रदेश आकुंचित होतो.*

---

* या गोष्टीचें एक उदाहरण आपल्या इकडलें दिलें असतां, निबंधकारांचें ह्मणणें बरेंच व्यक्त होईल, असें वाटल्यावरून देतों. कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, हे जे प्रकार ब्राह्मणांत माजले आहेत, त्यांच्या योगानें ज्याच्या त्याच्या जातींचें क्षेत्र सकुचित राहून वरास वधू व वधूस वर मिळण्याची केवढी पंचाईत पडते! तेव्हां, क्षेत्र जितकें विस्तृत करितां येईल, तितकें अधिक हितकारक होतें. हा निबंधकाराचा आशय.

२. यापुढे मी माझ्या विषयाचें जे विवेचन करणार आहे, त्यांत फक्त लोकोपयुक्त किंवा सार्वजनिक कामापुरताच विचार केला असतां कदाचित् बरस होईल, असें मला वाटतें. कारण, सार्वजनिक कामें करण्याची मोकळीक स्त्रियांस असावी, अशी जर मी वाचकांची खातरी केली, तर इतर सर्व इष्ट व महत्वाच्या कामांतही त्यांचा प्रवेश व्हावा, ही गोष्ट आमचे प्रतिपक्षी कदाचित् सहज कबूल करतील. या ठिकाणीं एवढें सांगणें अवश्य दिसतें कीं, स्त्रियांच्या बुद्धीशी किंवा मानस-शक्तीशीं, ज्या हक्काचा किंवा अधिकाराचा मुळींच संबंध नाहीं, असा एक हक्क किंवा अधिकार आहे. तो कोणता ह्मणाल तर, पार्लमेंट व म्युनिसिपालिटी यांतील सभासद निवडण्याचा अधिकार होय. लोकांनीं जो अधिकार कोणत्याही मनुष्यास आपला प्रतिनिधि ह्मणून द्यावयाचा तो अधिकार कोणास द्यावा, या गोष्टीचा निर्णय करून, योग्य माणसाची निवड करण्याचा जो हक्क आहे तो, ज्याला बुद्धिमत्ता असेल त्यालाच असतो असें नाहीं. कारण, असें पहा कीं, पार्लमेंटांत उमेदवार होण्यास जो लायक नाहीं, त्याला, आपल्या तर्फेनें नुसता उमेदवार निवडून देण्याचाही अधिकार नसता तर, आमच्या या इंग्लंडाची राज्य-व्यवस्था फारच थोडक्या माणसांच्या हातांत गेली असती व निव्वळ बाच्छाई झाली असती. आपणांवर जीं माणसें सत्ता चालविणार, त्यांची निवड करण्याचा अधिकार असणें, हें स्व-संरक्षणाचें एक साधन आहे. हें साधन प्रजेपैकीं प्रत्येकाला असलेंच पाहिजे. मग दुसऱ्यावर अधिकार किंवा सत्ता चालविण्याचें काम त्याला जरी कधींही मिळालें नाहीं, तरी राज्य-कर्ते निवडण्याचा हक्क त्याला असलाच पाहिजे हें उघड आहे. अशा प्रकारच्या अधिकारास स्त्रिया लायक आहेत, ही गोष्ट लोकांस मान्य आहे असें वाटतें. कारण, हल्लींच्या कायद्यानें, त्यांच्या हिताच्या

व अत्यंत महत्वाच्या अशा गोष्टीत, ह्मणजे आपल्यास योग्य असा पति निवडण्याच्या कामांत, हा अधिकार त्यांना दिलेला आहे. जो पुरुष, आपल्यावर जन्मभर सत्ता चालविणार, तो पुरुष, स्त्रीनें आपल्या इच्छेनें वरावा अशी बहुतेकांची समजूत किंवा कल्पना असते. ज्या ठिकाणी सार्वजनिक कामाकरितां कांही कांही माणसांची निवड करावयाची असते, त्या ठिकाणी अवश्य लागणाऱ्या अशा अटी किंवा मर्यादा ठरविणें, हे कायद्याचे काम आहे. परंतु, ज्या ज्या अटी किंवा ज्या ज्या मर्यादा पुरुषांच्या बाबतीत बस्स आहेत, त्या त्या, स्त्रियांच्या बाबतीतही बस होतील, असें आमचे ह्मणणे आहे. स्त्रियांच्या बाबतीत विशेष अटी असण्याची जरूर दिसत नाही. माझा ह्मणण्याचा आशय हा आहे की, पुरुषांना आपलें मत देण्याच्या अधिकाराला, ज्या ज्या अटीची व ज्या ज्या मर्यादांची योजना केली आहे, त्याच अटीवर व त्याच मर्यादेत, स्त्रियांसही आपले मत देण्याचा अधिकार कां मिळूं नये? मिळूंनये, असे ह्मणण्यास कांहीच योग्य कारण दिसत नाहीं. कोणत्याही एका वर्गातील स्त्रिया घेतल्या तर, त्यांपैकीं बहुतेक स्त्रियांची राजकीय संबंधानें जी मतें असतील, ती मतें त्याच वर्गातील पुरुषांच्या मताहून भिन्न असण्याचा संभव फारच थोडा. आतां, एवढे मात्र खरें कीं, जेव्हां एकट्या स्त्री-वर्गाच्याच हिताहिताचा संबंध उत्पन्न होईल, तेव्हां मात्र गोष्ट निराळी. कारण, अशा प्रसंगीं बहुतेक पुरुषांचीं मतें विरुद्ध पडणार. परंतु इतर प्रसंगीं स्त्रियांचीं व पुरुषांची मते सारखींच असण्याचा जर पुष्कळ संभव आहे, तर स्त्रियांनाही प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार असला पाहिजे, हें उघड दिसते. आपल्याला योग्य न्याय मिळतो व आपणांस बरोबरीच्या नात्यानें पुरुष वागवीत आहेत, अशा प्रकारचा जिम्मा पुरुषांकडून स्त्रियांस मिळाल्यासारखें होणार नाहीं

काय? ज्या इतर गोष्टी सिद्ध करण्याचा मी यत्न करीत आहे, त्या गोष्टी ज्यांना मान्य किंवा पसंत नाहींत त्यांना, एवढी ही गोष्ट तरी मान्य झालीच पाहिजे, असें मी समजतों. प्रत्येक स्त्री जर कोणाची तरी बायको होऊन राहिली, आणि प्रत्येक बायको ह्मणजे गुलाम असें जरी असलें, तरी त्या गुलामाला कायदेशीर आत्म रक्षणाची अधिक अपेक्षा रहाणार. जे कायदे त्यांच्या धन्यांनी केलेले असतात, त्या कायद्यांत, त्या गुलामांच्या रक्षणासंबधीं कशा तजविजी केलेल्या असतात, हे अपणांस ठाऊक नाहीं असें नाहीं!

३. येथपर्यंत पार्लमेंटांत किंवा म्युनिसिपॉलिटींत आपल्या तर्फे प्रतिनिधि निवडण्याचा हक्क स्त्रियांस असावा किंवा नाहीं, याबद्दल विचार झाला. आतां, मोठमोठी जबाबदारीची व सार्वजनिक कामें करण्यास स्त्रिया योग्य आहेत किंवा नाहींत, या संबधाचा आपण विचार करूं. आमच्या प्रतिस्पर्ध्यांचा आक्षेप बहुधा असा असतो कीं, ही गोष्ट व्यवहारांत चालण्यासारखी नाहीं. या वाद-ग्रस्त मुद्याच्या संबंधानें, स्त्रियांच्या योग्यायोग्यतेचा विचार करणें अवश्यच आहे असें नाहीं, ह्मणून पूर्वी मी उल्लेख केलाच आहे. कारण, जी स्त्री कोणताही प्रतिष्ठित धंदा उघडपणानें करील, व त्यांत तिला जर यश प्राप्त होईल तर ती स्त्री त्या धंद्यास लायक आहे, असें उघड सिद्ध होतें. तिच्या पात्रतेविषयीं दुसरें प्रमाण काय देतां येईल? सार्वजनिक कामाच्या संबंधानें विचार करितां, ही गोष्ट उघडच आहे कीं, लायक माणसें निवडणें व नालायक माणसें टाळणें, ही गोष्ट एकंदर देशामध्यें ज्या प्रकारची राज्य-पद्धति असेल तिजवर अवलंबून असते. ज्या पद्धतीनें अयोग्य पुरुषांचा प्रवेश टाळतां येईल, ह्मणजे, ज्या राज्य-तंत्रांत अयोग्य व अपात्र पुरुषांचा प्रवेश होत नाहीं, त्याच राज्य-तंत्रांत अयोग्य व अपात्र अशा स्त्रियांचाही प्रवेश होणार नाहीं. होईल असें मानण्यास कांहीं

सयुक्तिक कारण दिसत नाहीं. परंतु चांगली माणसें निवडून वाईट माणसें टाळणे, हा गुण ज्या राज्य-पद्धतीत नसेल, त्या राज्यपद्धतीच्या योगानें नालायक व वाईट माणसें राज्य कारभारांत शिरणारच हें उघड आहे. मग ती नालायक माणसें पुरुष असोत किंवा स्त्रिया असोत. स्त्रिया असल्यानेंच कांहीं विशेष नुकसान होईल असें ह्मणतां येत नाहीं. तेव्हां सार्वजनिक काम किंवा अधिकार चालविण्यासारख्या स्त्रिया थोड्या तरी पण आहेत, असें जोंपर्यंत लोक कबूल करितात, तोंपर्यंत या थोड्या स्त्रियांच्या संबंधापुरताच जरी विचार केला तरी, ज्या कायद्याच्या योगानें त्यास प्रतिबंध होत आहे, तो कायदा न्यायाचा होऊं शकत नाहीं. मग स्त्रियांच्या एकंदर बुद्धिमत्तेबद्दल कोणाचें कसेंही मत असो. तथापि स्त्रियांच्या एकंदर बुद्धिमत्तेचा विचार प्रस्तुत वादांत महत्वाचा नाहीं असें नाहीं. स्त्रियांच्या बुद्धि-सामर्थ्याविषयीं जर निःपक्षपातानें विचार केला, तर स्त्रियांच्या अपात्रते-विरुद्ध जीं जीं प्रमाणें दाखविण्यांत येतात, व जें प्रतिपादन करण्यांत येतें, त्यांत विशेष भर पडेल व व्यवहारांत या गोष्टीची उपयुक्तता सिद्ध करण्याचे कामीं उत्तम प्रकारची मदत होईल. यास्तव तोच विचार आतां आपण करूं.

४. मानस–शास्त्रदृष्ट्या ज्या गोष्टी सिद्ध करितां येतात त्या, सध्यां आपण एकीकडे ठेवूं. स्त्रिया व पुरुष यांच्यामध्यें मानिलेले जे मानसिक–भेद, ते नैसर्गिक किंवा मूळप्रकृतीचे नसून, केवळ कृत्रिम भेद असून स्त्रियांस मिळत गेलेलें एकंदर शिक्षण व त्यांच्या भोंवतालची एकंदर स्थिति, यांचे स्वाभाविक परिणाम आहेत. अशा तात्पर्याचे निदर्शक जे विचार आहेत, त्यांचा विचार प्रस्तुत आपणास कर्तव्य नाहीं. हल्लीं स्त्रिया आपणास कशा आढळतात किंवा पूर्वीं कशा होऊन गेल्या, व त्यांनीं आपली बुद्धिमत्ता प्रत्यक्ष व्यवहारांत

कशी दाखविली, तेवढ्यापुरताच विचार प्रस्तुत आपल्यास कर्तव्य आहे. आजपर्यंत त्यांनी जी कामे केली, किंवा जी कर्तृत्व--शक्ति दाखविली, त्यांवरून, ती कामे तरी त्यांस करितां येतात, व तेवढी कर्तृत्व—शक्ति त्यांमध्ये आहे, हे खास सिद्ध होते. फक्त पुरुषांकरतांच ह्मणून राखून ठेवलेले जे उद्योग किंवा जे व्यवसाय, ते स्त्रियांस न शिकवितां, होतां होईल तितके त्या व्यवसायांपासून त्यांस दूर ठेवण्याचा यत्न असतो. या गोष्टीचा विचार केला असतां, स्त्रियांचा पक्ष, जी कामे त्यांनीं प्रत्यक्ष करून दाखविली आहेत, तेवढ्यावरच सिद्ध होतो. जी गोष्ट प्रतिपक्ष्यांस मान्य आहेच, असे ह्मणण्यास हरकत नाही, तेवढ्याच गोष्टीवर माझे सर्व प्रतिपादन आहे. या प्रश्नांत नास्ति—पक्षाच्या प्रमाणास मुळीच कांहीं किंमत नाहीं. व अस्ति—पक्षाचें प्रमाण अगदीं निर्णायक आहे, असे मानले पाहिजे. ज्या कामांत **होमर,*** **ॲरिस्टाटल्,**† **मायकेल्**‡ **अंजेलो,** किंवा **बिथोव्हेन**§ या प्रसिद्ध पुरुषांनीं उत्तम नांवलौकिक मिळविला; त्या कामाच्या बरोबरीचें असें एकादें

---

* हा **ग्रीक** लोकांचा आद्य-कवि होय हा **ख्रिस्ती** शकापूर्वी अजमासें हजार वर्षांपूर्वी होऊन गेला. आपल्या इकडे जसें वाल्मीकीनें रामायण लिहिलें, किंवा **व्यासानें महाभारत** रचिलें, तशाच योग्यतेची **होमरनें इलियड व ऑडिसी** नांवाचीं काव्यें लिहिलीं

† हा **ग्रीक** तत्त्ववेत्ता होता. तो ख्रि० श० पू० ३८४ या वर्षीं जन्मला. व ख्रि० श० पू० ३२२ या वर्षी मृत्यु पावला. आपल्या **शिवाजी** राजाचा जसा **रामदास**-**स्वामी**, तसा हा **शिकंदर बादशाहाचा** गुरु होता.

‡ यास **'बुओनारोटी'** असेंही ह्मणतात. आपल्या इकडे जसा **रविवर्मा** किंवा **भिवासुतार** तसा हा **इटालीदेशांत** प्रसिद्ध चित्र-कार, मूर्ति-कार, शिल्पकार व कवि होऊन गेला. हा इ० स० १४७४ त जन्मला व इ० स० १५६३ त मरण पावला.

§ हा **प्रशिया** देशांत इ० स० १७७० त जन्मला. हा, आपल्यांत जसे **तानसेन** किंवा प्रोफेसर **मौलाबक्ष रहिमतखां**, किंवा बीनकार **बंदे अल्ली** यांच्यासारखा संगीतवादनादिकलांमध्ये व सुंदर स्वर-रचनेमध्यें ज्याची लोकोत्तर बुद्धि असा पुरुष होऊन गेला. हा इ० स० १८२७ त मरण पावला.

काम आजपर्यंत एकाही स्त्रीनें केले नाही. यावरून **होमर, आरि-स्टॉटल,** वगैरे होण्यास एकही स्त्री योग्य नाहीं, असें अनुमान करणे अगदी अयोग्य होईल. एवढ्या या नास्ति-पक्षाच्या गोष्टीवरूनच ह्मणजे, कोणीही स्त्री आजपर्यंत **होमरकवी**सारखी किंवा इतर लोकोत्तर-गुण प्रकट केलेल्या एखाद्या पुरुषासारखी झालेली नाही, या गोष्टीवरून, फार फार झाले तर तो प्रश्न अनिश्चित राहील. व मानसशास्त्रामध्ये तो विचार करण्यासारखा आहे असें ह्मणतां येईल. परंतु कोणती एखादी स्त्री राणी **इलिझाबेथ,*** **डिबोरा,**† अथवा **जोन् आफ् आर्क**‡ होऊं शकेल, ही गोष्ट अगदी खास आहे, कारण, ती अनुमानाने ठरावयाची आहे असें नव्हे, तर प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींपैकींच ती एक आहे. प्रस्तुतच्या व्यवहार शास्त्रान्वये, ज्या गोष्टी करण्याचा स्त्रियांस निषेध आहे, त्याच गोष्टी त्यांस चांगल्या रीतीने करितां येतात, हे सिद्ध झाले आहे. हे पाहून फार चमत्कार वाटतो. **शेक्सपीयर**ची सर्व नाटकें अथवा **मोझार्ट्**ची§ सर्व संगीत काव्ये कर-

---

* या नांवाची **इंग्लंडामध्ये** एक मोठी राणी होऊन गेली. त्या वेळी **शेक्सपीयर** सारखे मोठे कवि व **बेकन**सारखे मोठे तत्त्व-वेत्ते झाले. व **प्रॉटेस्टंट** धर्माचा उत्कर्ष झाला. हिनें मोठ्या चातुर्यानें पुष्कळ दिवस राज्य केलें. हिच्या अमदानींत **इंग्लंडांत** मोठी भरभराट झाली. आपल्या इकडील **अहिल्याबाईहोळकर व बायजाबाई शिंदे,** वगैरे स्त्रियांचीं उदाहरणें ध्यानांत आणण्यासारखीं आहेत.

† ही एक अशीच लोक-प्रसिद्ध व विशिष्टगुणान्वित स्त्री **इंग्लंडांत** होऊन गेली.

‡ ही बाई मोठी शूर होती. हिनें युद्धामध्यें अग्रेसरता पत्करून आपल्या ( **इंग्लंड** ) देशांत नांवलौकिक मिळविला. हिला ' अर्लियन येथील कुमारी ' असें ह्मणत. ही इ० स० १४११ त जन्मली. आणि इ० स० १४३१ त मरण पावली. आपल्या इकडे जशी **झांशीची** शूर राणी **लक्ष्मीबाई** हिची कीर्ति आहे, तशाच प्रकारची इतिहासांतरी ह्या **फ्रेंच** बाईचीही आहे.

§ हा **जर्मन्** इ० स० १७५६ त जन्मला, व इ० स० १७९१ त मरण पावला. आपल्याइकडील जसे प्रसिद्ध कै० **अण्णा किर्लोसकर** नुकतेच होऊन गेले, तशाच प्रकारचा हा असून यानें संगीतासारखीं काव्यें केलीं होती.

ण्याला, स्त्रियांस प्रतिबंधक असा एकही कायदा नाही. परंतु राणी **इलिझाबेथ,** किंवा **व्हिक्टोरिया** राणी, यांना जर वारसाच्या हक्कानें राज्य-पद प्राप्त झाले नसते तर मोठमोठ्या राज्य-कारस्थानांचा भार ज्या **इलिझाबेथने** उत्तम प्रकारें वाहिला, त्यांच्यापैकीं शतांश किंवा सहस्रांश देखील तिला प्राप्त झाला नसता.

५. मानस—शास्त्रदृष्ट्या विचार करितां, केवळ अनुभवावरून जर कांही निर्णायक अनुमान निघण्यासारखें असेल, तर ते हेंच कीं, जीं कामे करण्याची स्त्रियांस मनाई होती, त्याच कामांमध्ये त्यांचे बुद्धि-सामर्थ्य विशेष व्यक्त झाले. व तीं कामे करण्यांत त्यांनी आपली विशेष पात्रता दाखविली. दुसऱ्यांवर अधिकार चालविण्याचे किंवा लोक-शासनचा अधिकार चालविण्याचे जे थोडेसे संधि—जे थोडेसे प्रसंग—दैव योगाने त्यांस प्राप्त झाले, त्यांत, त्यांची पात्रता उघड झाली नाहीं काय? नाही असें कोणी ह्मणेल तो ह्मणो बिचारा! चमत्कार असा की, जी कामे करण्याची त्यांना उघडपणें पूर्ण मुभा ठेविली होती, त्यांत त्यांनीं कांही एक विशेष प्रकारची दक्षता दाखविली नाहीं. परंतु जी कामे करण्याचा समाजानें त्यांस प्रतिबंध केला, त्यांतच त्यांनी आपले बुद्धि—सामर्थ्य दाखविले. जगाचा इतिहास पाहिला असतां, त्यांत राजांच्या सख्येच्या मानाने, राज्य करणाऱ्या राण्यांची संख्या फारच थोडी दृष्टीस पडते. परंतु या लहानशा संख्येपैकीं बहुतेक स्त्रियांनी राज-कारणांत आपली बुद्धिमता निःसंशय प्रकट केली आहे. विशेषेकरून त्यांपैकीं बऱ्याच स्त्रिया ऐन आणीबाणीच्या प्रसंगी राज्य-पदावर आरूढ झाल्या होत्या, ही गोष्ट लक्षांत आणिली असतां आश्चर्य वाटते. स्त्रियाविषयीं काल्पनिक व लोकांत रूढ असलेल्या ज्या समजुती आहेत, ह्मणजे, स्त्रिया मनाच्या चंचल वगैरे जे दुर्गुण त्यांच्यामध्ये स्वभावतः आहेत असें मानण्याचा

प्रघात आहे, त्याच्या अगदीं उलट वर्तन त्यांनीं केलें. अशीं उदाहरणें त्यांत पुष्कळ आढळतात. त्यांनीं जो राज्य कारभार केला, त्याच्यामध्यें त्यांची जशी बुद्धि-मत्ता दृष्टीस पडते, तशीच त्यांच्या मनाची दृढता, दृढ निश्चय, कुवत किंवा धमक, वगैरे गुण दृष्टीस पडतात. बादशाहिणी व राण्या यांच्या संख्येंत, मोठमोठ्या प्रांतावर ज्यांनीं वहिवाटदारिणी व कारभारिणी अशा संबंधानें आपली सत्ता चालविली, अशा स्त्रियांची भर घातल्यास, ज्या स्त्रियांनीं लोक-शासनाच्या कामांत उत्तम प्रकारचा नांवलौकिक मिळविला, अशा स्त्रियांची संख्या बरीच मोठी होईल.* ही गोष्ट इतकी निर्विवाद आहे कीं, कांहीं दिवसांपूर्वीं आमच्या या ह्मणण्याला एकानें उत्तर देण्याचा यत्न केला होता. आणि जी गोष्ट त्याला मान्य करावी लागली, तिचा त्यानें उपहास केल्यासारखें करून तो असें ह्मणाला कीं, राजांपेक्षां राण्या चांगल्या असतात, याचें कारण, राजाच्या

* या ठिकाणीं निबंध कारांनीं एक टीप दिलेली आहे. ती येणेंप्रमाणें —

"या संबंधानें **एशियाखंड** व **यूरोपखंड** या दोहोंचा विचार केला असतां, राज्य-कारभार ज्या स्त्रियांनीं उत्तम रीतीनें चालविला, अशाच स्त्रियांची संख्या फार मोठी होते. **हिंदुस्थानांतील** एकाद्या प्रांतांत किंवा संस्थानांत राज्य-कारभार मोठ्या बंदोबस्तानें, जागरूकतेनें व मितव्ययानें असा चालत असला, रयतेवर जुलूम होत नसून उत्तम प्रकारें व्यवस्था असली; जमिनीची लागवड दिवसानुदिवस वाढत असून, लोक सुखी असले, तर अशा प्रत्येक चार संस्थानांपैकीं तीन संस्थानें तरी स्त्रियांच्या अधिकाराखालचीं किंवा स्त्रियांच्या सत्तेनलीं आहेत, असें पक्कें समजावें। ही गोष्ट मला अगदीं अनपेक्षित किंवा अपरिचित होती. परंतु **हिंदुस्थानाच्या** मुख्य राज्य-कारभाराच्या खात्याशीं माझा संबंध असल्या कारणानें, **हिंदुस्थानांतील** राज्यें व संस्थानें यांच्या संबंधाची जी माहिती मला दफ्तरांतून मिळाली, तींतून मीं ही माहिती गोळा केली आहे. अशा प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें आढळतात. हिंदु लोकांच्या चालीप्रमाणें व रूढीप्रमाणें स्त्रीला राज्य करण्याचा अधिकार नाहीं, असें जरी आहे, तरी वारस अज्ञान असल्याचे प्रसंग वारंवार येतात. आणि याचें कारण राजे बहुतेक आळशी व विषयासक्त असल्या कारणानें ते अकालीं मरतात. ह्या कारभारणी किंवा राज-पत्न्या लोकांसमोर कधीं येत नाहींत. आपल्या कुटुंबाखेरीज पर-पुरुषाशीं त्या कधीं भाषण करीत नाहींत.

अमदानींत खरोखर स्त्रियाच राज्य करीत असतात; व राण्यांच्या अमदानींत वस्तुतः पुरुपच राज्य करीत असतात.

६. अशा प्रकारचें उपहासानें किंवा थट्टेचे भापण करणाराजवळ गंभीरपणानें एखाद्या विपयाचें प्रतिपादन करणें निरर्थक होय, असें प्रथमतः मनांत येतें. तथापि ही वरील ह्मण पुष्कळ लोकांनीं उच्चारिलेली मी ऐकिली आहे व त्या ह्मणींत कांहीं शहाणपणाचा अंश आहे असें समजून, त्यांनीं ती उच्चारिली असावी. कसेंही असो, चालू विपयाच्या विवेचनास आरंभ करण्यापूर्वीं, या ह्मणींत तथ्य कितपत आहे ते पाहू. मी असें निश्चयपूर्वक सांगतो कीं, राजांच्या अमदानींत राज्य खरोखर स्त्रिया करीत असतात, किंवा राज्य-कारभार खरोखर स्त्रियांच्या हातांत असतो, ही गोष्ट खरी नाहीं. अशा प्रकारचीं उदाहरणे क्वचित् आढळली तरी फारच थोडीं आढळतात. ज्या ज्या ठिकाणीं दुर्बळ व नेभळ्या राजांनीं राज्य वाईट केलें, त्या त्या ठिकाणीं, त्यांच्या मर्जींतल्या स्त्रियांच्या सल्ल्यानें राज्यकरण्यापेक्षां, पुरुप-जातीपैकींच जी त्यांची आवडती माणसें होतीं, त्यांचाच पगडा त्यांच्यावर अधिक होता, असें आढळतें. जेव्हां एखादा राजा एखाद्या स्त्रीवर लंपट होऊन तिच्या सल्ल्यानें राज्य करितो तेव्हां, राज्य चालण्याचा मुळींच संभव नसतो. तथापि या गोष्टीलाही कधीं कधीं अपवाद आढळतात. फ्रेंच राजांचा इतिहास

किंवा केलं तरी पडद्याच्या आतून करितात. त्यांस वाचतां येत नाहीं, आणि आलें तरी राज्यकारभाराच्या संबंधाची माहिती ज्या पुस्तकांत दिली आहे, असें पुस्तक त्यांच्या भाषेंत एकही नाहीं. या गोष्टी लक्षांत ठेविल्या असतां, स्त्रियांच्या अंगीं राज्य-कारभार करण्याविषयीं स्वभावतःच बुद्धि-सामर्थ्य आहे, ही गोष्ट मनांत चांगली ठसते. इतिहासप्रसिद्ध शूर झांशीची राणी, व योग्य दानधर्म करण्याच्या संबंधानें सर्व विश्रुत अशी अहिल्याबाई होळकरीण या दोन स्त्रियांचीं उदाहरणें ही वाचकानीं ध्यानांत आणण्या सारखीं आहेत.

पहातां, दोघां राजानी आपल्या खुषीनें राज्याचा कारभार पुष्कळ वर्षेपर्यंत स्त्रियांकडेच सोपविला होता. त्यांपैकीच एकजण त्याची आई होती. व दुसरी प्रत्यक्ष त्याची बहीण होती. या दोन राजांपैकी एक **आठवा चार्लस** हा केवळ पोरसवदा होता. परंतु त्यानें राज्य-सूत्र जे आपल्या मातोश्रींच्या स्वाधीन केले होते ते, त्याचा बाप जो **अकरावा लुई** त्याच्या हेतूस अनुसरूनच केले होते. हा **अकरावा लुई** त्या काळचा फारच उत्तम राजा होता. दुसरा राजा **सेन्टलुई** हाही फार उत्तम राजा होता. **शार्लमेन्***[*] राजा झाल्यानंतर, तेव्हां-पासून इतका जोमदार राजा दुसरा झाला नाही. या दोघींही राण्यांनी जो राज्य-कारभार चालविला, त्याची बरोबरी, त्या वेळच्या राजांपैकी, एकाही राजाने केली नाही. **पांचवा चार्लस** हा बादशाहा होता. तो आपल्या काळचा मोटा राज-कार्य-धुरंधर असून, त्याच्या दरबारांत राजकारण-दक्ष अशी पुष्कळ माणसे होती. आपल्या खऱ्या हिता-कडे दुर्लक्ष करून, केवळ मनोविकारास वश होणें, ही गोष्ट तर त्याच्या कधीं स्वप्नांत ही येत नसे. असे असून या बादशहानें आपल्या कुटुंबांतील दोन राज-पुत्र्यांस **नेदर्लंडस्** या देशाच्या गव्हर्नरचा अधिकार एकीपासून एकीस दिला होता. हा राजा जीवमान होता तोपर्यंत, त्या दोन्ही राण्यांनी एकामागून एक असा तो कारभार चालविला होता. व त्याच्या मरणानंतर तो **नेदर्लंड**चा गव्हर्नराचा अधिकार त्या राज-घराण्यांतील तिसऱ्या एका राज-पुत्रीस मिळाला. सदरहू दोन स्त्रियांनीं फारच उत्तम रीतीने राज्य-कारभार चालविला. व त्या दोघींपैकीं एक **मार्गारेट ऑफ ऑस्ट्रिया** ही त्या काळीं, राजकारणांत अत्यन्त दक्ष अशी स्त्री मानलेली होती. याप्रमाणें या

---

* हा आपल्या देशांत जसे **हरिश्चंद्र**, **रामचंद्र**, किंवा आलिकडील **अकबर**, हे राजे होऊन गेले, त्या वर्गापैकीच **शार्लमेन्** हा राजा फ्रान्स देशांत होऊन गेला.

ह्मणीच्या एका भागाचा विचार झाला. आतां दुसऱ्या भागाचा विचार करूं. लोक जे ह्मणतात की, 'राण्यांच्या अमदानींत खरी राज्य-सत्ता पुरुषांच्या हातांत असते.' या ह्मणण्याचा अर्थ, 'राजांच्या अमदानीत खरी सत्ता स्त्रियांच्याच हातांत असते.' या ह्मणण्यासारखाच समजावयाचा की काय? जे पुरुष त्यांच्या मर्जीतले व विशेष कृपेतले असतात, ह्मणजे ज्यांपासून त्यांस विषय सुख प्राप्त होतें, असे पुरुष राज्य-कारभार चालविण्यास त्या पसंत करितात. असें ह्मणणे आहे की काय? मला असें वाटतें की, असा प्रकार, **दुसरी क्याथरीन्** हिच्यासारख्या ज्या अत्यन्त दुराचारी स्त्रिया असतात, त्यांच्यांत देखील क्वचित् आढळतो. व अशा प्रकारच्या स्त्रियांच्या अमदानीत, पुरुषांच्या हातात राज्य-सत्ता असल्या कारणाने तें राज्य चांगलें चालतें, असें कधींही घडत नाही. आणि हे जर खरें असेल तर, राणींच्या अमदानीत, साधारण एखाद्या राजाच्या अमलापेक्षां राज्य-कारभार चांगल्या माणसांच्या हातांत असतो, असेंच ह्मटलें पाहिजे. आणि हें ह्मणणें खरें असल्यास, आपल्या चांगल्या कारभाऱ्यांची निवड करितां येण्यापुरती बुद्धि-मत्ता राण्यांच्या अंगीं असते, हे मान्य करणे भाग आहे. आणि त्यावरून हे उघड होते कीं, राजाच्या अधिकाराला आणि त्याचप्रमाणे, त्याचा मुख्य अमात्य किंवा प्रधान, या दोन्ही अधिकारांनां पुरुषांपेक्षां स्त्रियाच अधिक योग्य होतात. कारण, मुख्य प्रधानाचे काम जातीने सर्व कारभार पाहण्याचे नसून, सार्वजनिक कामें किंवा एकंदर कारभार चालविण्याकरितां प्रत्येक खात्यांत उत्तम व योग्य माणसांची निवड करणें, एवढेच आहे.

पुरुषांपेक्षां स्त्रिया ज्या गुणांत श्रेष्ठ असतात, असे बहुतेक लोक कबूल करितात त्या गुणांपैकी दुसऱ्याचे इंगित सत्वर ताडणे, हा एक गुण फार महत्त्वाचा आहे. ज्या मनुष्यास इतर मनुष्य-प्राण्यांवर

सत्ता चालविण्याचें काम करावयाचे असतें, त्याला या गुणाची अत्यंत आवश्यकता असते. यामुळे, योग्य माणसांची निवड करण्याच्या कामास पुरुषांपेक्षां स्त्रिया अधिक लायक असतात, असें सिद्ध होतें. **क्याथरीन् डी मिडिसी** या नांवाची एक अविचारी अशी राज-पुत्री होती. तथापि तिला देखील **चान्सेलर डी लहॉपिटाल्** या नांवाचा जो एक राज-कारण कुशल पुरुष होऊन गेला, त्याच्या गुणांची परीक्षा करितां आली. आजपर्यंत ज्या मोठमोठ्या राण्या होऊन गेल्या त्या, राज्य-कारभार करण्याचा त्यांच्यांत जो लोकोत्तर गुण होता, त्याच्याच योगानें प्रसिद्धीस आल्या, व त्यांच्या हाताखालीं काम करण्यास त्यांना जीं माणसें मिळालीं, तींही त्याच कारणामुळे चांगलीं मिळालीं. ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. त्या राण्यांनीं एकंदर कारभाराचें मुख्य सूत्र आपल्या हातांत ठेविलें. त्यानीं चांगल्या मंत्र्यांची सल्लामसलत ऐकून तदनुसार वर्तन ठेविलें, या गोष्टीवरून, राज्य-कारभार करण्याच्या कामांत ज्या मोठमोठ्या अडचणी उत्पन्न होतात, त्या अडचणींतून आपल्या शहाणपणानें पार पडण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं होतें, ही गोष्ट त्यांनीं निर्विवाद सिद्ध केली, असें म्हटलें पाहिजे.

७. [illegible] जीं मोठमोठीं कामें, तीं करण्याची ज्यांच्या अंगीं योग्यता असते, त्या माणसांच्या अंगीं साधारण कामें करण्याची योग्यता नसते, असें समजणें योग्य होईल का? [illegible] वेळेस प्रसंग येईल, त्या त्या वेळेस राज-स्त्रिया व राज-भगिनी, [illegible] कारभारास राजपुत्रांप्रमाणेंच योग्य अशा आढळाव्या, व राज-कारण निष्णात पुरुष, किंवा मोठमोठ्या कारखान्यांचे चालक व सामाजिक संस्थांचे व्यवस्थापक, यांच्या बायकांस आणि बहिणींस, त्यांचे नवरे व त्यांचे भाऊ जीं कामें करितात, तीं कामें करितां येणार नाहीत

असे मानण्यास कांहीं वास्तविक कारण आहे काय? खरें कारण एवढेच दिसतें की, राज-घराण्यांतल्या स्त्रिया सामान्य पुरुषांपेक्षां उच्च-स्थितींत व श्रेष्ठ-वर्गांत असल्या कारणानें, राज-कारणांत आपण पडणें हें अयोग्य किंवा अप्रशस्त आहे, अशा प्रकारचा उपदेश त्यांस कधींही मिळालेला नसतो. शिक्षणानें ज्यांचें मन विस्तृत अथवा विकसित झालें आहे, ज्यांना विद्येचा संस्कार दृढ झाला आहे, ज्यांच्या-भोंवतालीं चालू असलेल्या ज्या अनेक मोठ्या उलाढाली-कीं ज्यांत पाहिजे त्या वेळीं त्या माणसांचा संबंध उत्पन्न होण्याचा संभव असतो—अशा माणसास त्या उलाढालींच्या संबंधानें आस्था वाटणें, हें फारच स्वाभाविक आहे. हें तत्त्व लक्षांत ठेवून, राज-घराण्यांतल्या स्त्रियांस जर अशा प्रकारची आस्था वाटली, व त्यांनीं राज-कारणांत मन घातलें, तर त्यांस कोणी प्रतिबंध करीत नाहीं. यामुळें, पुरुषांप्रमाणेंच ज्यांच्या बुद्धीचा विकास होण्यास ज्यांना अनेक प्रसंग असतात अशा स्त्रिया, राज-घराण्यांतल्या स्त्रियांखेरीज इतरांच्या नसतात. तेव्हां, पुरुषांपेक्षां त्यांच्यांत कांहीं कमीपणा आढळत नाहीं, ही गोष्टही विस्मय कारक नाहीं. ज्या ज्या मानानें व ज्या ज्या ठिकाणीं, राज-सत्ता चालविण्याचा प्रसंग स्त्रियांस आला, व त्यांच्या बुद्धि-सामर्थ्याची परीक्षा झाली, त्या त्या मानानें व त्या त्या ठिकाणीं, त्यांची योग्यता सिद्ध झाली.

८. हा सिद्धांत, स्त्रियांच्या विशेष बुद्धि-सामर्थ्याच्या अथवा योग्यतेच्या संबंधानें जगाला जो थोडासा अनुभव आलेला आहे, त्याजपासून निघणारें जें अनुमान, त्यास अनुसरूनच आहे. या संबंधानें ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे की, स्त्रियांची जी स्थिति आजपर्यंत कायम आहे, तेवढ्याच पुरता हा अनुभव आला. यापुढें त्या कशा होतील, त्या संबंधानें आज कांहींच सांगतां येत नाहीं. स्त्रिया निसर्गतः कशा आहेत किंवा कशा नाहीत, त्यांचे स्वाभाविक धर्म

कोणते आहेत किंवा कोणते नाहींत, अथवा पुढें त्यांचे धर्म अमुक होतील किंवा अमुक होणार नाहींत, अशा प्रकारचा निश्चयात्मक सिद्धांत ठोकून देणें, हें निव्वळ साहसाचें किंवा धाष्टर्याचें काम आहे, असें मी समजतों. आजपर्यंत त्यांचा जो यदृच्छेचा विकास, किंवा त्यांच्या मानसिक व इतर शक्तींची स्वाभाविक वृद्धि, तिची गति कृत्रिम कारणांनीं कुंठित झाल्यामुळें, त्यांच्या मूळप्रकृतींत पुष्कळ वेडावाकडा बदल होऊन, कांहीं कांहीं प्रकृति-धर्म अगदीं गूढ राहून गेले, किंबहुना नष्टप्राय झाले, ह्मटलें तरी चालेल. स्त्रियांच्या स्वभावास जर पुरुषांच्या स्वभावाप्रमाणें मोकळेपणानें कांहींएक वळण मिळालें असतें; त्यांच्या त्या त्या वेळच्या स्थितीस अवश्य होतें त्याखेरीज कृत्रिम प्रकारचें वळण देण्याचा यत्न जर करण्यांत आला नसता, व तें वळण स्त्रिया व पुरुष या उभयतांसही सारखें देण्यांत आलें असतें, तर जे बुद्धि-सामर्थ्य किंवा ज्या मानसिक-शक्ति प्रकट झाल्या असत्या, त्यांमध्यें कांहीं विशेष—किंबहुना मुळींच कांहीं—भेद पडला असता किंवा नाहीं, हें कोणासही निश्चय-पूर्वक सांगतां येणार नाहीं. प्रस्तुत ज्या भेदाबद्दल विशेष वाद नाहीं, ह्मणजे जे बहुतेक भेद उभय पक्षांसही मान्य करावे लागतात, ते भेदही अशाच प्रकारचे आहेत. ह्मणजे, स्वाभाविक बुद्धींत किंवा मूळ प्रकृतींत ते भेद होते असें नसून, केवळ बाह्य उपाधींच्या योगानें, ह्मणजे भोंवतालच्या स्थितीमुळें ते उत्पन्न झाले असावे, असें मी पुढें दाखविणार आहेंच. परंतु चालू व्यवहारांत स्त्रियांच्या संबंधानें जो अनुभव येतो, तो पाहिला असतां. त्यांच्या संबधानें खरोखर निदान एवढें तरी खास ह्मणतां येईल कीं, त्यांच्या बुद्धीची साधारण प्रवृत्ति व्यवहारांतल्या गोष्टींकडे अधिक असते. वर्तमानकाळाचा किंवा भूतकाळाचा स्त्रियांचा जो इतिहास

आढळतो, त्याशीं आमचें हे ह्मणणें ताडून पाहिलें असतां, बरेंच सुसंगत दिसेल. रात्रंदिवस ज्या गोष्टी आपल्या प्रत्ययास येतात, त्यावरूनही ही गोष्ट सिद्ध होते. कोणतीही एखादी मोठी बुद्धिमती स्त्री घेतली तर, तिच्यात जे विशेष मानसिक गुण किंवा ज्या विशेष शक्ति आढळतील, त्यात अधिक काय असतें, याचा आपण विचार करूं. ते गुण किंवा त्या शक्ति बहुतेक अशा प्रकारच्या असतात कीं, त्यांचा उपयोग व्यवहारास फार होतो. त्यांची नैसर्गिक प्रवृत्ति व्यवहाराकडेच विशेष असते. बायकांची जी उपजत-बुद्धि ह्मणत असतात, त्याचा अर्थ तरी काय? त्याचा अर्थ एवढाच कीं, त्यांच्या आसपास जे काय घडत असतें, तें यथार्थतेनें व सत्वर त्याच्या मनात शिरतें. सर्वसाधारण नियम किंवा साधारण तत्त्वें, हीं त्यांच्या लौकर ध्यानात येत नाहींत. शास्त्ररीत्या जो सृष्टि-नियम शोधून काढलेला, तो कोणास उपजत-बुद्धीनें समजला आहे काय? आचारसंबंधाचा, किंवा धर्मसंबंधाचा, अथवा शहाणपणाच्यासंबंधाचा कोणताही एखादा नियम एखाद्यास उपजत बुद्धीनें समजला आहे, असें कधीही घडलें नाहीं. या ज्या गोष्टी आहेत त्या, पुष्कळ दिवसांचा अनुभव एकत्र करून, पुष्कळ गोष्टींची तुलना करून, फार काळजी पुरः-सर, व सावकाश, अशा रीतीनेंच समजण्यात येतात. ज्यांची उपजत-बुद्धि तीव्र आहे, अशा प्रकारचे पुरुष घेतले, किंवा स्त्रिया घेतल्या, तरी असें हे शास्त्र-नियमन करण्याचें काम, अशा एखाद्या माणसाकडून झालें आहे, असें उदाहरण पाहण्यांत नाहीं. आतां, अशा प्रकारचा जो अनुभव लागतो, तो ज्याचा त्यास प्राप्त होऊन, मग तो कांहीं एक अनुमान किंवा सिद्धांत ठरवितो, ती गोष्ट निराळी. माणसांची उपजत-बुद्धि किंवा उपजत शहाणपण ह्मणून ज्याला ह्मणतात, त्या गुणामुळें स्वावलोकनाचीं जीं साधनें त्यास प्राप्त झालीं असतील, त्यांच्यापासून साधारण नियम किंवा तत्त्वें शोधून काढणें, या कामाविषयीं त्या

माणसांच्याठायीं काहींएक विशेष योग्यता किंवा पात्रता उत्पन्न होते. तेव्हां पुरुषांप्रमाणे वाचन-द्वारा व शिक्षण-द्वारा इतर लोकांच्या अनुभवापासून प्राप्त होणारें ज्ञान जेव्हां स्त्रियांसही कर्मधर्मयोगानें प्राप्त होतें, तेव्हां—कर्मधर्म-योगानें ह्मणण्याचें कारण, ज्या ज्ञानाच्या किंवा शिक्षणाच्या योगानें संसारांत मोठमोठीं कामे करण्याचा अधिकार स्त्रियांस प्राप्त होतो त्याच्या संबंधानें पहातां—खरोखर ज्या सुशिक्षित स्त्रिया आढळतात, त्या बहुतेक आत्म—शिक्षितच असतात. तेव्हां व्यवहार दक्षतेस लागणारे जे अवश्य गुण ते पुरुषांपेक्षा त्यांत अधिक येतात. ज्या पुरुषांना पुष्कळसें शिक्षण मिळालेलें आहे, त्यांस, वर्तमानकाळाची काय स्थिति आहे या गोष्टीचें भान चांगलेंसें असण्याचा संभव नसतो. ज्या गोष्टी प्रत्यक्ष त्याच्यासमोर घडून येतात, व ज्या गोष्टींचा निर्णय त्यास करावयाचा असतो, त्यांत वास्तविक काय तत्त्व आहे, ते त्यास दिसत नाहीं. पढलेल्या ज्ञानाच्या पलीकडे त्यांच्या दृष्टीची मजल पोहोंचतच नाहीं. परंतु असा हा प्रकार, ज्या स्त्रिया खरोखर हुषार असतात त्यांचा क्वचित् घडतो. त्यांच्यांत जी एक नैसर्गिक प्रतिभा असते, किंवा ज्या गुणास आपण उपजत बुद्धि ह्मणतो, तिच्यामुळें ही अडचण त्यांस प्राप्त होत नाहीं. ज्यांचा अनुभव व साधारण बुद्धिसामर्थ्य ही सारखींच आहेत, असा एक पुरुष व अशी एक स्त्री, अशी दोन माणसें घेतलीं तर, ज्या ज्या उलाढाली किंवा जे जे व्यवहार प्रत्यक्ष त्यांच्यासमोर चाललेले असतात, त्यांचा ठसा पुरुषापेक्षां स्त्रीच्या मनावर अधिक स्पष्ट वठतो. वर्तमानकाळची स्थिति मनावर उत्कृष्ट प्रकारें प्रतिबिंबित होणें, हा गुण व्यवहार-दृष्ट्या, ह्मणजे केवळ शास्त्र-दृष्ट्या नव्हे—फारच उपयुक्त आहे. सर्वसामान्यनियम किंवा सर्वसाधारणतत्त्वे शोधून काढणे, हे काम कल्पना-शक्तीचें आहे. ते नियम किंवा तीं तत्त्वे लागू होतात अशा प्रकारचीं विवक्षित उदाहरणें शोधून काढणें, ती

तत्त्वें विशेष उदाहरणांनी किंवा दृष्टांतांनी सिद्ध करून दाखविणें, व त्यांतील सूक्ष्म भेदाभेद कळणें, हें काम व्यवहार-निष्णाततेचें आहे. आणि या कामास प्रस्तुतकाली स्त्रिया जशा आहेत, ह्मणजे ज्या स्थितींत त्या आजकाल आढळतात, त्या स्थितींतही त्या विशेष योग्य आहेत, असें मला वाटतें. आतां सामान्य नियम किंवा साधारण-तत्त्वें समजल्याखेरीज व्यवहारासही चांगुलपणा येत नाहीं. ह्मणजे, कोणतीही गोष्ट शास्त्रतः युक्त व हितावह ठरली नसेल तर, ती प्रयोगतःही हितावह होणार नाहीं ही गोष्ट मला मान्य आहे. त्याचप्रमाणें, स्त्रीच्याठायीं जे विशेष गुण आढळतात, त्या गुणांपैकीं तीव्र अशी ग्राहकशक्ति, सूक्ष्मावलोकन, किंवा दर्शन-पाटव, हा जो एक मुख्य गुण आहे, त्याच्यामुळें कधीं कधीं असेंही घडतें कीं, ती आपल्या स्वतःच्या अनुभवावरून फाजील घाईनें भलतींच अनुमानें काढिते. तथापि ही गोष्टही ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, ज्या मानानें तिचा अनुभव विस्तृत होत जातो, त्या मानानें ती अशा प्रकारचीं अनुमानें बदलण्यासही तत्पर व सिद्ध असते. तेव्हां स्त्रीच्याठायीं असणारा हा जो दोष किंवा ही जी न्यूनता, ती दूर होण्यास योग्य व उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे, इतिहासाचें ज्ञान तिला करून देणें व एकंदर मानव-जातीचा अनुभव तिच्या बुद्धि-मार्गांत आणून सोडणें; ह्मणजे, अर्थात् तिला बहुश्रुत करणें, हाच होय. हें काम उघडच शिक्षणाच्या योगानें होणारें आहे. एकाद्या हुशार व आत्म-शिक्षित पुरुषाकडून ज्या प्रकारच्या चुका घडतात, तशाच प्रकारच्या चुका स्त्रियांकडूनही घडतात. जे पुरुष एकाद्या कामांत पुष्कळ दिवस रुळलेले असतात, त्यांना ज्या गोष्टी कळत नाहींत, त्या त्यांस कळतात. परंतु, ज्या गोष्टींचें ज्ञान पुष्कळ दिवसांपूर्वीं प्राप्त झालेलें असतें, त्या गोष्टींविषयीं तो अज्ञान असल्या कारणानें, त्याच्या हातून कांहीं चुका

घडतात. पूर्वीचें प्राप्त झालेलें ज्ञान हे तर त्यानें संपादन केलेलें असतें, हे उघडच आहे. आणि तसें नसतें तर, त्याचें पाऊल पुढें पडलेंच नसतें. जें ज्ञान त्यास प्राप्त झालेलें असतें, तें त्यानें तुटक तुटक मिळविलेलें असतें, पद्धतवार मिळविलेलें नसतें. प्रस्तुतकाली स्त्रियांच्याही ज्ञानाचा प्रकार असाच आहे.

९. परतु, स्त्रियांच्या मनाची जी प्रवृत्ति वर्तमानकाळाकडे, किंवा जगांत खरोखर ज्या गोष्टी घडून येतात त्यांतलें इंगित जाणण्याकडे असते, त्या प्रवृत्तीपासून यद्यपि पुष्कळ प्रमाद अथवा चुका घडतात, तथापि एका दृष्टीनें पाहिलें असतां अशा या प्रवृत्तीच्या अभावापासून ज्या चुका घडतात, त्या चुका टाळण्यास ही स्त्रियांची प्रवृत्ति फार उपयोगाची असते. ज्या पुरुषांस कल्पनेचा फार उपयोग होतो, किंवा गूढ व खोल विचार करावा लागतो, त्यांत एक मोठी उणीव असते. ती ही की, स्त्रियांची ही अवलोकन-शक्ति, किंवा प्रत्यक्षाचें तीव्र-भान असणें हा गुण, त्यांत कमी असतो. यामुळें कोणत्याही महत्त्वाच्या प्रश्नासंबधानें ज्या ज्या प्रक्रिया किंवा कल्पना ते बसवितात, त्या कल्पनांचा बाह्य गोष्टींशी विरोध असतो, एवढेंच नाही, तर कल्पना-शक्तीचा जो योग्य हेतु, तो ते विसरून जातात. यामुळें, त्यांच्या कल्पना-शक्तीस कोणत्याही प्रकारचें नियंत्रण न राहून, ती, ज्या प्रांतांत सचेतन किंवा अचेतन असे भाव किंवा पदार्थ वस्तुतः नाहींत, अशा प्रांतांत भ्रमण करीत रहाते. केवळ शब्द-जालामध्यें गुंतून जाऊन, मानस शास्त्राच्या भ्रांतियुक्त सिद्धांतांनीं उत्पन्न केलेले छायामय प्राणी किंवा पुरुष कल्पून, त्या छाया अत्यंत उदात्त व श्रेष्ठ अशा तत्त्व-विवेचनाचे योग्य विषय होत, असें ते समजतात. केवळ अवलोकनानें व अनुभवानें ज्ञानाच्या साधनांचा संचय करण्यामध्यें गुतला नसून केवळ कल्पनेच्या व विचाराच्या

योगानें जें ज्ञान पूर्वी प्राप्त झालें असेल, त्यांतून मोठमोठीं व्यापक प्रमेयें शोधून काढून, शास्त्र-रचना व आचाराचे नियम बांधण्यांत जो गुतला आहे, अशा पुरुषानें आपलें हें शास्त्र रचनेचें काम एकाद्या खरोखर श्रेष्ठ बुद्धिसपन्नस्त्रीच्या देखरेखीखालीं व तिच्या साहाय्यानें करणें, याहून अधिक महत्त्वाची गोष्ट क्वचितच असेल. वस्तु-स्थितीच्या व सृष्टींत खरोखर घडून येणाऱ्या गोष्टींच्या मर्यादेत आपले विचार ठेवण्यास दुसरें असें साधनच नाहीं. निव्वळ कल्पनेच्यामागें वेड्यासारखी धांवत जाणारी स्त्री क्वचित् आढळते. तिच्या मनाचा झोक नेहमी व्यक्तीकडे असून, वर्गाकडे नसतो. ह्मणजे, जातीवर रहाणाऱ्या धर्माकडे तिची दृष्टि जात नसून, प्रत्यक्ष व्यक्तीकडे जात असते. शिवाय दुसरें असें कीं, तिच्या समोर जीं माणसें येतात, त्यांच्या अंतःकरणांतले भाव किंवा विकार, तिला पुरुषांपेक्षां अधिक कळतात. यामुळे व्यवहारांत कोणतीही गोष्ट करावयाची असली तरी, तिचा परिणाम भोंवतालच्या माणसांवर कसा होईल, हा विचार पहिल्या प्रथम तिच्या मनांत येतो. या दोन गोष्टींमुळें, ज्या कल्पनेंत किंवा व्यवस्थेत व्यक्तीचा विचार केला नाहीं, केवळ एकाद्या काल्पनिक पुरुषाच्या किंवा प्राण्याच्या हिताकरितांच वस्तुमात्र निर्माण केली आहे अशा समजुतीवर जिचा पाया रचला आहे, व सचेतन प्राण्यांच्या मनोभावांचा अंतर्भाव व विचार जिच्यांत मुळींच नाहीं, अशी एखादी निव्वळ मानसिक-सृष्टि, कोणी तिच्या पुढें ठेविल्यास तिजवर ती मुळींच भरंवसा ठेवीत नाहीं. यावरून ज्याप्रमाणें पुरुषांचे विचार स्त्रियांच्या विचारास व्यापकता व विस्तृतता देण्याच्या कामीं उपयुक्त होतात किंवा होतील, त्याचप्रमाणें स्त्रियांचे विचार तत्त्व-विवेचनांत निमग्न झालेल्या पुरुषांस, तत्त्व दृष्टि देण्याच्या कामीं फार उपयोगी पडतील हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. स्त्रियांच्या

विचाराची विस्तृतता अथवा व्यापकता क्षणभर एकीकडे ठेविली, व त्या विचारांतील केवळ गंभीरतेचा भाग लक्ष्यांत आणिला, तर या गंभीरतेच्या व उदात्ततेच्या बाबतीत प्रस्तुत-कालींही. स्त्रिया पुरुषांपेक्षां कमी आहेत, असे मला मुळींच वाटत नाहीं

१०. प्रस्तुत उपलब्ध होणाऱ्या स्त्रियांचे मानसिक गुण, तत्त्व-विवेचनाच्या कामास आपल्या कल्पना-शक्तीनें साहाय्य करण्याच्या कामी जर महत्त्वाचे व अगत्याचे आहेत, तर कल्पना-शक्तीचें काम ज्या ठिकाणीं सरून त्याच शक्तीच्या जोरानें जे सिद्धांत ठरविले जातात त्यांचा उपयोग व्यवहारांत करणें, या कामास तर ते गुण अधिकच उपयुक्त व महत्त्वाचे आहेत, हे उघड दिसतें. वर जीं कारणें मी दाखल केलीं आहेत त्यांच्यामुळें पुरुषांकडून बहुधा जी एक चूक होत असते, ती स्त्रियांकडून होत नाहीं. कोणत्याही सबधानें जे कांहीं साधारण नियम ठरलेले असतात, ते नियम विशेष किंवा विवक्षित गोष्टीला लागू पडत नाहींत, असें पाहून त्या गोष्टीचा विशेष प्रकारानें विचार करावा लागतो; ह्मणजे ते नियम कांहीं विवक्षित वर्गांतल्या गोष्टींसच लागू पडतात. हे तत्त्व लक्षांत न आल्या कारणानें, पुरुषांचें वर्तन पुष्कळ प्रसंगीं चुकीचें घडत असतें, अशा प्रकारची ही चूक पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या हातून क्वचित् घडते. तेव्हां व्यवहारात ज्या गुणांचा अत्यंत उपयोग होतो, अशांतला हा गुण नव्हे काय? व्यवहारांत कोणतीही एखादी गोष्ट करावयाची असली ह्मणजे, तिचा झटकन् निकाल करणें, या गोष्टीवर सर्वस्व अवलंबून असतें. केवळ तत्व-चिंतेची किंवा शास्त्र-विचाराची गोष्ट अशी नाहीं. शास्त्र-विचार जो असतो त्यांत कोणत्याच गोष्टीचा त्वरित निर्णय करण्याचें प्रयोजन नसतें. जो नुसता मीमांसक किंवा विचार करणारा मनुष्य आहे, त्यास थांबतां येतें. त्यास अवकाश विपुल असतो. जीं प्रमाणें

त्याच्यासमोर असतील, ती जर, एखादा सिद्धांत ठरविण्यास पुरेशी नसतील, तर अधिक प्रमाणे मिळविण्यास त्यास पाहिजे तेवढी फुरसत मिळण्यासारखी असते. आपली मीमांसा एकदम पूर्णतेस आणलीच पाहिजे, अशा प्रकारे तो बांधलेला नसतो. कारण, 'काय करावे बोवा, मी असे करीत बसलो तर, इकडे वेळ निघून जात आहे' अशांतला प्रकार त्याचा नसतो. आतां, हे खरे कीं, जो वेडावांकडा किंवा अपुरता पुरावा असेल, जीं अल्पस्वल्प प्रमाणे उपलब्ध असतील, त्यांपासून निघणारें किंवा काढितां येण्यासारखें जें उत्तम अनुमान, तें काढण्याची शक्ति असणें हा गुण, तत्त्व-विवेचनाच्या किंवा मीमांसेच्या कामी निरुपयोगी आहे, असें नाहीं. समोर असलेल्या गोष्टींशीं ज्या अनुमानाचा किंवा प्रक्रियेचा उत्तम मेळ बसतो, अशा प्रकारची एखादी तात्कालीन कल्पना किंवा उपपत्ति बसविणें ही गोष्ट, त्या विषयाची अधिक चौकशी करण्याला अथवा अधिक माहिती मिळविण्याला अवश्य साधनीभूत होते. तथापि, अशा या शक्तीचा किंवा गुणाचा उपयोग, तत्त्व-विवेचनाच्या कामी मुख्य नसून, केवळ साहाय्यभूत असतो. आणि तत्त्व-चिंतेच्या मुख्य कार्याला व गौण कार्याला, ह्मणजे केवळ साधनीभूत कामाला, अशा दोन्ही कार्यास, तत्त्व-चितकास पाहिजे तितका काळ मिळण्यासारखा असतो. त्याला जें काम करावयाचें असतें, तें फार जलदीने किंवा घाईने करण्याचें कारणच नसतें. उलट त्याला, धीरता व शांतता या गुणांचा फार उपयोग असून, ज्या प्रश्नाचा तो विचार करीत असेल, त्याच्यावर उत्कृष्ट प्रकारचा प्रकाश पडेपर्यंत व त्याच्या निव्वळ तर्कोला सिद्धांताची योग्यता येईपर्यंत, त्याला स्वस्थमानसानें काम करावे लागतें. परंतु ज्यांचें काम नित्य व्यवहाराचें असतें, ह्मणजे ज्यांना अल्प-कालीन व नश्वरसंबंधाच्या गोष्टींशी प्रसंग असतो, त्यांना

जाति-विशिष्ट विचार करावा लागत नसून, व्यक्ति विशिष्ट विचार करावा लागतो. अशा माणसांस, जो विचार ठरवावयाचा, तो लौकर ठरवावा लागतो. निर्णय करावयाचा तो त्वरित करणें, ही शक्ति, प्रत्यक्ष विचार करण्याची जी शक्ति, तिच्याच बरोबरीची व योग्यतेची आहे, असें ह्मटलें असतां चालेल. ज्याच्या विचाराच्या दोऱ्या त्याच्या हातांत नाहींत, त्याच्याकडून हुकमी काम होत नाहीं. ह्मणजे, ज्याच्या बुद्धीचा उपयोग प्रसंगास घडत नाहीं, त्याला ती असून नसून सारखीच. असा मनुष्य नुसती पोकळ टीका करीत बसण्यास मात्र योग्य असेल. परंतु प्रसंगास एखादें काम रेटून नेऊन पार पाडील, ही गोष्ट त्याच्या हातून घडणार नाहीं. हा जो गुण आहे, त्या गुणांत स्त्रिया, व प्रायः स्त्रीसदृश स्वभावाचे जे पुरुष असतात, ते या गुणांतच श्रेष्ठ असतात. ज्यांच्यात हा गुण नसतो, अशा जातीचे पुरुष, त्यांच्यांत जरी अन्य कांहीं अपूर्व गुण असले तरी, मनावरची जी हुकमत ह्मणून ह्मणतात, ती त्यांस फार हळूहळू प्राप्त होत जाते. ज्या गोष्टी त्यांना पक्क्या माहीत असतात, अशा गोष्टींमध्यें देखील निर्णयाची त्वरा, शहाणपणानें एखादें काम करण्याची दक्षता, हे गुण त्या माणसांत आले, तरी ते फार सावकाश व हळूहळू येत असतात. एवढेंच नव्हे, तर ते गुण प्राप्त करून घेण्यास, त्यांना मोठा दीर्घ प्रयत्न करावा लागतो.

११. आतां कदाचित् कोणी असें ह्मणेल कीं, गृह कृत्यांतले जे व्यवहार आहेत, त्या व्यवहाराखेरीज इतर व्यवहारांस, स्त्रिया जात्याच अपात्र आहेत. कारण स्त्रिया मनाच्या फार चंचल असतात. त्या चिरडखोर, तामसी व हट्टी असतात. ज्या घटकेला जी त्यांची लहर लागेल, त्या लहरीच्या अगदी अधीन होऊन त्या रहातात. सतत उद्योग, दृढ निश्चय, या गुणांचा त्यांच्याठायीं अभाव असतो. त्यांची बुद्धि

अस्थिर असून, त्यांच्या एकंदर मानसिक-शक्तीचे व्यापार अनिश्चित व विषम असतात. मोठमोठी कामें करण्यास स्त्रिया नालायक आहेत, म्हणून प्रतिपादन करितांना ज्या अडचणी दाखविण्यांत येतात, त्यांचा समावेश या दोषांत बहुतेक होतो. आतां हे जे दोष आहेत, त्यांचें मुख्य कारण पाहू जातां, स्त्रियांची ओतप्रोत भरून जाणारी जी मानसिक शक्ति असते, त्या मानसिक-शक्तीला योग्य वळण न मिळणें, हेंच दिसते. याशिवाय, या दोषांचा बराचसा प्रकार, काही जाणून बुजून घडतो, व कांहीं सहज घडतो. अंगांत येणे, भुताने झपाटणें, अशा प्रकारच्या ज्या व्याधि किंवा जे मेंदूचे दोष एकाकाळीं बायकांना जडत असत, ते कालवशात् नाहींतसे होत गेले. शिवाय उच्च वर्णाच्या स्त्रियांपैकीं बहुतेक स्त्रिया कोणच्या स्थितींत वाढतात व त्या कोणत्या स्थितींत असतात, हेंही लक्षांत आणिले पाहिजे.* त्यांना शुद्ध हवा मिळत नाहीं, त्यामुळे त्या निरामय रहात नसून, एखाद्या पिकुटलेल्या व खुंटलेल्या झाडासारख्या असतात. रुधिराभिसरणाला प्रोत्साहक होऊन, स्नायूंना दृढ करणारे असे व्यवसाय मुळींच त्या करीत नाहींत. त्यांच्या मेंदूची शक्ति, विशेषेकरून त्यांच्या मनोविकाराच्या संबधानें पाहिले असतां, फारच जागरूक ठेविलेली असते. त्यांचे मनोव्यापार फारच जारीनें चालू असतात. यास्तव अशांपैकीं ज्या स्त्रिया क्षयानें मरत नाहींत, त्यांचीं शरीरें व मनें अगदीं अशक्त राहून, साधारण बारीकसारीक कारणांनींही अशक्त होतात. त्यांना दीर्घ परिश्रम करवत नाहींत. कोणतेंही शारीरिक किंवा मानसिक काम करण्याची कुवत त्यांच्यामध्यें रहात नाहीं, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु ज्या स्त्रियांना आपल्या

*प्रस्तुत स्थळीं, 'इतर कोणत्याहि देशांपेक्षां, आमच्या ( इंग्लंड ) देशांतल्या उच्च वर्गांतल्या स्त्रियांची स्थिति कांहीं बरी आहे. ही गोष्ट मी नाकबूल करीत नाहीं' असें कसांत एक लहानसें वाक्य घालून निबंधकारांनीं म्हटलें आहे.

पोटाकरितां खपावें लागतें, त्यांच्या ठिकाणी असे हे दोष क्वचित् दृष्टीस पडतात. ज्या स्त्रियांस नेहमीं एकाच ठिकाणीं बसून काम करावें लागतें, व अगदी कोंदट आणि दमट अशा खोल्यांमधून काम करीत रहावें लागतें, त्यांची गोष्ट निराळी. लहानपणी ज्या स्त्रियांना आपल्या भावांबरोबरच आरोग्यकारक असें शारीर-शिक्षण मिळालें असून, ज्यांना बरीच मोकळीक मिळालेली असते, व ज्यांचे स्वैर व्यापार बरेच अनियंत्रित असतात, ज्यांना मोठेपणीं पाहिजे तितकी स्वच्छ हवा व लागेल तितका व्यायाम मिळत असतो, अशा स्त्रिया श्रमाची कामें करण्याला पात्र असून, त्या चंचल, तामसी, वगैरे दोषांनी भरलेल्या रहातात, असें घडत नाही. स्त्रियात काय आणि पुरुषांत काय, अशी कांहीं माणसें असतात कीं, ज्यांच्या मेंदूची क्षीणता किंवा मनाची दुर्बलता त्यांच्या एकंदर वर्तनावर फार मोठा परिणाम घडवून आणीत असते. अशा प्रकारची ही शरीराची रचना किंवा प्रकृति, वंशपरंपरेनें प्राप्त झालेली असते. आणखी, ती जशी मुलांना तशीच मुलींना—दोहोंनाही प्राप्त होते. ज्याला तामसी प्रकृति किंवा पित्त-प्रकृति असें ह्मणतात, ती प्रकृति स्त्रियांस त्यांच्या आईबापांपासून प्राप्त झालेली असते. आणि अशा प्रकृतीची संख्या पुरुषांपेक्षां स्त्रियांत अधिक सांपडते. ही [illegible] आपण धरून चालूं. आणि ही गोष्ट धरून चाललें तर, मी [illegible] विचारतों कीं, जी कामें व जे धंदे बहुतेक पुरुष करितात, ती कामें किंवा ते धंदे करण्यास अशा प्रकृतीचे पुरुष अयोग्य आहेत, असें ठरलें आहे काय? जर नाही, तर अशाच प्रकृतीच्या स्त्रिया मात्र तेवढ्या अयोग्य कां ठराव्या? ज्या माणसांच्या प्रकृति कांहीं विशेष प्रकारच्या असतात, अशी माणसें, कांहीं कामांस अगदी नालायक असतात. ह्मणजे त्या कामांत, त्यांस यश येण्याला त्यांची प्रकृति प्रतिबंधक होते. पण कांहीं कामांत तीच

प्रकृति त्यांच्या फार उपयोगी पडते, ही गोष्ट खरी आहे. परंतु जेव्हां कोणताही उद्योग त्या प्रकृतीस अनुकूल असेल, फार काय, कधीं कधीं जेव्हां प्रतिकूल असेल तेव्हांही, ज्यांची प्रकृति फारच तलख अशा लोकांस त्या धंद्यांत उत्कृष्ट प्रकारचे यश मिळाल्याचीं कांहीं प्रसिद्ध उदाहरणें वारंवार घडतात. ज्यांची प्रकृति शांत किंवा सत्त्वस्थ आहे, अशा माणसांपेक्षां तामसी प्रकृतीचीं माणसें ज्या व्यवसायांत गुंततात, त्यांत, एका प्रकारचा अधिक उत्साह दिसून येतो प्रसंगविशेषीं त्यांच्या प्रकृतीस एक प्रकारचें प्रोत्साहन मिळालें ह्मणजे त्यांच्या शक्तींत व इतर लोकांच्या शक्तींत फार अंतर दिसून येतें. अशीं माणसें कांहीं कांहीं प्रसंगीं एखादें काम इतक्या उत्साहानें करितात कीं, जीं कामें करणें इतर प्रसंगीं त्या माणसांस बहुतेक अशक्य असतें, तींच कामें समयविशेषीं तींच माणसें सहज करून जातात. अशा माणसांच्या प्रकृतीचा हा जो उत्तेजक व क्षोभक गुण, हा केवळ विद्युत्तेजाप्रमाणें, उत्पन्न झाल्याबरोबर नाहींसा व्हावा, मागें त्याचा कांहींएक मागमूस राहू नये, व कोणत्याही एका विषयाच्या ठिकाणीं, त्याच्या मनाला स्थिरता प्राप्त होऊंच नये, अशांतला प्रकार हा असतो असें नाहीं. तामस प्रकृतीचा धर्मच असा असतो कीं, एकदां त्यानें उचल खाल्ली, किंवा एकाद्या कामांत त्याची तंद्री लागून गेली, ह्मणजे त्या कामाच्या पूर्णतेकरितां किती व कसाही दीर्घ प्रयत्न करावा लागला, तरी तो करितो. ज्या गुणाला तेजस्विता किंवा व्यवहारांत ‘ पाणी ’ असें ह्मणतात, तोच गुण हा. आणि याच गुणामुळें पैजेकरतां तयार केलेले जातिवंत जे घोडे असतात ते, आपला वेग कमी न करितां, एकसारखे धांवत सुटतात. ते इतके कीं, शेवटीं थकून जाऊन धरणीवर मरून पडतात. परंतु आपलें सत्व-हरण करूं देत नाहींत. याच कारणामुळें नाजुक प्रकृतीच्या शेकडो स्त्रिया, अनेक मान-

मिक-दुःखें व शारीरिक-यातना सोसून, कसाही वेडावांकडा प्रसंग आला तरी, अत्यंत उदात्त अशा प्रकारचा दृढ निश्चय व मनाची स्थिरता प्रकट करतात. यावरून हे उघड दिसते की, अशा प्रकारच्या प्रकृतीची माणसें, मनुष्यांचे अग्रणीत्व अथवा पुढारीपणा स्वीकारण्यास अत्यंत योग्य असतात. अशा माणसांपैकी मोठमोठे वक्ते, मोठमोठे धर्मोपदेशक, व लोकांच्या मनावर, आपल्या वाणीने व उत्साहाने उत्कृष्ट प्रकारचा ठसा बठविणारे, अशा प्रकारचे नीतिप्रसारक निपजण्याचा संभव असतो. स्वतां, अशा प्रकृतीच्या माणसांत, राजकारणी पुरुषास किंवा न्यायाधीशास जे गुण लागतात, ते कमी असतील, असे कदाचित् कोणी समजतील. मी ह्मणतो, माणसाची प्रकृति नेहमीच क्षुब्ध स्थितींत रहाते, अशी जर गोष्ट असती, तर हे ह्मणणे शोभते. परंतु अशा प्रकृतीस योग्य वळण लागणे, हा शिक्षणाचा भाग आहे. ज्यांचे मनोविकार तीव्र असतात, ज्यांची प्रकृति जात्या तामसी व तेजस्वी असते, त्यांच्याकडून आत्म-संयमनही दृढ होते. ह्मणजे, आत्मनिग्रह करण्याच्या कामी ते बहाद्दर होतात. परंतु असें होण्यास त्यांना योग्य प्रकारचे वळण मिळावे लागते, हे मी ह्मटलेच आहे. ज्या साधनांनी इंद्रिय-निग्रह करितां येईल, त्या साधनांचें अवलंबन करावे लागते. आणि अशा प्रकारचे शिक्षण त्या प्रकृतीला मिळाले असतां ती माणसें केवळ मनाच्या झटक्याबरोबर, जे काय होईल तेवढेच करणारी निपजतात असें नाही. तर मनोजय व आत्म-संयमन यांच्या योगाने तीं माणसें आपलें शौर्य प्रकट करितात. अनुभव व इतिहास यांवरून असे सिद्ध झाले आहे की, ज्यांचे मनोविकार अत्यंत जाज्वल व तीव्र असे असतात, अशीं माणसें सत्व-रक्षणाच्या कामीही फार दक्ष असून, व्रत-भंग न होण्याविषयी व आपले कर्तव्य बजावण्याविषयी त्यांचा फार कटाक्ष असतो. पण हे केव्हां, तर जेव्हां

त्यांच्या त्या मनोविकारांस योग्य मार्गाकडे वळण लावावे तेव्हां. एकाद्या कामांत दोन पक्षांपैकी एका पक्षाकडे त्याचे अंतःकरण त्यास ओढीत असून, जो न्यायाधीश खरोखर न्यायच करितो, त्या न्यायाधीशास [illegible] व दृढ निश्चयामुळे आपली न्याय-बुद्धि दृढ करण्यास अधिक उत्तेजन मिळत जाऊन, अशा प्रकारचा हा मनोजय करण्याची त्याची शक्ति वृद्धिंगत होत जाते. मनुष्याचा रोजचा जो स्वभाव असतो तो एकीकडे राहून प्रसंगवशात् अत्यंत उदात्त व अपूर्व अशा प्रकारची त्याची उल्लसित-वृत्ति होत असते. त्या उल्लसित-वृत्तीचा परिणाम त्याच्या नित्याच्या वर्तनावरही घडतो. प्रसंगवशात् प्राप्त होणारी जी ही स्थिति, त्या स्थितीत तो असतां, त्याच्याठायी उत्पन्न होणारी महत्त्वाकांक्षा व कर्तृत्व-शक्ति यांचा त्याच्या मनावर विशेष ठसा उठून, इतर प्रसंगी होणारे जे त्याचे वर्तन व जे त्याचे विचार त्याच्याशी तो त्या स्थितीतील गोष्टींची तुलना करूं लागतो. यामुळे, प्रसंगविशेषीं जो उल्हास किंवा जो उत्साह त्यास प्राप्त होतो, त्याच्या अनुरोधानें आपलें वर्तन नेहमीं ठेवण्याची त्यास संवय लागते. अर्थात् हा उत्साह किंवा ही उल्लसित-वृत्ति, मानवी-प्राण्याच्या नश्वर-प्रकृतीचा किंवा शरीराचा विचार केला असतां, दीर्घकाल टिकणारी नसून, अल्पकालीन किंवा क्षणभंगुर असते, हें उघडच आहे. जसा व्यक्तिमात्रांचा त्याचप्रमाणें जातीचा ( ह्मणजे मोठ्याशा लोक-समूहाचा ) अनुभव पाहिला तरी, ज्यांची प्रकृति राजसी आहे, अशीं माणसे एकंदरीत पहातां, विचार करण्याच्या कामीं किंवा व्यवहाराच्या कामी, सात्विक माणसापेक्षां कमी लायक असतात, असे आढळत नाहीं. **ट्युटॉनिक** लोकांपेक्षां **फ्रेंच** लोक व **इटालियन्** लोक स्वभावानें निःसंशय अधिक चंचल व रजोगुणविशिष्ट असतात. निदान **इंग्लिश** लोकांची व त्यांची तुलना केली असतां, त्यांच्या नित्यक्रमांत व

एकंदर संसाराच्या उलाढालींत मनोविकारांचा पगडा त्यांच्यावर अधिक असतो. व रजोगुणाचा प्रभाव त्यांच्यामध्यें विशेष आढळतो. परंतु सार्वजनिक कामात, शास्त्र-प्रसाराच्या कामांत, युद्धाच्या कामांत, कायदेकानू व न्याय वगैरे हरएक कामांत ते कमी आहेत, असें कोण ह्मणेल? त्याचप्रमाणें, प्राचीन **ग्रीक** लोकही त्यांच्या हल्लींच्या वंशजां-प्रमाणेंच अत्यंत रजोगुणी किंवा क्षोभक प्रकृतीचे होते, असें मानण्यास पुष्कळ कारणें आहेत. माणसांच्या हातून घडण्यासारख्या अशा हरएक कामांत व प्रत्येक गोष्टींत त्यांनीं आपली दक्षता दाखविली, हें सांगणेंच नको. **यूरोपखंडां**तील दक्षिण प्रांतांत राहणाऱ्या **रोमन** लोकांचीही त्याचप्रमाणें मूळ-प्रकृति होती. परंतु, त्यांस मिळणारें जें राष्ट्रीय-शिक्षण, तें सौम्य प्रकारचें नसून, **स्पार्टन्** लोकांप्रमाणेंच कडक असे. त्यामुळें त्यांच्या स्वभावाची जी एक तऱ्हा झाली, ती उलट प्रकारची झाली. त्यांच्या स्वाभाविक मनोविकारांची तीव्रता, शिक्ष णाच्या योगानें पुढें जो त्यांचा स्वभाव बनला, त्याच्यामध्यें अधिकच दृष्टोत्पत्तीस आली. या उदाहरणांवरून ज्या लोकांमध्यें स्वभावतः च एक प्रकारचा तेजस्वितेचा गुण असतो, तीं माणसें कशी बनवितां येतात, हें उघड दिसतें. **ऐरिश केल्ट** लोकांचें उदाहरण या संबंधानें प्रथमदर्शनीं विच.रांत घेण्यासारखें दिसतें. ह्मणजे, त्यांस कोणत्याही प्रकारचें कृत्रिम-शिक्षण न मिळाल्या कारणानें त्यांच्या मूळच्या स्थितींत ते राहिले. यामुळें त्यांचें उदाहरण लक्षांत आणण्यासारखें आहे. परंतु मूळच्या स्थितींत ते राहिले, असें ह्मणतां येईल किंवा नाहीं, याचा संशयच आहे. कारण, कित्येक शतकें-पर्यंत त्यांजवर अंमल चालविणारें जें दुष्ट सरकार होतें, त्या जुलमी सरकारचा त्यांजवर प्रत्यक्ष रीतीनें घडणारा परिणाम व **क्यॉथलिक** पंथाच्या धर्मोपदेशकांपासून मिळणारें प्रत्यक्ष शिक्षण, व **क्यॉथलिक**

धर्मावर असणारी त्यांची पूर्ण श्रद्धा, या सर्व गोष्टींचा विचार केला असतां, **ऐरिश** लोकांचें उदाहरण फारसें अनुकूल आहे असें ह्मणतां येत नाहीं. तथापि, ज्या ज्या वेळीं एखाद्या व्यक्तीस विशेष अनुकूल गोष्टी प्राप्त होत गेल्या, त्या त्या वेळीं **ऐरिश** लोकांनीं अनेक गोष्टींमध्ये आपल्या बुद्धीची तीव्रता व श्रेष्ठता प्रकट केली. त्याची बरोबरी दुसऱ्या एखाद्या तरी राष्ट्रांतील लोकांनीं केली आहे काय? **फ्रेंच** लोकांची तुलना जर **इंग्रजां**शीं केली, **ऐरिश** लोकांची **स्विस्स** लोकांशीं केली, **ग्रीक** आणि **इटालियन्** लोकांची जर **जर्मन्** लोकांशीं केली, तर एकंदरीत पहातां, त्याच गोष्टी किंवा तींच कामें करण्यास उभयतांही सारखेच पात्र आहेत, असें आढळेल. मात्र कांहीं कामांत कांहीं माणसें विशेष प्रवीण असतात. असा हा भेद किंवा हें वैचित्र्य नेहमीं असणारच. परंतु आजपर्यंत स्त्रियांस मिळणारें शिक्षण, त्यांच्या मूळ प्रकृतीस चिकटलेली जी दुर्बलता, अथवा जे दुर्गुण, ते अधिक वाढविणारें आहे. ज्याच्या योगानें ती दुर्बलता किंवा ते दुर्गुण दूर होतील, अशा प्रकारचें शिक्षण जर त्यांस मिळालें, तर एकंदरींत पुरुषांच्या बरोबरीनें स्त्रिया हुशार होतील, व सर्व कामें पुरुषांच्या बरोबरीनें करूं शकतील, यांत मला तिळमात्र संशय वाटत नाहीं.

१२. तथापि, स्त्रियांचीं मनें पुरुषांपेक्षां स्वभावतः अधिक चंचल असतात, कोणत्याही कामांत एकसारखा दीर्घ प्रयत्न करणें, किंवा दृढ निश्चयानें तें काम तडीस नेणें, ही गोष्ट त्यांच्या हातून घडत नाहीं. कोणताही एकच मार्ग धरून, त्याच्या अगदीं शेवटास जाऊन पोंचण्यासारखी त्यांची बुद्धि स्थिर नसून अनेक गोष्टींमध्ये त्यांच्या बुद्धीचें सामर्थ्य वांटलें जातें, या गोष्टी खऱ्या आहेत, अशी कल्पना केली तरीं, प्रस्तुतकाळीं स्त्रिया जशा किंवा ज्या स्थितींत आहेत, त्या संबंधापुरत्याच या गोष्टी खऱ्या असतील. एवढेंच नव्हे, तर या ह्मणण्यास

अपवादक अशीही बरीच उदाहरणें आढळतील. अत्यन्त बुद्धिमान् असे जे पुरुष, त्यांची बरोबरी स्त्रियांच्यानें करवत नाही. त्याचें कारण, ज्या गोष्टीमध्ये मनाची एकाग्रता अवश्य आहे, जे विचार व जे व्यवसाय एकाच गोष्टींत केले पाहिजेत, अशा गोष्टीमध्ये आजपर्यंत स्त्रियांची मने सर्वथा व्यापृत झाली नाहींत, हेंच असेल. तथापि, हा भेद, प्रत्यक्ष त्या गुणाच्या संबंधाचा नसून, किंवा व्यवहारांत त्या गुणाची जी किंमत असते तिच्या संबधाचा नसून, त्या गुणाच्या जाती-पुरताच आहे. मनाची किंवा बुद्धीची शक्ति एकाच कामाकडे लागणें, समग्र विचार-शक्ति एकाच विषयांत निमग्न होऊन रहाणें, व एकाच कामांत तिचा विनिमय होणें, हेंच योग्य आहे, किंवा हितावह आहे, असें सिद्ध केलें पाहिजे. अशा या एकात्मकतेनें जर कांहीं विशेष हित होत असेल, तर त्याबरोबर संसारांतील इतर [illegible] ती बुद्धि असमर्थ होणें, हें एक नुकसानच आहे. माझें हें ठाम मत आहे कीं, तत्त्वविवेचनाच्या कामांतही एकाद्या कठीण प्रश्नाचा विचार करीत असता एकसारखें त्या प्रश्नास चिकटून राहण्याच्या ऐवजी बुद्धीला मधून मधून विश्रांति देऊन, व इतर विषयांकडे लावून, पुनः त्या प्रश्नावर येणें, हें अधिक श्रेयस्कर होतें. निदान व्यवहारांत तरी, अगदीं लहान गोष्टीपासून तों फार महत्त्वाच्या गोष्टीपर्यंत, एका विषयाचा विचार करीत असतां, तो सोडून व बुद्धीची तीव्रता कमी न होतां, दुसऱ्या विषयांत मन शिरकविण्याची जी शक्ति, ती अधिक मौल्यवान् आहे. आणि ही शक्ति स्त्रियांच्याठायीं ज्या चांगल्या गुणाचा आरोप करण्यात येतो, त्याच्याच योगानें अत्युत्कृष्ट प्रकारची असते. ही शक्ति स्त्रियांच्या अंगीं कदाचित् उपजतच येत असेल. परंतु शिक्षणाच्या व संस्काराच्या योगानें ही ती प्राप्त होते, ही गोष्ट खास आहे. कारण, स्त्रियांचे बहुतेक व्यवसाय, बहुधा बारीकसारीक अशा अनेक

गोष्टींची व्यवस्था करण्याच्या संबंधाचे असतात. त्यांपैकी प्रत्येक गोष्टीचा विचार करण्यास त्यांस खरोखर फारच थोडी संवय असते. कोणत्याही एका गोष्टीत अधिक विचार करण्याची गरज पडल्यास, तो विचार करण्याकरितां त्यांना, कसा तरी चोरूनमारून वेळ काढावा लागतो. कधीं कधीं असे कांहीं आणीबाणीचे प्रसग येतात व वस्तुस्थिति अशी कांहीं असते की, खरोखर तशा प्रसंगी कोणताही पुरुष, 'आपणास विचार करण्याची सवड नव्हती,' अशी सबब सांगून मोकळा होतो. त्या प्रसगीं एखाद्या विषयाचा विचार करण्यास, स्त्रियांस वेळ नसतांही, त्या विषयाचा त्या विचार करितात, अशीं हीं उदाहरणें अनेक वेळां पहाण्यांत आलीं आहेत. स्त्रीचे मन बारीकसारीक गोष्टींसंबंधानेच कां होईना, परतु नेहमी गुतलेले रहाते. ते शून्य असे कधींच रहात नाही. ससारामध्ये पुरुष आपले जे कांही कर्तव्य ह्मणून समजतो, त्यांत, जर तें गुतलेले नसल, तर तें अनेक वेळां शून्य रहाते. तसे स्त्रीचे रहात नाहीं. साधारणतः अनेक कामे तिच्याकडे असतात. यामुळे जसा हा विश्वाचा गोल फिरण्याचे कधी बद पडत नाही, तसेच तिचे कामही कधी बंद पडत नाही.

१३. परंतु कित्येक असा आक्षेप काढतात की, पुरुष व स्त्रिया यांची तुलना केली असतां बुद्धिसंबंधाने पुरुषांचे वर्चस्व आहे, अशा विषयी शारीरशास्त्राचें प्रमाण मिळतें. पुरुषांचा मेदु स्त्रीच्या मेंदूपेक्षां अधिक मोठा असतो. यावर एक तर माझें असें उत्तर आहे की, ही गोष्ट संशयात्मक आहे. स्त्रीचा मेदु पुरुषाच्या मेदूपेक्षां कमी असतो, ही गोष्ट अजून कोणत्याही तऱ्हेनें सिद्ध झाली नाहीं. स्त्रीचें शरीर आकारमानाने साधारणतः पुरुषाच्या शरीरापेक्षां कमी असते. एवढ्यावरूनच जर हा तर्क केला असेल तर अशा या

प्रतिपादनाच्या पद्धतीने कांही विलक्षणच अनुमाने निघतील. अशा पद्धतीने सिद्ध करूं गेल्यास, भला उंच आणि धिप्पाड असा मनुष्य एखाद्या लहान मनुष्यापेक्षां बुद्धिसामर्थ्याने कितीतरी श्रेष्ठ ठरेल! त्याप्रमाणे हत्ती व देवमासा हे दोन प्राणी तर, सर्व मनुष्यजातीपेक्षां बुद्धिमत्तेने फारच श्रेष्ठ मानावे लागतील! शरीर–शास्त्रवेत्ते तर असे ह्मणतात कीं, मनुष्यजातीमध्ये मेदूच्या आकारमानात शरीराच्या आकारमानापेक्षां अथवा मस्तकाच्याही आकारमानापेक्षां फारच थोडा भेद दृष्टीस पडतो.—त्यामुळे एकावरून दुसऱ्याचे प्रमाण मुळीच बसवितां येणार नाही.—कांही स्त्रियांचा मेंदु पुरुषांच्या मेंदू एवढा मोठा असतो हे निश्चित आहे. ही गोष्ट प्रत्यक्ष माझ्या माहितींतली आहे. एका गृहस्थाने पुष्कळ माणसांचे मेंदु वजन करून पाहिले होते. तो ह्मणाला कीं, आजपर्यंत जितके मेंदु मी तपासून पाहिले त्या सर्वात **कुव्हिएरच्या*** मेंदूपेक्षाही एका स्त्रीचाच मेंदु जास्त

---

* कुव्हिएर या नांवाचा एक प्रसिद्ध प्राणिशास्त्रवेत्ता फ्रान्स देशात होऊन गेला. तो होऊन गेल्यास ५० वर्षे झाली. त्याच्या मेंदूचें वजन चौसष्ट औंसावर ह्मणजे अदमासें १६० तोळे होते, असे ह्मणतात. पुरुषांच्या मेंदूचें साधारण वजन ( युरोपांतील लोकांत ) आदमासें ५० औंस असतें.

सुप्रसिद्ध सृष्टिशास्त्रवेत्ता आणि प्राणिविद्याशास्त्राचा पुरस्कर्ता कुव्हिएर यानें आपण मेल्यावर आपलें मस्तिष्क विद्वान् लोकांचे स्वाधीन करावें व त्यांणीं त्यावर परीक्षक मंडळी नेमून त्याची तपासणी करावी असें आपल मृत्युपत्रांत लिहिलें होतें. त्याप्रमाणें तो मेल्यावर त्याचें मस्तिष्क डाक्तर लोकांचे तान्यांत दिलें. त्याचें वजन ६४ औंस ह्मणजे पक्के दोन शेर भरलें. साधारण बुद्धीचे पुरुषाच्या मस्तिष्काचें वजन ४६ पासून ५३ औंसांपर्यंत असतें. त्याचप्रमाणें साधारण बुद्धीचे स्त्रीच्या मस्तिष्काचें वजन ४१ पासून ४७ औंसापर्यंत असतें. मनुष्यांच्या कमीजास्त बुद्धीप्रमाणे त्यांच्या मेंदूचें वजन कमीजास्त असतें. अतिशय बुद्धिमताच्या मेंदूचें वजन अतिशय जास्त असतें व अतिशय मदबुद्धीच्या मेंदूचें वजन अतिशय कमी असतें. मेंदु हा मनुष्याच्या बुद्धीचें मुख्य स्थान आहे. आमच्यामधील आज जे अत्यंत बुद्धिमान् व कल्पक लोक आहेत त्यांचें मस्तिष्क अतिशय वजनदार असले पाहिजे, हें उघड आहे.

भरला. यापूर्वी कुव्हिएरच्या मेदू एवढा दुसऱ्या कोणाचाही मेदु आढळला नव्हता. इतके दिवस कुव्हिएरचाच मेदु मोठ्यांत मोठा मानला होता. आणखी मला येथे असे ह्मणून ठेविले पाहिजे कीं, मेदु व बुद्धिसामर्थ्य या दोहोंमध्ये नक्की संबंध काय आहे, हे अजून पूर्णपणे समजले नाहीं. त्याविषयी वाद आहे. मेदु आणि बुद्धि या दोहांत फार निकट संबंध आहे, याविषयीं शंकाच नाहीं. वेदना ( भावना ) व विचार यांचे बाह्य ( जड ) इंद्रिय मेंदु होय, हें तर खचित. आता मेंदूच्या निरनिराळया भागांचा व निरनिराळ्या मानसिक शक्तींचा परस्पर संबंध काय आहे, हा जो वादग्रस्त विषय आहे, तो आपण क्षणभर एकीकडे ठेवूं. मी एवढे कबूल करतों की, इंद्रियाचा आकार व त्याची कार्ये यांचा परस्पर संबंध काही नाहीं, असे ह्मणणे; किंवा साधनाचे आकारमान मोठे असून त्याच्यापासून जास्त शक्ति प्राप्त होत नाही असें ह्मणणे; ह्मणजे इंद्रियरचनेचे व प्राणिशास्त्राचे जे सर्व-साधारण नियम, त्या नियमांत विसंगतता व अपवाद आहेत, असे ह्मणण्यासारखे होईल. परंतु इंद्रियाच्या केवळ आकारमानावरच त्याची ( इंद्रियाची ) शक्ति अवलंबून आहे, असें ह्मणणेही योग्य होणार नाही. सृष्टिमध्ये जी सूक्ष्म कार्ये घडतात त्यांत प्राणिकोटींतील कार्ये विशेष सूक्ष्म असतात. आणि त्यांतही विशेषेकरून प्राण्यांच्या ज्ञानतंतूमुळे घडणारीं कार्ये तर अत्यंत सूक्ष्म असतात. त्या कार्यांच्या परिणामांमध्ये दिसणारे भेद, हे बाह्येंद्रियाच्या आकारावर जितके अवलंबून असतात तितकेच त्या इंद्रियाच्या रचनेवर अवलंबून असतात. साधनाची योग्यता ठरविणें ती त्या साधनाने घडणाऱ्या कार्याच्या सूक्ष्मतेवरून व नाजूकपणावरून ठरविली पाहिजे. हें जर खरे आहे तर, पुरुषांपेक्षां स्त्रियांचा मेदु, ह्मणजे त्यांतील ज्ञानतंतूंचा व्यूह एकंदरींत जास्त सूक्ष्म आहे, असे स्पष्ट दिसतें.

गुणसंबंधीं भेदाचा खरेखोटेपणा अनुभवास आणून देणे हें काम मोठें कठीण आहे. तेव्हां तें एकीकडेस ठेवूं. इंद्रियांची शक्ति केवळ आकारमानावरच नव्हे तर त्याच्या चपलतेवरही अवलंबून असते. आणि त्या इंद्रियांतून रक्ताचे अभिसरण ज्या वेगाने होतें त्या वेगावरून त्याच्या चचलतेचे स्थूल परिमाण आपणांस काढितां येतें. कारण, इंद्रियास वेग देणारी व पुनःपूर्वींच्या स्थितींत आणून पोचविणारी, अशा ज्या दोन शक्ति, त्या मुख्यत्वेंकरून रुधिराभिसरणावर अवलंबून असतात. केवळ मेंदूच्या आकारमानाकडे पाहतां पुरुषांकडे श्रेष्ठत्व येते. परंतु मेंदूतील रुधिराभिसरण पाहतां त्यांतील चपलतेसंबंधाने स्त्रियांकडे वर्चस्व येतें, असे दिसून आले तर त्यांत आश्चर्य वाटण्याजोगे कांही नाही. कारण, स्त्रिया व पुरुष यांच्या मानसिक क्रियासंबंधाचे जे जे भेद आजपर्यंत दृष्टीस पडले आहेत, त्यांचा व वरील गोष्टीचा चांगला मेळ बसतो. दोन शरीरांच्या तुलनेपासून शरीररचनेंतील भेद आपणांस कळून जे अनुमान निघते त्यापासून अमुक परिणाम घडावे असें जे आपणांस वाटत असतें, त्या परिणामांचा मेळ प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या कांही गोष्टींशीं बसला पाहिजे. तो असा. प्रथमतः पुरुषांच्या मानसिकक्रिया, स्त्रियांच्या मानसिक क्रियांपेक्षां मंदगतीने चालल्या पाहिजेत. दुसरे असें की, विचारक्रिया स्त्रियांमध्ये जितक्या लौकर होतात, किंवा सुखदुःखाचे ज्ञान जितके स्त्रियांस होते, तितके पुरुषांस होऊं नये.

पदार्थ जितका मोठा असेल त्या मानाने त्यास वेग येण्यास जास्त वेळ लागतो. त्याचप्रमाणें, एकदां कामाची गुरुवात झाली ह्मणजे पुरुषाचा मेंदु जास्त जास्त काम करील. ज्या दिशेनें तो निघाला असेल, त्याच दिशेकडे जाण्याचा आपला क्रम कायम राखील. एक काम टाकून तावडतोब दुसऱ्या कामास लागण्याला त्याला अधिक अडचण पडेल, हें खरें. परंतु हातीं घेतलेले काम, लवकर न थकतां,

पुरुष पुष्कळ वेळ पर्यंत रेटील. ज्या ज्या कामांत स्त्रियांपेक्षां पुरुषांची श्रेष्ठता दिसून येते, तीं तीं कामें अशीं असतात की, त्यांस सतत यत्न व दीर्घ परिश्रम लागतात. स्त्रियांकडून चांगली होणारीं कामे, त्वरित होतात, असें आपणांस आढळून येत नाहीं काय? स्त्रियांचा मेंदु लवकर थकतो व अगदीं थकूनही लवकर जातो. परंतु जितका लवकर थकतो त्या मानानेंच तो पूर्व स्थितीवरही लवकर येतो, असें अनुमान काढतां येईल. तथापि, पुनः पुनः मी असें निक्षून सांगतो की, ही विचारसरणी, ज्या गोष्टीचा निश्चय अजून झाला नाही, अशा गोष्टीवर अवलंबून आहे. अमुक दिशेने विचार करावा एवढेच त्यासरणीपासून घ्यावयाचे आहे. यापेक्षां अधिक महत्त्व तिला देतां येत नाही. हे मी पूर्वी ह्मणून ठेवलेंच आहे की, साधारण स्त्रिया व पुरुष यांच्या बुद्धि-सामर्थ्यांत अथवा प्रवृत्तींत कांहीं नैसर्गिक भेद आहेत ही कल्पनाच मुळी मला मान्य नाही. मग ते भेद कोणचे आहेत याविषयी विचारच नको. मनुष्याचा वर्तन–क्रम कशा तऱ्हेनें बनतो यासबंधी मानसशास्त्राच्या नियमाचा अभ्यास जोपर्यंत लोक वरून वरूनही करू लागले नाहींत, किंवा प्रस्तुत गोष्टीसबंधानें शास्त्रीय रीत्या ते नियम लाऊन पाहिले नाहींत तोपर्यंत, वरील गोष्टी नीट तऱ्हेनें समजणें, हे शक्य नाहीं. त्याचप्रमाणे जिज्ञासु लोक व पंडित जोपर्यंत निरनिराळ्या व्यक्तीच्या वर्तनक्रमांतील भेदांची सहजगत्या दृष्टीस पडणारी कारणेही लक्षांत आणीत नाहींत, व सभ्यांचे सृष्टिशास्त्रवेत्ते व मानसशास्त्रवेत्ते त्या कारणांस तुच्छ मानून त्यांची सर्वथा उपेक्षा करितात, तोंपर्यंत वरील गोष्टींचे ज्ञान होण्याचा संभव नाहीं. हे लोक निरनिराळ्या व्यक्तींमध्ये शारीरिक भेद काय आहेत, याचा शोध लावण्यांत गुंतले असोत; किंवा मानसिक भेद काय आहेत, याचा शोध लावण्यात गढले असोत. एक गोष्ट सदैव त्यांच्या ठिकाणीं दृष्टीस

पडते. ती गोष्ट ही की, समाजाशी व्यक्तीचे निरनिराळे संबध असतात, त्या संबंधांवरून जे पंडित व्यक्तिव्यक्तीच्या वर्तनक्रमातील भेदाचा कार्यकारणभाव दाखवू लागतात, त्या लोकास सदैव हाणून पाडण्याचा यत्न करितात.

१४. स्त्रीस्वभावाच्या संबधाने ज्या समजुती आढळतात त्या फारच उपहासास्पद असतात. त्या समजुती ह्मणजे सरासरी टोकळ मानाने कांही तरी दडपून दिलेली अनुमाने. त्यांत योग्य प्रकारचें कांहीएक विवेचन केलेले नसून ते तर्कशास्त्राच्या नियमानुसार ठरलेले सिद्धान्त आहेत, असे मुळीच मानितां येत नाही. प्रथमदर्शनी जी उदाहरणे डोळ्यांसमोर आली असतील, त्यांवरून एकदम कांही तरी अनुमाने टोकून दिलेली असतात. स्त्रियांचा स्वभाव ह्मणजे अमुक, अशी जी लौकिक कल्पना असते, ती भिन्नभिन्न देशांत भिन्नभिन्न प्रकारची आढळते. आणि ती ती कल्पना, त्या त्या देशांत राहणाऱ्या स्त्रियांवर तेथील लोकमत व देशस्थिति यांचा जसा न्यूनाधिक किंवा बरावाईट परिणाम घडला असेल, त्याच्या अनुरोधाने झालेली असते. पूर्वात्य मनुष्यांस वाटते, स्त्रिया जात्याच विशेष विषयासक्त असतात. हिंदु लोकांच्या ग्रथांत अशा या समजुतीने स्त्रियांची किती निंदा व निर्भर्त्सना केलेली आढळते ती पहा. इंग्रेज लोकांनां प्रायः असे वाटत असते की, स्त्रिया स्वभावतः मंद व मठ्ठ असतात. स्त्रियांच्या चचलतेच्या संबंधाच्या जितक्या ह्मणी आढळतात, त्यांपैकी बहुतेक फ्रेंच ह्मणीपासून आलेल्या आहेत. इंग्लंड देशामध्ये 'स्त्रिया पुरुषांपेक्षां किती तरी अस्थिर मनाच्या असतात,' असे लोकास ह्मणतांना आपण पुष्कळ वेळां ऐकतो. स्त्रियांच्या ठिकाणी चांचल्य ह्मणजे मोठा दोष होय, अशी इंग्लंड देशांतील लोकांची फार दिवसांपासून समजूत आहे. अशी ही समजूत फ्रान्स देशांत फार दिवस टिकली नाही. दुसरे

असे आहे की, इंग्लंड देशांतील स्त्रि
त्याच विशेष पगडा असतो. कदाचि
स्त्रियासच नव्हे तर पुरुषांनाही किंबहु
भाविक अशा गोष्टी कोणत
इंग्रेज मनुष्यांनी करूं नये.
त्यांनी घेतला तर त्यांची स्
आहे. 'इंग्लंडदेशांतील अनुभ
स्वभावाची जी सहजावस्था किंवा
येथे उरला नाही. असा देश इंग्लं
अर्थाने ह्मणा, किंवा वाईट अर्थाने ह्मण.
काळच्या दुसऱ्या कोणत्याही लोकांपेक्ष
टाकून फार दूर गेले आहेत. इतर के
व शिक्षण याचा परिणाम इंग्रेज लोकांव
देशांत सामाजिक शिक्षणाला बरेंच यश
जातां इंग्लंड होय. जी जी गोष्ट लोकर
नुस्ती दाबून टाकावयाची, असा प्रकार इं
ह्याप्रमाणे किंवा नियमाप्रमाणे वागणें—ए
धर्मही तदनुसार वळविणें, हा प्रकार इतर
अधिक आढळतो. इतर देशांत शिकवि
ज्ञाने ठरविलेल्या गोष्टींचा पगडा व्यक्तिमात्राच
असला तरी, त्याच्या खालीं दडपून गेलेला जो
तो नेहमीं स्पष्ट दृष्टीस पडतो. एवढेंच नव्हे, त
आपल्यावर पडलेला दाब उचलून फेकून देण्याचा
असेही कधीं कधीं आढळतें. अशा ठिकाणीं मूळच
ढीने कितीही आक्रांत करून टाकिला असला, तरी तो

ढीने मूळस्वभावास स्थानभ्रष्ट करून
आहे. संसारांतील बहुतेक वागणूक
सते. ज्याच्या त्याच्या प्रवृत्त्यनुसार
तेथें मुळीच कांहीं राहिली
प्रवृत्ति झाली आहे आतां
आहे हे खरें. तथापि, दुसऱ्या
घातक होय. निदान केवळ
ाचे मूळचे धर्म काय आहेत, या
इंग्लंडांतील मनुष्य विशेषतः अपात्र
या विषयाच्या संबधानें अन्य देशां-
ाकडून ज्या चुका घडतात त्या दुसऱ्याच
-स्वभावाच्या संबंधाने इंग्लिश मनुष्य
मनुष्याचे ग्रह चुकीचे असतात. इंग्लिश
या असतात. फ्रेंच मनुष्याच्या अस्ति-
ज्या गोष्टी त्याने पाहिलेल्या नसतात त्या
, असे इंग्लिश मनुष्यास वाटत असते.
हिलेल्या असतात त्या सर्वत्र व सदैव अस-
वाटते. इंग्लिश मनुष्यास स्वभाव किंवा
कारण, तो पहण्याचा प्रसंगच त्यास
फ्रेंच मनुष्याला त्याची माहिती पुष्कळ असते.
अनेक प्रसंगी प्रमाद घडतात. कारण, त्याने
ेला असतो तो अशुद्ध स्थितींतला व विकृत
लेला असतो. ज्या व्यक्तींचा विचार कर्तव्य आहे,
जाच्या अथवा लोकमतच्यायोगाने जी कृत्रिमअ-
कृतस्वरूप प्राप्त होतें, त्यच्यामुळे त्याच्या नैसर्गिक

प्रवृत्ति छपल्या जातात. त्या छपण्याचे दोन प्रकार आहेत. ... तर मूळचा स्वभावच नष्टप्राय होतो. किंवा दुसरा प्रकार असा होतो कीं, त्याचें स्वरूपांतर होते.

यांपैकीं जेव्हां पहिला प्रकार होतो, त्या वेळी स्वभावांचा जो सुकून वाळून गेलेला भाग तो शिल्लक राहिलेला असतो. जेव्हां दुसरा प्रकार होतो, तेव्हां स्वभावाचा बराच भाग कायम राहिलेला अस... परंतु तो यदृच्छेने ज्या दिशेने वाढत जावा तसा वाढत गेलेला नसून भलत्याच एखाद्या दिशेनें वाढत गेलेला असतो.

१५. मीं हे पूर्वीं ह्मणून सोडलेंच आहे कीं, स्त्रिया व पुरुष यांजमधील प्रस्तुत उपलब्ध होणाऱ्या मानसिक भेदांपैकी किती भाग नैसर्गिक अथवा स्वाभाविक आहे व किती कृत्रिम आहे, हे समजणे अशक्य आहे. किंबहुना 'स्वाभाविक' ह्मणतां येतील असे भेद मुळीच कांही आहेत किंवा नाहीत, आणि असल्यास त्या भेदांचीं जी कृत्रिम कारणे आहेत तीं कारणें दूर केलीं असतां स्वाभाविक ह्मणण्यासारखे भेद कोणते हें कळण्याचा मुळीच संभव नाहीं. जी गोष्ट मी अशक्य व असंभाव्य आहे असं ह्मणून सोडली आहे, ती करण्याविषयी यत्न करण्याच्या भरीस मी पडत नाही. परंतु एखाद्या गोष्टीविषयीं शंका उत्पन्न झाली तरी तेवढ्याने तिच्या तर्क करण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं ... निश्चयात्मक कळेलच असें अ... होण्याचा ... आहे

यशप्राप्ति होईल त्याच मार्गाने जाण्याचा मी यत्न करितों. तो मार्ग कोणचा ह्मणाल तर सांगतो. बाह्य उपाधीचे जे परिणाम मनावर होतात त्यांची उपपत्ति करणें, ह्मणजे ते शोधून काढणें. मनुष्यप्राणी असा आहे की, त्याच्यासंबंधानें आपणास अन्वयव्यतिरेकाचा उपयोग करितां येत नाहीं. मनुष्याला त्याच्या बाह्य उपाधीपासून निराळा करून, प्रत्यक्ष प्रयोगानें त्याचा मूळ स्वभाव काय आहे तो ठरवितां येणार नाहीं. तथापि, वर्तमानकाळीं तो कसा आहे व आजपर्यंत त्याच्या मागे कोणच्या उपाधी होत्या व त्या उपाधीपासून, ज्या अवस्थेत मनुष्यप्राणी आज आपण पहातो त्या अवस्थेतला मनुष्यप्राणी निपजणे संभवते किंवा नाहीं, या गोष्टीचा आपणांस निर्णय करितां येईल.

१६. तेव्हां आतां केवळ शरीरबलाचा विचार क्षणभर एकीकडे ठेऊन, पुरुषाहून स्त्रियांचा कमीपणा ज्या एका विशेष गोष्टींत नेहमीं आपणांस भासतो त्या गोष्टीचा प्रथम विचार करूं. तत्त्वज्ञान, शास्त्र किंवा कला अशा विषयांवर उत्तम व सर्वमान्य असा ग्रंथ आजपर्यंत एकाही स्त्रीच्या हातून झाला नाहीं. असें कां? या प्रश्नाचें समाधान स्त्रिया जात्याच अशा प्रकारचे ग्रंथ निर्माण करण्याविषयीं असमर्थ आहेत, असें मानण्याशिवाय दुसऱ्या कांहीं मार्गानें करितां येईल किंवा नाहीं, हें पाहिलें पाहिजे.

...निवारितो की, या संबंधाने कांहीं
...नभव आपणांस आला
ठळक ठळक ...तु
...अ...
...

पासून निघाल्या नाहीत. त्याचप्रमाणें, ज्यांच्या योगानें एखाद्या विवक्षित कलेसंबंधीं अदृष्टपूर्व अशा अगण्य परिणामांचा प्रांत दृष्टिगोचर होतो, व एखादें नवीन दर्शन ( प्रक्रिया अथवा प्रमेय ) स्थापित होतें, अशा अगदीं नवीन कल्पनाही अद्यापि स्त्रियांच्या मस्तकांतून बाहेर पडल्या नाहींत. स्त्रियांचे जे ग्रंथ आहेत त्यांची जुळणी बहुधा जे विचार जगांत चालू असतात, त्यांस अनुसरूनच केलेली असते. त्यांच्या कृति, (ग्रंथ) चालू काळांत आढळणारे जे नमुने किंवा जे ठसे, त्यांस फारशा सोडून केलेल्या नसतात. स्त्रियांच्या ग्रंथांतून स्पष्ट दिसणारा जो मुख्य दोष किंवा कमीपणा तो हाच. कारण, याशिवाय इतर गोष्टी ध्यानांत आणल्या तर, एकंदर ग्रंथरचनेचें काम, विचारसरणी, भाषासौंदर्य, योजना चातुर्य, वगैरे गोष्टींत स्त्रियांचा मुळींच कमीपणा दिसत नाहीं. ग्रंथ रचनेंचें कौशल्य व भिन्न भिन्न भागांचा सुव्यवस्थितपणा, या दोन गुणांच्यासंबंधानें पहातां, आमचे उत्कृष्ट कादंबरीकार बहुतेक स्त्रीवर्गांतीलच आहेत. आधुनिक ग्रंथसंग्रह पाहू जातां, त्यांत **म्याडम् डि स्टॉल** या बाईच्या ग्रंथासारखे निरनिराळे विचार दाखविणारे असे कोणतेही साधन अन्यत्र आढळत नाहीं. त्याचप्रमाणें कादंबऱ्या लिहिण्याचें अलौकिक चातुर्य **म्याडम् स्यान्ड** या बाईच्या गद्य ग्रंथांत इतकें आहे कीं, तिचे ग्रंथ वाचित असतां **हेडिन** किंवा **मोझार्ट** या प्रसिद्ध संगीताचार्यांच्या मधुर ताना ऐकत असल्याप्रमाणें आनंद होतो व वृत्ति तल्लीन होतात. मी ह्मटलेंच आहे कीं, अचाट कल्पना किंवा अगदीं नवे असे विचार काढणें, या गोष्टीचीच काय ती मुख्य उणीव स्त्रियांत आहे. आतां ही जी उणीव आहे, तिच्या कारणांची कांहीं प्रकारें उपपत्ति लावितां येईल कीं नाहीं, हे आपण पाहूं.

१९. प्रथमतः ही गोष्ट आपल्या स्मरणांत ठेविली पाहिजे कीं, जग निर्माण झाल्यानंतर जो काल शिक्षणाच्या प्रसारांत किंवा

उत्कर्षात गेला; व ज्या कालांत केवळ बुद्धीच्या जोराने, पूर्वीचे अध्ययन आणि पूर्वार्जित ज्ञानाची पुंजी ही दोन्हीही साधने नसतां मोठमोठी तत्त्वे ( ज्यांपासून पुढे अनेक विचार सुचतात अशी ) माणसांनी शोधून काढिली; अशा काली तत्त्व-मीमांसेच्या कामांत स्त्रियांनी मुळीच आपलें मन घातले नाही. **हिपेशिया*** ज्या काळात होऊन गेली, तेव्हांपासून युरोपांत **रेफर्मेशन्** ( धर्म-क्रांति ) होईपर्यंत, तत्त्व-मीमांसेसारखे काम ज्या स्त्रीचे हातून होण्यासारखे होते, अशी स्त्री काय ती एक **हिलॉइझा** या नांवाची होऊन गेली. परंतु याही अलौकिक बुद्धीच्या स्त्रीचे विचार करण्याचे किती तरी सामर्थ्य, तिजवर आलेली जी संकटे किंवा जे दुर्धर प्रसंग त्यांच्यामुळे जगास नाहीं सारखे झालें, हे कोणाच्यानें सांगवेल? पुष्कळशा स्त्रिया गंभीर विषयांवर विचार करण्यास लागल्यापासून अगदी नवीन विचार सुचणे हे काम सोपे नाहीं. निव्वळ मानसिक शक्तीच्या जोरावर जे विचार सहजगत्या सुचण्यासारखे असतात, असे विचार केव्हांच जगांत येऊन गेले आहेत! आणि 'विचारांची अभिनवता' या शब्दांचा जर खरा अर्थ घेतला तर ती ( अभिनवता ) सुशिक्षणाने व विद्वत्तेनें परिपूर्ण व पूर्वींच्या विद्वान् लोकाच्या विचारांचें ज्यांनी चागल्या प्रकारें परिशीलन केलें आहे, अशा लोकांस प्राप्त होतें. इतरांस होत नाही. मला वाटते, प्रस्तुत काळासंबंधाने लिहितांना **मॉरिस्** साहेबाने असें ह्मटलें आहे की, सध्यांचे नवीन विचार काढणारे तत्त्ववेत्ते कोण? तर ज्यांस पूर्वकालीन विद्वानांच्या विचारांचें परिपूर्ण ज्ञान आहे ते. आणि, यापुढेही खरोखर नेहमी अशीच स्थिति असणार. ज्ञानाच्या इमारतीचें काम सध्यां जितकें उभारलें आहे, त्याच्यापेक्षां ते

---

* ही स्त्री **अलेकझांड्रिया** येथील राहणारी असून, गणितशास्त्र व तत्त्वज्ञान या दोन शास्त्रांत निपुण होती ती अदमासें १६०० वर्षापूर्वी होऊन गेली.

आपल्या हातून अधिक उंच करावे, अशी महत्त्वाकांक्षा ज्याच्या मनांत असेल, त्याला एक दगड वर अधिक ठेवायचा ह्मटला ह्मणजे, तो इतरांनी रचलेल्या दगडांवर ठेवावयाचा असल्यामुळे, स्वतां वर जाण्याचे व सामानसुमानही नेण्याचे किती तरी कष्ट पडतील? इतकी खटपट ज्यांनी केली आहे अशा स्त्रिया हल्लीं किती सापडतील? आजकालच्या स्त्रियांत गणित शास्त्रासंबधीं एखादा मोठासा शोध लावण्यास जितके गणिताचे ज्ञान पाहिजे तितके ज्ञान जिला आहे, अशी एक कदाचित् **मिसेस समरव्हिल्** ही बाई आहे. या बाईच्या आयुष्यात गणितशास्त्राचे पाऊल पुढे पडण्यास जीं दोन माणसे कारणीभूत झालीं, त्यात या बाईचे नांव नसले ह्मणून तेवढ्यावरून स्त्रियांचा कमीपणा सिद्ध होतो काय? अर्थशास्त्राला शास्त्रपणा आल्यापासून त्या विषयावर उपयुक्त लेख लिहिण्यापुरते अर्थशास्त्राचे ज्ञान ज्यांस आहे अशा आजवर दोन स्त्रिया आढळल्या. तेवढ्याच काळावधींत व त्याच विषयावर, ज्या असंख्य पुरुषांनी लेख लिहिले त्यांचेविषयीं यापेक्षा अधिक ते काय ह्मणता येणार आहे? कोणी असे ह्मणेल कीं आजपर्यंत, एखादी स्त्री मोठी इतिहासकर्त्री होऊन गेली नाही. गोष्ट खरी. पण मी असे विचारतो कीं, इतिहास लिहिण्यास विद्येची व ज्ञानाची जी सामग्री पाहिजे, ती कोणत्या स्त्रीला प्राप्त झाली आहे बरे? त्याचप्रमाणे, फार मोठी भाषाशास्त्रवेत्ती अशी स्त्री आजकाल नाहीं खरी. पण, **स्लाव्हॉनिक्**, **संस्कृत**, **गॉथिक**, व ज्या भाषेत **झंदावेस्ता** हा ग्रंथ लिहिला आहे ती **फारशी** भाषा, इत्यदि भाषांचे अध्ययन कोणत्या स्त्रीने केले आहे बरे? साधारण व्यवहारातल्या गोष्टींमध्येही ज्या बुद्धीला शिक्षण संस्कार घडला नाहीं, तिच्यांत नवेपणा कितपत असतो, हे आपणांस ठाऊकच आहे. नवेपणा ह्मणजे बहुधा त्याचा अर्थ इतकाच असतो कीं, पुष्कळशा शोधक माणसांनीं एका मागून एक ज्या युक्त्या काढल्या असतील, किंवा

शोध केले असतील, त्याच युक्त्या किंवा तेच शोध मूलतत्त्वांच्या स्वरूपानें पुनः काढणें. खरोखर एखादा नवीन शोध लावणें किंवा नवीन तत्त्व शोधून काढणें, या कामास जितकी तयारी पुरुषांस करावी लागते, तितकी तयारी स्त्रिया करतील, तेव्हा मग स्त्रियांमध्येही ही शक्ति किंवा हा गुण आहे किंवा नाही, तें ठरविण्याचा काल येईल. आणि तोंपर्यंत, या संबंधानें कांहीं एक ह्मणतां येणार नाहीं.

२०. आतां असें मात्र कधीं कधीं निःसंशय घडत असतें कीं, कोणत्याही एका विषयावर दुसऱ्या माणसांचे काय विचार आहेत, ते सविस्तर व अगदीं बरोबर रीतीनें समजून घेतल्याशिवायच एखाद्या माणसास एखादी फारच सुरेख कल्पना सुचते. हें फल त्या माणसास सृष्टीनें दैववशात् दिलेली जी कुशाग्र बुद्धि, किंवा ज्यास उपजत शहाणपणा ह्मणतात, त्याचें होय. आणि अशा माणसानें सुचविलेली कल्पना यद्यपि त्यास सिद्ध करून दाखवितां आली नाहीं, तरी तिचें चीज करून दाखविणारा व तिला परिपक्वतेस आणणारा जर कोणी निघाला तर तीच कल्पना ज्ञानभांडारात मोठ्या महत्वाची भर पडण्यास कारणीभूत होते. परंतु, कल्पना चांगली असली तरी ज्यानें पुष्कळ अध्ययन केलें आहे असा एखादा मनुष्य तिला हातांत घेउन, तिला कसोटीला लावून, तिला शास्त्रीय किंवा व्यावहारिक स्वरूप देईल तोंपर्यंत व शास्त्रसंबंधीं किंवा तत्त्वज्ञानासंबंधी जीं प्रमेयें त्या कालीं माहित झालेलीं असतील, त्यांत तिला योग्य स्थल पाहून तिची स्थापना करील तोंपर्यंत ती तशीच पडून राहते. तिचें चीज होत नाहीं. आणि अशा सुरेख कल्पना, व असे सुंदर विचार स्त्रियांच्या डोक्यांत उत्पन्नच होत नाहींत, असें लोक समजतात की काय? छे! प्रत्येक बुद्धिमान् स्त्रीच्या मनांत असे शेकडों विचार येतात व अशा शेकडों कल्पना सुचतात. परंतु काय उपयोग? त्या कल्पनांची व

त्या विचारांची खरी किंमत जाणणारा ज्याचा अधिकार आहे व ते विचार जगापुढे आणण्यापुरतें बुद्धिसामर्थ्य ज्यास आहे, असा एखादा नवरा किंवा मित्र त्या स्त्रीला न मिळाल्याकारणानें ते सर्व विचार व त्या सर्व कल्पना नष्टप्राय होतात. आणि कदाचित् जर ते विचार जगापुढे आलेच तर ते त्या नवऱ्याचे किंवा मित्राचे ह्मणून येतात. ज्या माणसापासून त्या विचारांची खरोखर उत्पत्ति होते, त्याचें नांव गुप्तच राहतें. पुरुषवर्गांतील ग्रंथकारांनीं प्रसिद्ध केलेले जे अगदीं नवे ह्मणून मानलेले विचार, त्यांपैकीं स्त्रियांनीं सुचविलेले व त्या ग्रंथकारांनीं निश्चित करून नीट तऱ्हेनें केवळ त्यांची जुळणी केली, असे विचार किती असतील, हें कोणी सांगावें? मी आपल्या स्वतःच्या अनुभवावरून पाहूं लागलों तर, खरोखर असे पुष्कळ विचार स्त्रियांच्या डोक्यांतून निघत असावे, असें मला वाटतें.

२१. केवळ तत्त्वज्ञानाची गोष्ट एकीकडे ठेविली, व सामान्य ग्रंथरचनेचा आणि ललितकलांचा विचार केला तरी, स्त्रियांचे ग्रंथ, त्यांतील सर्वसाधारण कल्पना व त्यांतील मुख्य मुख्य अंगें पाहिलीं तर, ते ग्रंथ पुरुषांचें अनुकरण करून केलेले असतात, असें आढळतें. पण असें असण्याचें एक अगदीं उघड कारण आहे. विद्वान् लोकांनीं असें अनेक प्रसंगीं ह्मटलें आहे कीं, **रोमन** लोकांचा ग्रंथसंग्रह नवीन नसून त्यांत **ग्रीक** लोकांचेंच अनुकरण आहे. असें कां? तर **ग्रीक** लोक **रोमन** लोकांपूर्वी झाले ह्मणून. ज्या देशांत पुरुष राहतात, त्या देशांत न राहतां अगदीं भिन्न देशांत जर स्त्रिया राहत्या व पुरुषांचे ग्रंथांपैकीं एकही ग्रंथ त्यांनीं वाचला नसता, तर त्यांचा स्वतःचा ग्रंथसंग्रह अगदीं नवीन झाला असता. परंतु खरा प्रकार असा झाला कीं, फारच चांगल्या स्थितीला पोचलेला ग्रंथसंग्रह त्यांच्या अगोदरच होऊन गेल्यामुळें त्यांनीं आपला स्वतंत्र ग्रंथसंग्रह

केला नाहीं. प्राचीन शिल्पकलांचे ज्ञान नष्टप्राय झाले नसतें तर, किंवा **गॉथिक** तऱ्हेची देवळें बांधिलीं [illegible]. शिल्पकलेचा उद्धार करण्याविषयीं **रेनाइसान्स** ( पुनरुज्जीवन ) या नांवाची जी मोठी खटपट **यूरोपांत** झाली, ती, **गॉथिक** देवळें बांधण्यापूर्वीच झाली असती तर, तीं देवळें कधींच बांधिलीं गेलीं नसतीं. **फ्रान्स** व **इटाली** देशांत प्राचीन ग्रंथ-लेखनपद्धतीचें अनुकरण, लोक करूं लागल्यामुळें, तेथील लोकांनीं ग्रंथलेखनाची जी पद्धत सुरू केली होती, ती तेथेंच खुटती. ज्या ज्या स्त्रिया ग्रंथलेखनाचें काम करितात, त्या त्या, पुरुषवर्गांतील जे मोठमोठे ग्रंथकार होऊन गेले, त्यांच्या शिष्यिणी असतात. **यूरोपांतील** प्रसिद्ध चित्रकार जो **रॅफेल** त्याच्या तोडीचा जरी एखादा चित्रकार असला, तरी त्याच्या पहिल्या चित्रांची तऱ्हा, जो त्याचा गुरु असेल, त्या गुरूनें काढिलेल्या चित्राच्या तऱ्हेहून फारशी भिन्न नसते. **मोझार्ट**सारख्या अलौकिक संगीतरचनाकाराच्या पहिल्या पद्यांत, त्यानें मागाहून दाखविलेली जी जबरदस्त कर्त्तबगारी आहे, ती दिसत नाहीं. नैसर्गिक वृद्धीच्या व्यक्तीस जशी विवक्षित वयाची अपेक्षा असते, तशीच व्यक्ति-समूहाला पुष्कळसा काल जाण्याची अपेक्षा असते.* स्त्रियांनीं लिहिलेल्या ग्रंथाची पद्धति पुरुषांच्या पद्धतीहून एकंदरींत भिन्न असावी असा जर कांहीं योग यावयाचा असेल, व स्त्रियांच्या नैसर्गिक प्रवृत्तीचें भिन्नत्व त्या पद्धतींत व्यक्त व्हावयाचें असेल, तर

* या भाषांतरांत निबंधकाराचा भाव स्पष्ट झाला नाहीं. तो अधिक स्पष्ट करून सांगणें अवश्य दिसतें. रॅफेल किंवा आमचे इकडील उदाहरणें पाहिजे असल्यास, प्रसिद्ध भिवा सुतार रविवर्मा अथवा पुणे प्रदर्शनांत आमचे पहाण्यांत आलेले **करवीरस्थ** चित्रकार **आबालाल** यांच्यासारखा एखादा चित्रकार घेतला, किंवा **मोझार्ट**– अथवा आमचे इकडील उदाहरण पाहिजे असल्यास कैलासवासी **अण्णा किर्लोसकर** यांच्यासारखा एखादा संगीताचार्य घेतला, सारांश, कोणत्याही कलेत ज्यानें आपलें अलौकिक बुद्धिसामर्थ्य दाखविलें, असा कोणताही पुरुष घेतला तर पुरुषाच्या अगदीं पहिल्या कृति केवळ अनुकरणात्मक असतात, असें दिसून येतें. त्यांचें स्वतंत्र व उत्कृष्ट स्वरूप

तसें होण्यास जितका काल जावयास पाहिजे आहे, तितका काल अद्यापि गेला नाहीं. त्यांच्यासमोर असलेलीं उदाहरणे, किंवा त्यांनी पसंत केलेले जे लेखनपद्धतीचे नमुने, त्याच्या दाबांतून मुक्त होऊन, ज्या दिशेकडे त्या पद्धतीची सहज प्रवृत्ति असेल, त्या दिशेने ती जाऊं लागण्यास अजून बराच काल लोटला पाहिजे. माझी स्वत:ची अशी समजूत आहे की, स्त्रियात उपलब्ध होणाऱ्या अशा कांहीं स्वाभाविक प्रवृत्ति म्हणून नाहीतच. तेव्हा आहेत असें जरी सिद्ध झालें नाही, व पुरुषांची बुद्धि व स्त्रियांची बुद्धि, उभयतांच्या बुद्धीत विशेष भेद आहे, असें कधीं काळीं स्थापित झालें नाहीं, तरी स्त्रीग्रंथकारांमध्यें एकेकीच्या व्यक्तिविशिष्ट प्रवृत्ति असतातच असतात. त्या प्रवृत्तींवर प्रस्तुतकालीं जुन्या वहिवाटीचा व समोर असलेल्या उदाहरणांचा पगडा बसलेला आहे. जमिनीत रुजत घातलेली जशी एखादी बी फुगून तिला मोड येतो, व तो मोड आपल्या डोक्यावर असणाऱ्या व आपल्यास दाबून टाकणाऱ्या जमिनीस दुभागून आपलें डोकें वर करितो,* त्याचप्रमाणें स्त्रियांचा व्यक्तिविशिष्ट गुण बराच बुद्धिगत किंवा परिणत झाल्याखेरीज जुन्या वहिवाटीच्या पगड्यास न जुमानतां त्यास आपलें डोकें वर काढितां येणार नाही.

२२. स्त्रियांमध्यें मूळचें बुद्धिसामर्थ्य कमी आहे असें दाखविण्यास गायन, नर्तन, चित्रकला, इत्यादि कला, ज्यांस ललितकला असें

---

प्रकट होण्यास कांहीं वयाचेंही मान लागत असतें ही गोष्ट व्यक्तीची जशी आहे, तशीच ती व्यक्तिसमूहासही लागू पडते. आमच्या निबंधकाराचें म्हणणें एवढेंच आहे कीं स्त्रीग्रंथकारांची सध्यांची स्थिति, ही पूर्व स्थिति, म्हणजे—अनुकरणाची स्थिति, आहे. ही स्थिति बराचसा काल व बऱ्याचशा पिढ्या गेल्यानंतर नाहीशी होऊन, त्यांचे स्वतंत्र विचार जे कांहीं असतील, ते मग पुढें बाहेर पडण्याचा संभव आहे. त्यांच्या प्रस्तुतच्या स्थितीवरून कांहीं विरुद्ध अनुमान करणें, हे न्याय्य होणार नाहीं

*हा दृष्टांत मूळच्या ग्रंथांत नाहीं. तो, केवळ निबंधकाराचें म्हणणें वाचकांच्या मनांत ठसावें म्हणून, भाषांतर करीत असतां सहजीं सुचल्यावरून येथे दिला आहे.

ह्मणतात, त्यांच्यापासून फारच बळकट पुरावा मिळतो, असे प्रथमदर्शनीं वाटण्याचा संभव आहे. कारण, कांहीं लोक असे ह्मणतात की, लोक-रूढि किंवा लोक-मत स्त्रियांस ललितकला शिकण्याविषयी प्रतिकूल नाहीं किंवा प्रतिबंध करीत नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांनी ललितकला शिकाव्या, अशाविषयीं उलट त्यांस उत्तेजन देत असतें. विशेषेकरून श्रीमान् लोकांच्या स्त्रियांस जे शिक्षण मिळतें, त्यांत ललितकला वगळल्या जातात, असे नसून उलट ललितकलांमध्ये स्त्रिया चांगल्या तरबेज झाल्या ह्मणजे त्यांच्या एकंदर शिक्षणाचा भाग संपला, असा प्रकार असतो.* असे असून इतर कोणत्याही कामांत स्त्रिया जितक्या मागे पडल्या नाहींत, तितक्या त्या या कामांत पुरुषाच्या मागे पडल्या. तथापि हा दोष असण्याचें कारण अगदीं उघड अशी एक गोष्ट आहे व ती आपल्या प्रत्यहीं पहाण्यांत येते. विशेषेकरून तिची सत्यता इतर बाबतींपेक्षां, ललितकलांच्या संबंधानें सर्वत्र सारखी दृष्टीस पडते. ती ही कीं, ती ती कला, जो धंद्याकरितां व आपल्या निर्वाहाकरितां ह्मणून शिकतो तो मनुष्य, त्या त्या कलेंत केवळ हौशीकरितां व शौकाकरितां शिकणाराहून फारच निष्णात झालेला असतो. या

---

* या संबंधानें सिड्नी स्मिथ यांनीं ' स्त्रीशिक्षणावर विचार ' या सदराखालीं असें लिहिलें आहे ' आज मितीस स्त्रीशिक्षणाचा एकंदर रोख हा ठरला ह्मणजे त्या पुरुषास अधिक प्रिय कशा होतील, इतक्या पुरताच आहे. गायन, नर्तन, चित्रकला यांतच स्त्रियांस प्रावीण्य मिळावें ह्मणून विशेष श्रम घेण्यांत येतात. परंतु या सर्व कलांचा उपयोग अर्थातच मर्यादित असला पाहिजे. तारुण्यांत असतांना पुरुषाचें मन सुप्रसन्न करून आपण त्यास आवडतें व्हावें व पुढेंही थोडा काळपर्यंत उभयतांस करमणूक व्हावी, या पलीकडे या कलांचा फारसा उपयोग नाहीं. आतां या कलांवरच उपजीविका करण्याचा ज्याचा उद्देश असेल, त्यांनीं त्यांचा अभ्यास करण्यांतच सर्व वेळ खर्च केल्यास ते खचित गैरवाजवी होणार नाहीं."

येथें एक गोष्ट सांगणें अवश्यक आहे कीं, इंग्लंड देशांत गाण्याबजावण्यावर उपजीविका करणाऱ्या सर्व स्त्रिया इकडल्याप्रमाणें वेश्यावर्गांतीलच नसतात.

देशांत सुशिक्षित वर्गांतील स्त्रियास ललितकलांपैकीं एखाद दुसरी कला अवश्य शिकवितात. परतु त्या कलेवर त्यांचा निर्वाह व्हावा, किंवा समाजांत त्यांचे वजन वाढावे, अशा हेतूने शिकवीत नाहीत. एखाद्या कलेमध्ये निष्णात झालेल्या अशा जितक्या स्त्रिया* आढळतात, तितक्या बहुतेक ती कला हौसेनें व मौजेनें ह्मणून शिकलेल्या असतात. या गोष्टीस अपवाद आहेतच. परतु त्या अपवादावरून साधारण नियम निश्चित होतो. गंगीतशास्त्र व वादनकला स्त्रियांस शिकवितात

* ज्या मूळच्या शब्दांचे हें लांबलचक भाषांतर करावे लागलें, ते शब्द असे आहेतः—' Women artists are all amateurs" "Women artists" या शब्दांचें बरोबर भाषांतर ह्मटलें ह्मणजे ' कलावतिणी किंवा कसबिणी स्त्रिया ! ' अथवा ' कसब करणाऱ्या किंवा दाखविणाऱ्या स्त्रिया ! ' कसेंही करू लागला तरी भलताच अर्थ होऊ लागतो ! ' Artist ' या शब्दाचा अर्थ, ज्यास एखादी कला अवगत झाली आहे तो. तात्पर्य –एखाद्या शब्दाचा अर्थ एक असतां व तो चांगला असतां, मागाहून त्या शब्दास कालवशात् भलताच एक वाईट अर्थ प्राप्त होतो, हें अशा स्थळीं लक्षांत येतें. नृत्य व गायन या कला केवळ मनोरंजनार्थ प्राचीनकाळीं श्रीमान् घराण्यांतील प्रतिष्ठित स्त्रिया मात्र शिकत तथापि, अलीकडल्या काळी त्या कलांची झालेली दुःस्थिति मनांत आली ह्मणजे विषाद वाटल्यावाचून रहात नाहीं अजाने इंदुमतीस उद्देशून 'प्रियशिष्या ललित कला-विधौ' असे ह्मटलें तीच गोष्ट जर एखादा आधुनिक सुशिक्षित तरुण ' सुधारक ' ( किंवा दुर्धारक ह्मणा ) आपल्या मनांत आणील, किंवा करून पाहण्याचा यत्न करील तर, जगात त्याचा केवढा उपहास होईल, व लोक त्याच्या प्रिय ' मिस्रेस ' किती नांवें ठेवितील, हे मनात आल्याबरोबर अगावर शहारेच उठतात ! मेघदूतात कालिदासानें वर्णन केलेले प्रसंग व ललितकला-निपुण अशी विदग्ध यक्षपत्नि कोणीकडे, आणि आधुनिक यवन-सत्तेमुळें दूषित झालेल्या अभिरुचींचा काल कोणीकडे ? असो ' चक्रनेमिक्रम ' न्यायान एकदां कालचक्र फिरले ह्मणजे सगळीच चक्रें फिरतात असें ह्मणून समाधान करून घ्यावें ! दुसरें काय ?

' सुधारक ' कर्त्यांनी एका ठिकाणी ह्मटलें आहे —' येथील ( आमच्या इकडील ) स्त्रीशिक्षणांत या कलाचा अतिरेक झाला नाही, इतकेच नाही तर त्यांचा अजून प्रवेशच होणें आहे व तो अशत होऊन त्यापासून स्त्रियांचे स्वतःचे मनोरंजन होऊन त्यांच्या पतीस ही करमणूक होऊ लागली, व तेणेकरून बाहेरख्यालीपणावर परिणाम घडला तर अर्थात् फारच इष्ट आहे." अगदी बरोबर आहे.

हे खरें. परंतु एखादें गाणें तालसुरावर बसवून गातां येईल किंवा वाद्यावर वाजवितां येईल अशा प्रकारचें शिक्षण त्यांस मिळत नाहीं. जें गाणें आयतें तालसुरांत बसविलें असेल तेवढेंच त्या गातात किंवा वाजवितात. स्त्रियापेक्षा संगीत रचना करण्याच्या कामांत पुरुष अधिक निष्णात होतात याचें कारण हेंच. ह्मणजे, ज्या पद्धतीचें शिक्षण पुरुषांस मिळतें, त्या पद्धतीचें शिक्षण स्त्रियांस मिळत नाहीं. ललित कलांपैकीं खरोखर ज्या कलेवर स्त्रिया आपला निर्वाह करितात, व ज्या कलेंत आपला सारा जन्म घालवितात अशी कला ह्मटली तर एक नाट्यकला होय. आणि या कलेंत स्त्रिया पुरुषांवर ताण करितात, असें जरी ह्मणतां आलें नाहीं, तरी पुरुषाच्या बरोबरीनें त्या काम करितात एवढी गोष्ट कबूल केलीच पाहिजे.*

स्त्रियांत व पुरुषांत योग्य तुलना करावयाची ह्मटली तर कोणत्याही एका कलेंत, स्त्रियांनीं केलेलीं कामें व ज्या पुरुषांनीं एखादी कला आपला धंदा ह्मणून पतकरिली नसून केवळ हौसेनें स्वीकारिली आहे अशा पुरुषांनीं केलेलीं कामें, अशा कामामध्यें तुलना केली पाहिजे. उदाहरण, संगीतरचनेचें काम फक्त हौसेनें जे पुरुष व ज्या स्त्रिया करितात, असे पुरुष व अशा स्त्रिया घेतल्या तर त्या उभयतांच्या कामांत सारखेच गुण आढळतात. आजकाल चित्रें काढून आपला निर्वाह करणाऱ्या कांहीं स्त्रिया दृष्टीस पडतात. परंतु अशा स्त्रियांचीं

* इंग्लंडांत अलीकडे ह्मणजे दोन तीनशें वर्षांत नाटकांत स्त्रियांच्या भूमिका स्त्रियाच घेतात. पोरें स्त्रियांचे भाग करीत नाहींत. शेक्सपीयरचे वेळीं, आमच्या इकडल्या नाटकांप्रमाणें स्त्रीभाग तरुण मुलेंच घेत, असें त्या या नाटकावरून उघड दिसतें. नाट्यकलेंत नांवाजलेल्या अलीकडील स्त्रिया ह्मणजे, मिस अँडरसन्, मिसेस लॉंगट्री, मिस टेरी वगैरे विलायतेंतील आनंदोद्भवांतून व आर्यभूषणांतून आपल्या नाट्यकलेनें रसिक श्रोतृजनांचीं अंतःकरणें कशीं हालवून सोडतात त्याचें वर्णन निकटील वर्तमानपत्रांत दिलेलें असतें. आमच्या इकडे असा दिवस कधीं येईल काय !

मख्या फारच थोडी आहे. आणि अशा स्त्रिया होऊं लागल्यापासून जितका काल गेला तितक्याचा जर विचार केला, तर स्त्रियांची बुद्धिमत्ता चित्रलेखनाच्या कामांत बरीच आढळते. मि. **रस्किन्**सारखे पुरुषजातीचे चित्रलेखक घेतले तरी त्यांनी या गेल्या कांही शतकांत कांही विशेष बुद्धिमत्ता दाखविली आहे, असें नाही. आणि खरोखर चित्रलेखनाच्या सबधानें विचार करितां कांही लोकोत्तर कामें चितान्यांच्या हातून होण्यास कदाचित् बराच काळ लोटावा लागेल. कारण, प्राचीन काळचे चितारी अर्वाचीनकाळच्या चितान्यांहून फारच श्रेष्ठ असण्याचें कारण असें आहे की, त्या काळीं चित्रकलेच्या कामीं अत्यंत बुद्धिमान लोक आपली बुद्धि खर्च करीत. चौदाव्या व पंधराव्या शतकांत **इटाली** देशांत जे चित्रकार होऊन गेले, त्यांची गणना त्या काळचे लोक महापंडितांत करीत. **ग्रीस** देशांत प्राचीनकाळीं प्रसिद्ध असे जे महापंडित होऊन गेले, त्यांच्याप्रमाणें, **इटाली** देशांतील चित्रकारांत जे अग्रगण्य किंवा प्रमुख होते, त्यांची गति अनेक विद्यांमध्यें असून त्यांचें ज्ञान व त्यांची मानसिक शक्ति विशाल होती. परंतु त्याकाळीं ललितकलांच्या सबधानें लोकांची समजूत अथवा कल्पना फारच उदात्त होती. ह्मणजे, मनुष्य प्राण्याच्या हातून घडण्यासारखीं जीं उत्तमोत्तम कामें त्या कामांपैकीं ललितकला ही एक आहे असें त्यावेळीं लोक मानीत; आणि राजकारणांत किंवा युद्धकलेच्या कामांत जे पुरुष लौकिक मिळवीत त्यांच्याप्रमाणेंच ललितकलेमध्यें प्रवीण असलेल्या माणसांचा राजे लोक बहुमान करीत व मोठ मोठ्या सरदारांच्या बरोबरीनें त्यांस मान देत. प्रस्तुत काळीं अशा प्रकारचें बुद्धिसामर्थ्य ज्यांस असेल ते लोक आपल्या बुद्धीचा व्यय चित्रकलेच्या कामीं न करितां ज्या कामांत कीर्ति व प्रतिष्ठा प्राप्त होईल अशा एखाद्या इतर अधिक महत्वाच्या कामांत आपली बुद्धि खर्च करितात. **रेनॉ-**

**ल्डस** किंवा **टर्नर** अशा पुरुषांसारखी अलौकिक बुद्धीची माणसे चित्रकलेमध्ये आपले आयुष्य घालविणारी आजकाल फारच थोडी आढळतात. संगीतकलेची गोष्ट अगदी निराळी आहे. त्या कलेस चित्रकलेप्रमाणे नानाप्रकारच्या मानसिक शक्तींची गरज लागत नाही. ती कला कांहीं विशेष प्रकारच्या ईश्वरी देणगीवर अवलंबून असते. ज्या ज्या माणसांनीं संगीतरचनेच्या कामांत नांव मिळविले, अशा माणसांत एकही स्त्री आढळू नये ही गोष्ट विस्मयकारक आहे, असे कोणास वाटेल. परंतु असा विचार केला पाहिजे की, ही नैसर्गिक बुद्धि, ही सृष्टिदत्त देणगी जरी एखाद्या माणसास प्राप्त झाली असली, तरी तिच्या योगाने कांहीं अपूर्व व उदात्त वस्तु निर्माण करावयाच्या ह्मटले ह्मणजे एक तर बराच अभ्यास करावा लागतो व शिवाय त्या कामांत रात्रदिवस तनमन घालून झटावे लागते. पुरुषांमध्ये सुद्धां संगीतरचनेच्या कामीं उत्तम प्रतीचे चातुर्य ज्यांनी दाखविले, असे पुरुष **जर्मनी** व **इटली** या दोन देशांत मात्र झाले. परंतु चमत्कार असा पहा कीं, त्याच दोन देशांतील स्त्रिया, साधारण शिक्षणांत किंवा विशेष प्रकारच्या शिक्षणांत **फ्रान्स** व **इंग्लंड** या देशांतील स्त्रियांपेक्षां फारच मागे पडल्या. फार काय–**जर्मनी** व **इटली** देशांतील स्त्रियांस मुळीच शिक्षण मिळालेले नसते, असे ह्मटलें असतां अतिशयोक्ति होईल असे वाटत नाहीं. विशेषेकरून वरिष्ठ प्रकारच्या मानसिक शक्तींपैकीं ज्या स्त्रियांच्या एखाद्या शक्तीस तरी उत्तम संस्कार घडला आहे, अशा स्त्रियांची उदाहरणें फार क्वचित् आढळतात. ज्या देशामध्ये वादनकलेचीं अथवा संगीतरचनेचीं मूलतत्त्वें अवगत आहेत असे शेकडो, किंबहुना हजारो पुरुष आढळतात, त्याच देशांत या कलेत प्रवीण असणाऱ्या स्त्रिया वीसही आढळत नाहीत. तेव्हां सरासरीचा विचार करितां असे प्रमाण बसते की, या कामां-

तही ज्या ठिकाणी नामांकित असे पन्नास पुरुष निघतील त्या ठिकाणी फार तर नामांकित अशी एकच स्त्री निघेल. गेल्या तीन शतकांत **जर्मनींत** किंवा **इटली** देशांत संगीतरचनेच्या कामांत नांवाजलेले असे पुरुष पन्नास देखील निपजले नाहींत.

२३. येथपर्यंत जी कारणें दाखविण्यांत आलीं, तीं, जे धंदे किंवा जीं कामें करण्याचा अधिकार अथवा मोकळीक उभयतांसही सारखीच आहे अशा कामांत स्त्रिया पुरुषांच्यामागें पडल्या अशा संबंधाचीं झालीं. याशिवाय या गोष्टीचीं आणखीही कांहीं कारणें आहेत. प्रथमतः एक तर अशीं कामें करण्यास लागेल तेवढी फुरसत ज्यांस सांपडते अशा स्त्रियांची संख्या फारच थोडी असते. कदाचित् हें ह्मणणें फारच चमत्कारिक व खोटें भासेल. परंतु मी ह्मणतों ही गोष्ट अगदीं खरी आहे. प्रत्येक स्त्रीचे बहुतेक विचार व प्रत्येक स्त्रीचा बहुतेक काळ तिचे नित्यक्रमापैकीं जे व्यवहार असतात त्या व्यवहारांत जातात. प्रथम कुटुंबाची देखरेख ठेवणें व घरांतला खर्चवेंच पाहणें अशा कामांत प्रत्येक कुटुंबांतील एक तरी स्त्री सदा गुंतलेली असते. आणि ही स्त्री, बहुधा जिचें वय पोक्त आहे व जिला बराच अनुभव प्राप्त झाला आहे अशी असते. हें काम मजुरीनें करून घेण्यासारखी एखाद्या कुटुंबाची ऐपत असेल तर ती गोष्टच निराळी. तथापि हेंही खरें, कीं, ज्या ठिकाणीं हें घरातील खर्चवेंच पाहणें वगैरे जबाबदारीचें काम मजुरीनें करून घेण्यांत येते, त्या ठिकाणीं पैशाची अफरातफर, पुष्कळशी अव्यवस्था व पदार्थांची नासधूस होणें वगैरे ज्या गोष्टी अनिवार्य असतात त्या मुकाट्यानें सोसाव्या लागतात. घराची देखरेख पाहणें ह्मणजे आधींच त्रासदायक काम आहे. आणि इतर गोष्टींनीं जरी तें काम त्रासदायक नसलें तरी स्वस्थपणानें विचार करण्याच्या कामास तें काम अत्यंत विघातक आहे. संसार-

कृत्यांत निमग्न असणाऱ्या मनुष्यास एकसारखी दक्षता ठेवावी लागते, बारीक सारीक गोष्टींतही पहावे लागते व क्षणोक्षणीं, दृष्टपूर्व व अदृष्टपूर्व अशा ज्या अनेक अडचणी पुढे येतात त्यांचा विचार करून निकाल करावा लागतो. या कारणानें जी स्त्री गृहकृत्यांच्या संबधाने जबाबदार असते, तिची त्या पाशापासून कधीच सुटका होण्याचा संभव नसतो. संसाराच्या काळजीपासून जिला अंशतः तरी दूर राहतां येईल अशी स्थिति व ऐपत एखाद्या स्त्रीची असली तरी तिच्यामागेंही दुसरे पाश असतात. ज्याला लौकिक असें ह्मणतात ते एक मोठें बंड तिला संभाळावें लागते. त्या कुटुंबाचे जे इष्टमित्र व आप्तवर्ग असतील त्यांच्याशीं भाषण करणें, त्यांच्या भेटी घेणें, त्यांस संतुष्ट ठेवणें, वगैरे कामें एकंदर कुटुंबाच्या तर्फेनें तिला करावीं लागतात. कुटुंबसंबधाची किंवा गृहकृत्यसंबधाची दगदग तिला जितक्या मानानें कमी असेल, तितक्याचमानानें समाजकृत्याची दगदग तिच्या मागें अधिक लागते. नाच, तमाशे वगैरेस जाणें, भेटी घेणें, मेजवान्या करणें, पत्रव्यवहार ठेवणें वगैरे थोडे का व्याप असतात? या शिवाय दुसरा एक मोठा व्याप फक्त स्त्रियांच्याच मागें समाजानें लावून दिलेला असतो तो निराळाच. हा व्याप कोणचा ह्मणाल तर त्यांनी आपणास होईल तितकें सुशोभित व हृदयंगम बनविणें! वेणीफणी करणें, चांगले पोषाख करणें, . . . . राखणें. उच्च वर्गांतील हुषार व चतुर ह्मणविणाऱ्या प्रत्येक स्त्रीच्या अकलेचा बराच भाग भाषण-चातुर्य संपादन करणें, वगैरे कामें शिकण्यांत खर्च होतो. या विषयाचा उगीच वरवर विचार केला तरी असें दिसेल कीं, पोषाख चांगला करणें व नीटनेटकेपणानें वागणें ह्मणजे काय हें ज्या स्त्रियांस समजतें ( हे माझें ह्मणणें पोषाख उंची व मूल्यवान् असण्याच्या संबधाचें नसून पोषाखावरून दिसून येणारी जी सदभिरुचि किंवा जे

चातुर्य त्याच्या संबंधाचे आहे ) अशा सर्व स्त्रिया आपल्या स्वतांच्या पोषाखांत व आपल्या मुलींच्या पोषाखांत जितकी बुद्धि खर्च करितात तितक्यावरून विचार केला तर, फक्त नेपथ्य—मीमांसेत त्यांच्या मानसिक शक्तीचा किती तरी व्यय होत असलेला दिसतो! तीच बुद्धि जर त्या एखाद्या कलेमध्ये, ग्रंथरचनेत किंवा साहित्यशास्त्रांत अथवा पदार्थविज्ञानासारख्या एखाद्या शास्त्राच्या अध्ययनांत घालतील तर नांवाजण्यासारखी व लोकमान्य कामे त्यांच्या हातून घडतील, यांत संशय नाही.* नित्य व्यवहारांतील वर सांगण्यांत आलेल्या बारीकसारीक गोष्टी ( स्त्रियांची समजूत त्या फार महत्त्वाच्या आहेत अशी मुद्दाम केलेली असते ) करूनही जर पुष्कळशी फुरसत सांपडेल व मानसिक स्वातंत्र्य आणि उत्साह त्यांच्या ठिकाणी राहतील आणि ती फुरसत, ते स्वातंत्र्य व तो उत्साह एखाद्या कलेच्या अध्ययनांत अथवा तत्त्वमी-

* "ज्या योग्य मानसिक व्यापारानें ललितकलेच्या व इतर कलांच्या तत्त्वांचा निन्य परिचय होतो व योग्यायोग्यतेची अथवा यथार्थतेची कल्पना मनुष्यप्राण्यास प्राप्त होते, त्याच मानसिक व्यापाराचा उपयोग अलंकरणाच्या व शरीरभूषेच्या कमी होतो असे दिसतें. हेतु जरी लहान असला तरी त्याचें मूळचें स्वरूप एकच आहे. पूर्णन्व हा मध्य बिंदु कल्पिला असतां शरीरभूषा किंवा नेपथ्यकला हे एक तोच मध्य बिंदु धरून काढिलेलें लहानसें वर्तुळ होय. हें तत्त्व, नेपथ्य रचनेचा ( पोशाख करण्याच्या तऱ्हेचा ) विचार केला असतां अधिक स्पष्ट होणार आहे. पोषाखाच्या कामांत आवड-निवड असते एवढेंच नाहीं, तर त्या आवडीनिवडीत बरा वाईट असा प्रकार असतो, हें सर्व कबूल करितात. सदभिरुचि व दुष्ट अभिरुचि असा भेद सर्वमान्य आहे. पोषाखाच्या अवयवांत नेहमीं बदल होत असतो. मोठ्याचें लहान व लहानाचें मोठें असें होत असतें. तथापि त्याचें सामान्य स्वरूप कायम राहतें. त्याची साधारण आकृति बदलत नाहीं. पोषाखाच्या धर्तींत निरंतर जो बदल होत असतो तो मुळचा आकार कायम राहून होत असतो. पोषाखाच्या तऱ्हेत जो एखादी नवी सुधारणा करितो, किंवा पोषाख करण्यांत ज्याची निवड उत्कृष्ट असते त्याची ती कल्पक-शक्ति तो जर अधिक उदात्त कामांत खर्च करील तर कौशल्याच्या व कारागिरीच्या मोठमोठ्या कामांतही त्याचें चातुर्य दिसून येईल व त्याची योग्य सदभिरुचि व्यक्त होईल."—

सर जॉशुआ रेनोल्डस ७.

मांसेच्या कामांत त्या घालवितील असा प्रकार संभवत असेल तर आपण असा विचार करा की, एकंदर पुरुषसंख्येपैकी बऱ्याच मोठ्या संख्येच्या मानसिक शक्तीपेक्षां स्त्रियांची मूळची प्रवर्तक बुद्धि किंवा मानसिक शक्ति फारच मोठी असते, असें उघड सिद्ध होईल. परंतु एवढेंच नव्हे. संसारांतील नित्यक्रमापैकी कामें स्त्रियास करावी लागतात ही गोष्ट एकीकडे ठेवीली तरी त्याच्या वेळेवर व त्याच्या मानसिक शक्तीवर प्रत्येक मनुष्याचा नेहमी हक्क आहे अशी लोकांची समजूत असते, ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. पुरुषाला जरी कांही एखादा पोटापाण्याचा धंदा किंवा रोजगार करावयाचा नसला व तो सुखवस्तु असला तरी ही त्याचा वेळ लोक घेऊ पहात नाहींत. आणि त्यानें जर एखादा उद्योग केवळ हौसेनें हातीं घेतला असला व तो आपला वेळ त्या कामात घालवीत असला, तर त्या बद्दल कोणालाही वैषम्य वाटत नाहीं. प्रसंग विशेषीं त्याची गरज जर कोणास लागली व 'सध्यां मी उद्योगांत आहे—मला फुरसत नाहीं' अशी त्यानें सबब सांगितली, तर ती सबब योग्य आहे असें समजतात व त्या बद्दल कोणासही कांहीं वाईट वाटत नाहीं. परंतु, एखाद्या स्त्रीनें आपल्या आवडीचीं अशीं कामें केवळ हौसेनें करण्याचें मनावर घेतलें व त्यांत ती आपला सर्व वेळ घालवूं लागली, तर अर्थात् लौकिकसंबंधाचे पाश तिला तोडावे लागणारच. आणि जर ते तिनें तोडले तर तिचे आप्त, इष्टमित्र व एकंदर जन तिला हांसल्या शिवाय राहतील काय? फार काय—तिचीं अवश्य ह्मणून मानिलेलीं कर्तव्ये, ह्मणजे घरांतलें पहाणें वगैरे; त्यांत देखील तिनें निरंतर निमग्न होऊन राहणे चांगलें नाहीं. त्यांचीही एकवेळ हेळसांड तिनें केली तरी हरकत नाही. परंतु लौकिक हा तिनें राखलाच पाहिजे. घरांत कोणी निजून असेल, किंवा एखादी तशी कांहीं विशेष अडचण घरांत असेल, तर मात्र लोकांची

करमणूक करण्याचें काम मागें टाकून आपल्या स्वतांच्या कामाकडे लक्ष पोंचविण्याचा तिला अधिकार आहे, असें समजतात. एरवीं तिला कोणीही हाक मारिली तरी तिनें नेहमीं दक्ष असलें पाहिजे व 'जी हजर' म्हटलें पाहिजे. तिनें एखादा व्यवसाय हातीं घेतला, किंवा एखाद्या विषयाचा अभ्यास करण्याचें मनांत आणिलें, तर त्या कामाकरितां तिला कसा तरी व केव्हां तरी मारून मुटकून थोडासा वेळ काढावा लागतो. एका प्रसिद्ध स्त्रीनें आपल्या एका ग्रंथांत असें लिहिलें आहे की, (हा ग्रंथ कधींकाळीं तरी प्रसिद्ध होईल अशी मला फार आशा आहे) "स्त्रीला प्रत्येक गोष्ट राहिल्या-साहिल्या वेळेंत करून घ्यावी लागते!" असो. तेव्हां अशी एकंदर स्थिति असल्यामुळें ज्या कामास मनाची एकाग्रता लागते; काया, वाचा, मन, एक करून एक सारखें झटावें लागतें व आपल्या शारीरिक व मानसिक शक्तीचा उत्तमोत्तम अंश अर्पण करून जीवित-सर्वस्व खर्च करावें लागतें. अशा कामांत स्त्रीला अगदीं पहिली पाहिरी जरी मिळाली नाहीं, तिनें जर अगदीं ततोतंत शंभर गुण जरी मिळविले नाहींत, व कौशल्याची अगदीं सीमा करून सोडली नाहीं तर ही गोष्ट मोठ्या आश्चर्याची आहे काय? आणि अशा कामां-पैकींच तत्वमीमांसेचें काम व विशेष करून कलाकौशल्याचें व कारागिरीचें काम होय—कीं ज्याच्यामध्यें उत्तम कौशल्य प्राप्त करून घेणें असेल अशा मनुष्यास आपले सर्व विचार व आपल्या सर्व मानसिक शक्ति घालाव्या लागतात एवढेंच नव्हे, तर निरंतर अंगमेहनतही करीत राहावें लागतें.

२४. वर निर्दिष्ट केलेल्या गोष्टींखेरीज दुसरी एक गोष्ट विचार करण्यासारखी आहे. नानातऱ्हेच्या हरहुन्नरांत व बुद्धिमत्तेच्या कामांत केवळ उपजीविका चालविण्यापुरती प्रवीणता अंगीं असणें, हा एक

प्रकार झाला. परतु ज्या करामतीच्या योगानें त्या कारागिराच्या हातून मोठमोठीं व लोकोत्तर कामे घडून येतात व त्याची कीर्ति अमर होते, अशी उच्च प्रतीची करामत अंगी असणें, हा अंगदी भिन्न प्रकार आहे. पहिल्या प्रकारास लागणारें कौशल्य, तो तो व्यवसाय आपल्या निर्वाहाचा धंदा आहे असें समजून जी माणसें करितात, त्यांस प्राप्त होते व प्राप्त करून घेण्यापुरतें उत्तेजनही त्यांस मिळते. परतु दुसऱ्या प्रकारास लागणारी प्रवीणता, जगांत आपलें नाव व्हावें अशी उत्कट इच्छा ज्या माणसास नसते, किंवा त्याच्या आयुष्यांत कधींकाळींही ती उत्पन्न झाली नसेल तर कधींही प्राप्त होत नाहीं. अत्यंत बुद्धिमत्तेची दर्शक व अत्यंत सुंदर अशी जी कामें आपल्या पहाण्यांत येतात, त्या कामास लागणारें लोकोत्तर कौशल्य उगीच प्राप्त होत नसते. ज्या माणसास सृष्टीनें अपूर्व बुद्धीचें दान केलें आहे, अशा माणसासही दीर्घ प्रयास व अतोनात कष्ट करावे लागतात. आणि असे कष्ट त्या माणसांच्या हातून जे होतात त्यात मूळ हेतु पाहता कीर्तिची इच्छा ही होय. ती जर नसेल तर त्याच्या हातून काही एक होणार नाहीं. ही कीर्तिविषयी उत्कट इच्छा स्त्रियांमध्यें क्वचित् आढळते--मग असें असण्याचें कारण स्वाभाविक असो, किंवा कृत्रिम असो. स्त्रियांची महत्वाकांक्षा प्रायः अत्यंत मर्यादित असते. त्यांच्या अत्यंत सन्निध असणारीं जी माणसें त्यांच्यावर मात्र आपलें वजन ठेवण्याचा त्या यत्न करितात. ज्यांस त्या प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पहातात, त्यांची भक्ति आपणावर बसावी, त्यांनीं आपणावर ममता करावी व त्यांस आपण प्रिय व्हावें, एवढीच कायती त्यांची इच्छा असते. आणि तेवढ्या कामास जेवढें ज्ञान, जेवढें शहाणपण, जितक्या कला किंवा जितके गुण लागतात तितके त्यांनीं संपादन केले ह्मणजे त्या बहुधा संतुष्ट राहतात. प्रस्तुतकाळीं

स्त्रियांची जी स्थिति आपणास आढळते त्या स्थितीचें विवेचन करितांना त्यांच्या स्वभावाचा हा धर्म अवश्य विचारांत घेतला पाहिजे. आतां हा धर्म स्त्रियांमध्यें मूळचाच आहे असें मला मुळींच वाटत नाही. त्यांच्या एकंदर स्थितीचा हा परिणाम आहे. ह्मणजे, हा धर्म स्त्रियांच्या ठायीं मागून उत्पन्न झालेला आहे व कृत्रिम आहे. पुरुषांच्या ठायीं दिसून येणारी जी कीर्तीची इच्छा तिला, त्यांस मिळणारें एकंदर शिक्षण आणि लोकमत या दोहोंकडून सतत प्रोत्साहन मिळत असतें. महत्वाकांक्षा ह्मणजे मनाची एक प्रकारची दुर्बलता होय, असें जरी ह्मटलें आहे, तरी स्वसुखाविषयीं निरभिलाष होऊन व विषयसुख तुच्छ मानून केवळ कीर्ति करितां अविश्रांत श्रम करणें, हे महाभागांचें लक्षण आहे व उदात्त स्वभावाच्या पुरुषांचें कर्तव्य आहे, असें मानितात. कीर्त्यभिलाषाच्या योगानें महत्त्वाकांक्षेचे जे जे हेतु किंवा जे जे विषय असतात, ते ते प्राप्त करून घेणें पुरुषांस सुलभ असतें. अशाच हेतूंपैकीं स्त्रियांचा अनुग्रह संपादन करणें, हाही एक हेतु असतो. असो. सारांश, असा हा प्रकार असल्यामुळें पुरुषांच्या कीर्त्यभिलाषास उत्तेजन मिळत असतें. परंतु चमत्कार असा कीं, तेच हेतु स्त्रियांस सर्वथा निषिद्ध! स्त्रीनें महत्वाकांक्षा बाळगणें, किंवा तिनें कीर्तीची इच्छा करणें, हें स्त्रीधर्माविरुद्ध, स्त्रीजातीस अनुचित व धाष्टर्य ह्मणून मानलें जातें! शिवाय, आपण असा विचार केला पाहिजे कीं, ज्या माणसांशीं तिला रात्रंदिवस व घडोघडीं प्रसंग पडणार, त्या माणसांचे ग्रह आपल्या विषयीं चांगले व्हावे या गोष्टीकडे तिचें सर्व लक्ष असतें यांत नवल तें काय? कारण, समाजानें असें मुळीं शास्त्रच ठरवून टाकिलें आहे कीं, त्या माणसांशिवाय इतर माणसांशीं तिला कांहीं एक कर्तव्य नाही. खेरीज तिचें सर्व सुख जेणें करून त्या माणसावरच अवलंबून राहील, अशी योजना

केलेली असते. आपल्या लोकांनीं आपणांस मान द्यावा व पूज्य मानावें अशा विषयीची स्वाभाविक इच्छा पुरुषांप्रमाणे स्त्रियांच्याठायींही प्रबळ असते. परंतु, समाजानें ठरविलेली व्यवस्था ह्मणा, किंवा रूढ प्रचार ह्मणा, असा असतो कीं, साधारणतः सर्व गोष्टींत स्त्रीला लोकांत प्रतिष्ठा किंवा मान्यता मिळावयाची ती तिचा नवरा असेल तर त्याच्याच द्वारानें, किंवा नवरा नसेल तर पुरुष जातीचे जे तिचे आप्त असतील त्यांच्या द्वारानेंच मिळावयाची. ही झाली समाजाच्या किंवा जगाच्या संबंधाची गोष्ट. आतां खासगी संबंधानें पहातां घरांत जी तिची प्रतिष्ठा असावयाची ती बहुधा तिनें आपलें नांव पुढें न करण्यावर अवलंबून असते. ह्मणजे, कोणत्याही प्रकारें आपला व्यक्तिसंबंध तिनें पुढें न आणितां ती पुरुषांचा केवळ [illegible] एक भाग ह्मणोन राहिली, तरच गृहप्रतिष्ठा अबाधित राहते! निष्कर्ष मिळून एवढाच कीं, एकदर कुटुंबसंबंधाची व समाजसंबंधाची स्थिति, त्याचप्रमाणे संसारांत वागण्याची एकदर तऱ्हा, किंवा जन्मभर दृढ झालेली संवय ह्मणा—या गोष्टींचा परिणाम माणसांच्या मनांवर किती होतो हें समजण्याचें सामर्थ्य ज्यांस यत्किंचित् असेल, त्यांच्या ध्यानांत, स्त्रिया व पुरुष यांजमध्यें भासमान होणारे बहुतेक सर्व भेद (जे भेद विशेषतः स्त्रियांच्या कमीपणाचे दर्शक आहेत असें मानिले जातें त्या सुद्धां) काय कारणानें दिसतात, ही गोष्ट पूर्णपणें सहज आलीच पाहिजे.

२५. स्त्रिया व पुरुष यांजमधील बुद्धिसंबंधाच्या भेदांचा विचार एकीकडे ठेवून फक्त नीतिसंबंधाच्या भेदांचा विचार केला, तर असें दिसतें कीं, या बाबतींत लोक स्त्रियांस श्रेष्ठ समजतात. पुरुषांहून स्त्रिया अधिक नीतिमान किंवा सदाचारसंपन्न असतात असें ह्मणतात. परंतु हें ह्मणणें रिकामें भूषण आहे. तें ऐकून प्रत्येक पाणीदार स्त्रीला हांसूं आल्या खेरीज व खेद वाटल्याशिवाय राहाणार नाहीं! कारण

चांगल्या माणसांनी वाईट माणसांच्या आज्ञेत रहावें असे शास्त्र जेथें पक्कें ठरून गेले आहे व अशी व्यवस्था योग्य व स्वाभाविक आहे असें मानिले जातें, असा हा प्रकार साऱ्या संसारांत स्त्रीपुरुषांच्यासंबंधा प्रमाणें दुसऱ्या संबधांत आढळणार नाहीं. स्त्रिया पुरुषांपेक्षां चांगल्या असतात ह्या वायफळ बडबडीचा जर कांहीं उपयोग होण्यासारखा असेल, तर तो इतकाच कीं, सत्तेच्या योगानें सत्ताधारी माणसांची मनें बिघडतात व नीतिभ्रष्ट होतात, ही गोष्ट पुरुषांस कबूल करावी लागणार. कारण, स्त्रिया पुरुषांहून अधिक नीतिसंपन्न किंवा साधु वृत्तीच्या असतात ही गोष्ट जर खरी ठरली, तर सत्तेनें माणसें बिघडतात हे प्रमेयही त्याच गोष्टीवरून चांगलें सिद्ध होतें. आणि ही गोष्ट अगदीं खरी आहे कीं, दासभाव किंवा सेव्यसेवकभाव, खरोखर पशुतुल्य करून सोडणारा अशा प्रकारचा जर नसेल तर, यद्यपि तो धन्यास व दासांस उभयतांस ही बिघडविणारा व अपकारक असला, तथापि दासांच्या मालकापेक्षां प्रत्यक्ष दासांस कमी अपकारक असतो. कोणत्याही प्रकारचा दाब किंवा बंधन ज्या सत्तेस नाहीं, अशा प्रकारची सत्ता चालविणाराची नीति जितक्या अंशानें बिघडते, तितक्या अंशानें, अनियंत्रित अशा सत्तेच्या दाबांत रहाणाऱ्या माणसाची नीति बिघडत नाहीं. *फौजदारी कायद्यानें ठरविलेले गुन्हे पुरुषांच्यापेक्षां स्त्रियांच्या हातून थोडे घडतात, असेंही लोक ह्मणतात. कारागृहांत पुरुषांच्यापेक्षां स्त्रियांची संख्या कमी आढळते, असें ही सांगतात. हीच गोष्ट शिद्दी गुला-

---

*निबंधकारांचा आशय हा दिसतो की, एखाद्या अतिशय जुलमी किंवा अनियंत्रित अधिकार चालविणाऱ्या माणसाच्या हाताखालीं एकवेळ राहणें बरें, ह्मणजे नम्रता, सहनशीलता, आत्मसंयमन, उद्योगिता वगैरे गुण देखील अंगी येण्याचा संभव असतो व त्याच्या नैतिक प्रकृतीस किंवा त्याच्या साधुवृत्तीस फारशी दुष्टबाधा होणार नाहीं. अनियन्त्रित सत्ता ज्याच्या हातांत आहे त्याच्या वृत्तीस जितकी दुष्टबाधा होईल तितकी बाधा त्या सत्तेच्या अमलाखालीं वागणाऱ्या माणसाच्या वृत्तीला होत नाहीं.

मांच्या संबधानेंही पण ह्मणतां येईल. जे दुसऱ्याच्या सत्तेंत असतात त्यांस वारवार गुन्हे करणें अशक्य असतें. आणि त्यांनीं गुन्हे केलेच तर ते स्वामिकार्यास्तव व धन्याच्या हुकुमावरून त्यांस करावे लागतात. सामान्य लोक तर राहिले, परंतु रात्रदिवस मनुष्य स्वभावाचे अध्ययन व परिशीलन करणाऱ्या पंडिताचाहि कळप त्यांतच सामील होऊन अंधाप्रमाणें त्यांनीही समाजस्थितीमुळें व्यक्तिमात्रावर होणाऱ्या परिणामांकडे दुर्लक्ष करावें व मूर्खपणानें स्त्रियांची बुद्धि एकीकडून कमी किमतीची ठरवावी, व दुसरीकडून वेडगळपणानें त्यांच्या नीतिमत्तेचे गुणानुवाद गावे, याहून जगाच्या विलक्षण अंधत्वाचें अधिक ठळक उदाहरण माझ्या तर पहाण्यांत नाहीं!

२६. ज्या तोंडानें पुरुष नीतिसंबधानें स्त्रियांचें श्रेष्ठत्व केवळ उपचारार्थ वाखाणतात, त्याच तोंडानें स्त्रियांचा स्वभाव फारच चंचल व पक्षपाती असतो, एखाद्या माणसाकडे त्यांचें मन तेव्हाच वळतें, वगैरे आरोप* करून ते स्त्रियांची निंदाही करितात. पुरुष असेंही ह्मणतात कीं, स्त्रियांची व्यक्तिविषयक जी आवडनिवड असते, ती त्यांच्या गळ्यांत एक प्रकारचें लोढणेंच असतें. राग, द्वेष, प्रिय, अप्रिय अशा विकारांस त्या सहज वश होतात व तेणेंकरून त्यांची विवेकशक्ति लुली पडते, हें ह्मणणें खरें असें धरून जरी चाललें तरी, पुरुष स्वार्थसाधनाकरिता कुमार्गाकडे वळल्याचे असे जितके प्रसंग आढळतात, त्या प्रसंगांपेक्षां स्त्रिया आपल्या मनोविकारांच्या आधीन होऊन भलत्या मार्गाकडे वळल्याचे प्रसंग अधिक आढळतात, ही गोष्ट

---

* आशबर्नर नांवाच्या एका बड्या साहेबांनीं आमच्या गतभर्तृका अनीतीचें वर्तन करणाऱ्या असतात, असें विधान केल्यावरोबर आमच्या लोकांस केवढा राग आला! पण तेच लोक बापानें आपली मुलगी बरीच वर्षें अविवाहित ठेविली तर ती खास बिघडली असें विधान खुशाल करितात! नुसत्या लग्नसंस्कारामुळें इतका जबरदस्त फरक पडतो, हें प्रमेय आह्मांस ठाऊक नव्हतें.!

निराळी सिद्ध झाली पाहिजे. समजा, तीही सिद्ध झाली, तरी त्यांत एक मोठा भेद रहाणारच. तो हा कीं पुरुष जेव्हां कर्तव्यभ्रष्ट होतात व लोकहितास पराङ्मुख होतात, तेव्हां ते तसे केवळ स्वार्थाकरितां होतात. आणि स्त्रिया कर्तव्यपराङ्मुख झाल्या तरी त्या स्वार्थाकरितां होत नसून दुसऱ्याच्याकरितां होतात. कारण, समाज त्यांस स्वार्थ-संबंधाच्या कांहीच गोष्टी करूं देत नाहीं. दुसऱ्याही एका गोष्टीचा विचार केला पाहिजे. स्त्रियांस जें शिक्षण समाजापासून प्राप्त होतें, तेवढ्यावरून त्यास असें वाटूं लागतें कीं, ज्या व्यक्तींशी प्रत्यक्ष आपला संबंध असतो त्या व्यक्तींच्या संबंधाचें मात्र काय तें कर्तव्य आपणांस असतें व ज्यांच्या हिताकडे आपलें लक्ष्य पोंचलेंच पाहिजे अशा व्यक्ति काय त्या तेवढ्याच. यामुळें, श्रेष्ठ प्रकारची जी नीति, ह्मणजे 'वसुधैव कुटुंबकम्' या वचनांत प्रतिपादिलेली जी उदात्त वृत्ति व परो-पकाराचे जे मोठमोठे विषय, त्यांचें आकलन करण्यास ज्या प्रकारचें शिक्षण बुद्धीस लागतें, त्यांची मूलतत्त्वेंही त्यांस अवगत नसतात. तेव्हां जो आरोप स्त्रियांवर करण्यांत येतो त्याचा इत्यर्थ पाहूं जातां इतकाच निघतो कीं, जें एक कर्तव्य त्यांस शिकविलेलें असतें—फार काय जें एकच कर्तव्य ह्मणून बजावण्याची मुभा समाजानें त्यांस दिली आहे, तें, त्या बिच्याऱ्या फारच निष्ठेनें करितात. स्त्रियांवर पुरुष जी सत्ता चाल-वितात तिजबद्दल स्त्रिया स्वतां मुळींच कुरकुर करीत नाहींत, असें ही एक पुरुषांचें ह्मणणें असतें. उघड आहे! ज्यांच्या हातांत अधिकार आहे व सत्ता आहे, अशीं माणसें, त्या सत्तेस वश असणाऱ्या माणसांस जेव्हां जेव्हां कांहीं अधिकार किंवा हक्क देतात, तेव्हां तेव्हां त्या अधिकार-हीन व सत्तावश माणसांच्या अंगीं ते हक्क जबरीनें मिळविण्याचें सामर्थ्य असल्याखेरीज त्यांस ते मिळतच नाहींत. यामुळें, स्त्रियांच्या परवशते विरुद्ध कितीही सबळ पुरावा आणिला आणि कसेंही प्रतिपादन केलें

तरी, जोपर्यंत 'आपल्या परवशतेच्या संबंधाने स्त्रियांची तक्रार नाही' अशी गोड समजूत लोक करून घेतील तोपर्यंत त्या प्रतिपादनाकडे ते मुळीच लक्ष्य देणार नाहीत हे उघडच आहे. स्त्रिया कुरकूर करीत नाहींत या गोष्टीमुळे ही अन्यायाची सत्ता आणखी कांहीं काळपर्यंत पुरुष चालविणार हे खास आहे, तथापि, तेवढ्यावरून ती सत्ता कमी अन्यायाची होते असे नाही. मुसलमान, बंगाली, वगैरे पूर्वात्य देशांतील लोकांच्या जनानखान्यांत राहणाऱ्या स्त्रियांच्या संबंधानेही असाच कोटिक्रम लढवितां येईल. त्या स्त्रिया, 'यूरोपिअन स्त्रियांस मिळणारें स्वातंत्र्य आह्मांस नाहीं ह्मणून कोठें कुरकूर करितात? उलट त्या स्त्रिया आमच्या स्त्रियांस अतिशय उद्धट व स्त्रीधर्मशून्य समजतात. समाजांत दिसून येणारी जी एकंदर व्यवस्था तिजबद्दल कुरकूर करणारे असे पुरुष तरी किती आढळतात? जगांत आपल्याहून भिन्न प्रकारची ह्मणून कांहीं एक व्यवस्था आहे, असे ज्यांस मुळींच ठाऊक नाही ते तर मुळींच कधी कुरकूर करणार नाहींत किंवा असतोष दाखविणार नाहींत. स्त्रियांच्या एकदर स्थिती विषयी स्त्रिया कुरकूर करीत नाहींत, असे ह्मणतां येत नाहीं. कारण स्त्रियांच्या लेखांत अशा प्रकारचे विलापरव किंवा दुःखोद्गार पुष्कळ आढळतात. आणि जोंपर्यंत अशा कुरकुरींत किंवा विलापांत कांहीं व्यावहारिक हेतु आहे, असा संशय जोपर्यंत लोकांस आला नाही तोपर्यंत असे लेख फारच बाहेर पडत. परंतु या कुरकुरी किंवा हे उद्गार ह्मणजे, या संसारा विषयी किंवा नरदेहाविषयी पुरुष जसे असमाधानाचे उद्गार काढितात तशाच प्रकारचे असतात. त्यांचा अ... ...द्दल ह्मणजे कोणावर दोष ठेवावा किंवा असलेल्या स्थितींत कांहीं बदल व्हावा असें ह्मणण्याचा नसतो. परतु स्त्रियांची एकंदर पुरुषांच्या सत्तेविषयी किंवा एकंदर नवऱ्यांच्या सत्तेविषयीं जरी कुरकुर नसते, तरी प्रत्येक स्त्री आपल्या नवऱ्याबद्दल कुरकुरत असते, किंवा आपल्या मैत्रिणीच्या नवऱ्यांबद्दल

कुरकुरत असते. दास्याचे जितके ह्मणून प्रकार आहेत तितक्यांत हीच तऱ्हा आढळते. निदान दास्यविमोचनार्थ जी पहिली हालचाल होत असते तिच्या आरंभी असा प्रकार व्हावयाचाच. पूर्वी **यूरोपांत सर्फ** ह्मणून जमिनीची मशागत करणारे जे दास होते, त्यांनी **लॉर्डस्** ( जमीनदार ) लोकांच्या सत्तेबद्दल प्रथम कुरकूर केली नाही. तर फक्त त्यांच्याकडून होत असलेल्या जुलुमाबद्दल कुरकूर करण्यास त्यांनी आरंभ केला. त्याचप्रमाणे **कॉमन्स** ( प्रजापक्षीय ) लोकांनीं **प्रथम** फक्त कांहीं नागरिक अधिकार आपणांस मिळावे, ह्मणून बोलणें लाविले. त्यांत त्यांस यश आल्यावर नंतर मग आपल्या समतिशिवाय आपणांवर राजाने कर बसवूं नये, असे त्यांनी मागणे केले. परंतु प्रत्यक्ष राजाच्या सार्वभौम सत्तेचा किंवा अधिकाराचा अंश आपणांस मिळावा, असे जर त्यावेळी त्यांनी मागणें केले असते, तर आपलें हे मागणं खरोखर फारच धाष्ट्यांचें व फाजीलपणाचें आहे, असे त्यांचें त्यांसच वाटले असते. पुष्कळ दिवस, प्रजेनें राजाच्या विरुद्ध बंड करणें, किंवा राजाशीं विरोध करणे, हे अनुचित व धर्मविरुद्ध होय, अशी लोकांची दृढ समजूत होती. कालवशात् ती समजूत बदलून अशा प्रकारचा हक्क रयतेस आहे असा सिद्धांत सर्वमान्य होऊन गेला.* ठरलेल्या ज्या वहिवाटी, रूढ झालेले जे प्रचार, तद्विरुद्ध वर्तन करणें, हें जसे अयोग्य मानिले जात असे; ज्या प्रमाणे आपल्या

* कारण उघड आहे एक तर राजा ह्मणजे ईश्वराचा अंश–' नाविष्णु: पृथिवीपतिः' अशी जी समजूत पूर्वीपासून चालत आली होती. ती विद्याप्रसाराच्या व शास्त्रज्ञानाच्या योगानें नाहींशी झाली. त्याचप्रमाणे प्रजेकरितां राजा, राजासाठी प्रजा नाही असा सिद्धांत ठरून राजा जर प्रजेवर जुलूम करील तर प्रजेनें राजास पदच्युत करावें, असें शेंकडों लोकांनी उघड प्रतिपादन करून शेवटी होतां होतां त्यांनी लोकप्रवृत्ति निव्वळ लोकसत्तात्मक राज्याकडे वळविली. असा हा प्रकार होण्यास विद्या प्रसार व तदनुषंगानें प्राप्त झालेले विचार-स्वातन्त्र्य ही कारणीभूत झाली, असें कोण कबूल करणार नाही?

राजाविरुद्ध वागण्याचा हक्क रयतेस नाहीं अशा प्रकारची लोकांची जशी समजूत होती तशीच समजूत प्रस्तुत एक काय ती स्त्रियांच्या संबधांत राहिली आहे. नवऱ्याला जी खटपट किंवा जो व्यवसाय नापसंत असतो, त्यांत जी बायको सामील होते, तिला आपलें सर्वथा नुकसान करून घ्यावें लागतें. एवढेंच नव्हे, तर ज्या कार्याकरितां ती आपली हानि करून घेण्यास कबूल असते, तें कार्यही तिच्या हातून सिद्ध होत नाहीं. कारण, ती गोष्ट करण्याचा प्रतिबंध तिचा नवरा कायद्याच्या मदतीनें करितो. सारांश, मला असें वाटतें कीं, पुरुषांची बरीच संख्या या कामीं स्त्रियांस मनापासून साहाय्य करण्यास तयार झाल्याशिवाय स्त्रीदास्यविमोचनार्थ स्त्रिया आपण होऊन झटतील, अशी आशा करणें व्यर्थ आहे.



## भाग ४ था.



१. आतां एका प्रश्नाचा निर्णय करावयाचा राहिला. हा प्रश्न पूर्वी मी ज्या ज्या प्रश्नांचा विचार केला, त्यांपेक्षां कमी महत्त्वाचा नसून आमच्या प्रतिपक्ष्यांपैकीं ज्यांचीं मतें मुख्य मुद्याच्या संबंधानें अमळ बदललीं असतील ते तो प्रश्न मुद्दाम पुढें आणतील. तो प्रश्न असा—' आपल्या चालू असलेल्या रीतीभातींमध्यें बदल केल्यापासून आपणांस फायदा काय? तुमच्या ह्मणण्याप्रमाणें स्त्रियांस पूर्ण स्वातंत्र्य दिलें तर मानव जातीचें अधिक कल्याण होईल कीं काय? जर नाही, तर लोकांचीं मनें विनाकारण क्षुब्ध करण्यांत काय अर्थ आहे? व केवळ काल्पनिक हक्काच्या नांवानें समाजांत असंतोष उत्पन्न करण्याचा यत्न कां करावा?'

२. आतां या प्रश्नांपैकीं एकेका प्रश्नाचा आपण विचार करूं. स्त्रियांच्या प्रस्तुत स्थितींत विवाहसंबंधानें बदल व्हावा याविषयीं कोणास संशय असेल, असें मला वाटत नाही. विवक्षित स्त्रिया विवक्षित पुरुषांच्या आधीन करून टाकल्यामुळें असंख्य उदाहरणांवरून ज्या विपत्ति, जे दुराचार, ज्या अनेक प्रकारच्या वाईट गोष्टी आपल्या अवलोकनांत येतात, त्या इतक्या भयंकर असतात कीं, त्यांजकडे आपणांस दुर्लक्ष करितांच येत नाही. जे लोक अविचारी असतात व ज्यांस उघड बोलणें रुचत नाहीं असे लोक, ज्या गोष्टी प्रसिद्धीस

येतात व ज्यांत दुष्टपणा परमावधीस पोंचलेला असतो तेवढ्याच गोष्टी गणनेत धरून असे ह्मणतील की, अशी दुर्धर परिणामाची उदाहरणें थोडीच आढळतात. थोडीं कां होईनात; तथापि अशा वाईट गोष्टी घडतात व कांही कांही प्रसंगी मनुष्याची नीचता अतिरेकास पोंचते, हे कोणाच्यानेही नाकबूल करवणार नाहीं. आणि हे तर अगदी स्पष्ट आहे की, जोपर्यंत माणसांच्या हातांत सत्ता असते, तोंपर्यंत त्या सत्तेचा दुरुपयोग टाळतां येतच नाही. ही सत्ता किंवा हा अधिकार सज्जनांसच दिलेला असतो, अथवा साधारण सभ्य मानिलेल्या पुरुषांस मात्र देण्यांत येतो असे नाही; तर, जेवढे ह्मणून पुरुष, त्या सर्वांच्या हातांत ही सत्ता देण्यांत येते. अत्यंत नीच व पशुतुल्य आचरण करणाऱ्या पुरुषांच्याही हातांत ही सत्ता जाते. या सत्तेला वस्तुतः निर्बंध ह्मणून काय तो लौकिकाचा किंवा अब्रूचा. परंतु अशा नराधमांस लौकिक किंवा अब्रू ह्मणजे काय पदार्थ आहे हें मुळीच ठाऊक नसते. अशा पुरुषांनी जर कायद्यानें त्यांच्या स्वाधीन केलेल्या एखाद्या मनुष्यप्राण्याशीं क्रूर, पशुतुल्य व जुलमी आचरण केलें नाही तर इहलोकच्या वस्तीस स्वर्गस्थितिच प्राप्त झाली असे मानिलें पाहिजे. असे असल्यावर मग पुरुषांच्या दुष्ट प्रवृत्तीचें दमन करण्याकरिता कायद्याची तरी काय जरूर? विवाहसंबंधानें जो दासत्वाचा कायदा आढळतो तो प्रस्तुत सुधारलेल्या तत्त्वांस अगदी विरुद्ध आहे एवढेंच नव्हे, तर आधुनिक काळास भयंकर लांछन आहे. जी अनुभवजन्य प्रमेयें मोठ्या कष्टानें हळूहळू प्राप्त झाली आहेत व सर्वमान्य होऊन बसली आहेत, त्या सर्वांशीं तो विसंगत असा दिसतो. इंग्लंडाच्या राज्यछत्राखालीं दुसरी गुलामगिरी नाहीशी झाली. दासदासी नाहीशा झाल्या. पण ही गुलामगिरी मात्र अद्यापि कायमच आहे. संपूर्ण बुद्धिसामर्थ्य ज्यास आहे

अशा एका मानवी प्राण्याला दुसऱ्या मानवी प्राण्याच्या स्वाधीन करणे आणि तें अशा आशेने की, कदाचित् तो त्याला ममतेने वागवील व त्याच्या कल्याणाविषयी झटेल. खरोखर केवढा हा भ्रम! या सुधारलेल्या काळांत कायद्याने मान्य केलेली अशी एकच दासपणाची स्थिति उरली आहे, असे मी समजतो. कायद्याच्या दृष्टीनें कोणी कोणाचा दास नाही खरा. परंतु, प्रत्येक कुटुंबाची मालकीण ह्मणजे निवळ दासी होय.

३. तेव्हां आपल्या विषयाचा हा जो भाग आहे त्याच्यासंबंधाने 'फलश्रुति काय?' असा प्रश्न निघणार नाही. कदाचित् कोणी असे ह्मणेल की, तुह्मीं ह्मणतां त्याप्रमाणें समाजांत व्यवस्था झाली, किंवा बदल झाला, तर चांगल्यापेक्षां वाईट परिणाम फार होतील. हें कसेंही असो, पण याहीपेक्षां अधिक महत्वाचा दुसरा एक प्रश्न आहे. त्या प्रश्नांत मुख्यत्वे ज्या गोष्टीचा समावेश होतो त्या येणे प्रमाणे:— प्रस्तुत पुष्कळ कामें करण्याविषयी स्त्रियांस मनाई आहे किंवा त्या अपात्र मानल्या आहेत. ही मनाई किंवा ही अपात्रता दूर करणे, नागरिक जनांचे सर्व हक्क पुरुषांच्या बरोबरीने त्यांस देणे, सर्व प्रकारची उपयुक्त व प्रतिष्ठेची कामें करण्याचें सामर्थ्य ज्या शिक्षणाच्या योगाने त्यांच्या अंगी येईल ते शिक्षण त्यांस मिळेल अशी योजना करणें, इ०.

'स्त्रियांस पुरुषांच्या बरोबरीनें हक्क देऊं नयेत अशा विषयीं जी कारणें दाखविण्यांत येतात ती पुळपुळीत असतात, असे नुसते ह्मणणें उपयोगी नाही. तर हें वैषम्य दूर करून समतेचें तत्त्व व्यवहारांत आणल्यास फायदे कोणते होतील ते सांगा!' असें ह्मणणारे पुष्कळ आहेत. एवढ्याकरितां याच गोष्टीचा आपण विचार करूं.

४. प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे की, माणसा माणसांत

परस्पर जे अनेक संबंध असतात त्यांमध्ये अत्यंत सार्वत्रिक व व्यापक असा जो स्त्रीपुरुषसंबंध, तो अन्यायनिबद्ध न राहतां न्यायनिबद्ध होईल, हा पहिला फायदा. एकंदर मानव जातीस ही व्यवस्था किती हितावह व श्रेयस्कर होणार आहे, हे अधिक स्पष्ट करून सांगणें अशक्य आहे. ज्याला वाईट बरें, न्याय अन्याय हे शब्द कळतात, त्यास 'अन्यायाचे ठिकाणी न्याय होईल' एवढें सांगणे पुरें होणार आहे. मनुष्य जातीच्या एकंदर स्वार्थसाधक प्रवृत्ति, अहंभाव, अन्यायानें आपलें हित साधण्याची सवय, वगैरे सर्व दुर्गुणांचें मूळबीज, मूळउगम पाहूं जातां तो, स्त्रीपुरुषांच्या परस्परसंबंधाची प्रस्तुत जी व्यवस्था आढळते तिच्यांतच आहे, असें लक्षांत येईल. 'मी कितीही मंद-बुद्धि, मूर्ख, टोणपा असलों तरी पुरुषाच्या जन्मास मी ज्या अर्थी आलों आहे, त्या अर्थी एकंदर मानव जातींपैकी अर्ध्या माणसांच्यापेक्षां माझ्यांत कांहीं जरी गुण नसला, तरी मी श्रेष्ठ व शहाणा आहे,' अशी प्रत्येक मुलाची समजुत होणें, त्या मुलास किती हानिकारक होतें याचा विचार करा. अशी एखादी मुलगी असते कीं, ती आपल्यापेक्षां खरोखर श्रेष्ठ आहे असा दररोज किंबहुना घटकोघटकी त्या मुलाला अनुभव येत असतो. फार काय, जरी त्या मुलीच्या सल्लामसलतीनें तो मुलगा निरंतर आपलें वर्तन ठेवीत असला तरी जर तो बेटा मूर्ख असला तर या 'मुलाहून मी जातीची बायको असल्यामुळे कमी बुद्धीची व कमी अकलेची आहे' असें तिला वाटते.—आणि तो जर मूर्ख नसला तर याहीपेक्षां वाईट परिणाम होतो. तो कोणचा? तर ही आपल्यापेक्षां श्रेष्ठ आहे असें जाणूनसवरूनही 'मी हुकूम करणार आणि ही माझ्या हुकमाची बंदी, असा माझा अखत्यार व हक्क आहे,' असें त्याला वाटतें. अशा या समजुतीचा किंवा धड्याचा परिणाम त्याच्या

एकंदर वर्तनावर कसा होत असेल याचा आपणच विचार करा. हजारों पुरुषजातीय प्राण्यांच्या मनांवर हा दुष्ट ठसा पक्क्या रीतीनें बटतो, ही गोष्ट सुशिक्षित लोकांपैकीं पुष्कळांच्या स्वप्नींही नसते. ज्यांस सत्‌शिक्षण मिळाले आहे व ज्यांस विचारशक्ति प्राप्त झाली आहे, असे लोक स्त्रीपुरुषांमधील हा अनिष्ट भेद जितक्या रीतीनें टाळतां येईल तितक्या रीतीनें टाळण्याचा यत्न करीत असतात. विशेषेकरून मुलांच्या डोळ्यांपुढे तो जितका न येईल तितकें बरें, असे समजून तदनुसार वर्तन करितात. मुलांनी बापाचा मान राखावा व तसाच आईचाही राखावा अशी तजवीज ठेवितात. मुलांनी बापाची आज्ञा जशी मानिलीच पाहिजे तशीच आईचीही मानिली पाहिजे, अशी मुलांची समजूत करून देण्याचा यत्न करितात. भावांस आपल्या बहिणींवर हुकमत चालविण्याची किंवा शेखी मिरविण्याची सक्त मनाई असते, एवढेंच नाहीं, तर उलट आपल्यापेक्षा आपल्या बहिणींची काळजी आईबाप अधिक घेतात, असें पहाण्याचीच संवय मुलांस अधिक लावतात. होता होईल तितकें मुलींच्या सुखाविषयीं व सोईविषयीं मुलानी अधिक जपले पाहिजे, त्या जात्या नाजुक आहेत, त्या अबला आहेत, त्यांचे संरक्षण करणे, त्यांचा संतोष ठेवणें हेंच पुरुषाच्या जातीचे कर्तव्य आहे, ही गोष्ट मुलांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न असतो. त्याचप्रमाणे त्या मुलीस प्राप्त होणारें जें दास्य ( गुलामगिरी ) त्याची कल्पना मुलांच्या डोक्यांत न शिरेल अशाविषयी जपतात. अशा या कारणांनीं, ज्यांस चांगलें शिक्षण प्राप्त झाले आहे अशा श्रेष्ठ वर्गातील तरुण मुलांच्या मनावर लहानपणापासून दुष्ट संस्कार व्हावयाचा तो पुष्कळ प्रसंगीं टळतो. ही सर्व व्यवस्था लहानपणाची झाली. परंतु तींच मुलें जेव्हां मोठी होतात, व आपल्या वयांत येतात, तेव्हां जगांत कसकशा गोष्टी

खरोखर घडून येतात हे त्यांस पूर्णपणे कळते. वर सांगितलेल्या प्रकारचें वळण लहानपणीच मुलांस लागलें नाहीं, आणि जर निराळ्या प्रकारचें लागलें तर त्याचा किती वाईट परिणाम होतो, हे सभ्यघराण्यांतील पुष्कळ लोकांच्या ध्यानांत येत नाहीं. ' आपण मुलीच्या जातीपेक्षां किती तरी श्रेष्ठ आहों! कशी झाली तरी मुलगीच ती. आणखी आपण कसे झालो तरी पुरुष!' ही समजूत त्या पोराच्या अगदीं लहानपणापासून त्याला चिकटते. आणि अशी ही दुष्ट समजूत त्याच्या वाढीबरोबर वाढत जाते व त्याचें शरीर जसजसें दृढ व टणक होत जातें तसतशी तीही दृढ व टणक होत जाते. शाळेत पहावें तों मुलेंही तोच ठसा एकमेकांच्या मनावर बठवितात. अगदीं बाळपणापासूनच त्या पोराला वाटूं लागतें: ' आपल्या आईपेक्षां आपण किती तरी श्रेष्ठ व शहाणे आहों! अं: ती काय बोलून चालून वेडी! कशी झाली तरी बायकोच किनई! आपण तो तिला काय मान द्यायचा आहे? तिच्या अपराधाबद्दल मात्र एखादे वेळीं आपण तिला क्षमा केली पाहिजे!' विशेष करून ज्या वेळीं त्याचें लग्न होतें तेव्हां ज्या स्त्रीस तो आपल्या सुखदुःखाची वाटेकरीण करितो, तिच्यापेक्षां आपण किती मोठे, किती थोर. आपण जसे कांहीं सुलतान् व ती आपली जशी गुलाम आहे असें त्यास वाटूं लागतें! त्या मनुष्याचा, व्यक्तिदृष्ट्या किंवा समाजाचा एक अवयव अशा दृष्टीनें विचार केला, तर त्याच्या एकंदर वागणुकीवर वर सांगितलेल्या प्रकाराचा कांहींच दुष्ट परिणाम होत नाहीं, असें लोक समजतात काय? आपण राजघराण्यांत उत्पन्न झालों आहो, ह्मणून आपण वंशपरंपरेनेंच इतर सर्व माणसांपेक्षां श्रेष्ठ आहों व शहाणे आहों; किंवा सरदाराच्या घराण्यांत आपण उत्पन्न झालों ह्मणून आपण मूळचेच थोर आहों, ही

जी समजूत त्या समजुतीच्या बरोबरीचीच हीही समजूत आहे. नवरा व बायको, अथवा पति आणि पत्नी यांजमधील संबंध लॉर्ड आणि **व्हासल** ( ह्मणजे जमीनदार व त्याचा दास ) यांच्या सबंधासारखा असतो. अंतर इतकेच्च की, दासापेक्षां देखील पत्नीला पतीच्या अधिक आज्ञेत रहावें लागतें. परवशतेमुळें दासाच्या स्वतःच्या स्थितीवर किंवा वर्तनावर जो काय बरा वाईट परिणाम होत असेल त्याचा विचार एकीकडे ठेविला, तथापि जमीनदाराच्या वर्तनावर बराच वाईट परिणाम घडतो, हें कोणाच्याही ध्यानांत आल्याशिवाय रहाणार नाहीं. आपला रयतावा किंवा आपलीं ताबेदार कुळें, आपल्यापेक्षां खरोखर श्रेष्ठ आहेत, असें जमीनदारास कधीं तरी वाटत असेल काय? निदान आपल्या सारख्याच योग्यतेच्या माणसांवर आपण सत्ता चालवितों व हुकमत ठेवितों, हा परिणाम किंवा हें फल आपल्या प्रतापाचें, आपल्या श्रमाचें, किंवा आपल्या गुणांचें नसून, **फिगेरो*** ह्मणतो त्याप्रमाणें, जन्मास येण्याची जी तकलीफ आपण घेतली तिचें फल आहे, हें तत्त्व त्याच्या कधीं तरी ध्यानांत येत असेल काय? जशी आत्म-प्रतिष्ठा राजास वाटते, जशी आत्म-प्रतिष्ठा संस्थानिकास किंवा सरदारास वाटते, तशीच आत्मप्रतिष्ठा मानवी प्राण्यास वाटत असते! आपण न मिळविलेला मोठेपणा किंवा अधिकार ज्यांस प्राप्त होतो, त्यांना [illegible] त्या मोठेपणाची अथवा अधिकाराची शेखी मिरवून पोकळ डौल मारण्याची संवयच लागलेली असते.

---

* फिगेरो या नांवाचें एक विनोदी पात्र फ्रेंच नाटकांतलें आहे हीं नाटकें प्रसिद्ध असून त्याचीं नांवें ‘ Le Barbier de Seville ’ ( सेव्हील या गांवांतील न्हावी ) व ‘ Le Mariage de Figaro ’ ( फिगेरोचें लग्न ) अशीं आहेत या दोन नाटकाचा कर्ता बो मार्शेस ( Beau Marchais ) या नांवाचा होता पहिल्या नाटकांत फिगेरो हें पात्र एका विनोदी व हुषार न्हाव्याचें आहे दुसऱ्यांत एका राजाच्या हुजऱ्याचें आहे. फिगेरो या नांवाचें विलायतेंत एक विनोदी वर्तमानपत्रही आहे.

ह्मणजे, तसे केल्याशिवाय त्यांस रहावतच नाही. ज्यांनी कांही विशेष प्रकारचे हक्क अथवा अधिकार आपल्या गुणांनी मिळविलेले नसून ज्यांस ते वंशपरपरेने प्राप्त झाले आहेत अशा माणसांस, त्या हक्कांस किंवा अधिकारांस वस्तुतः आपण पात्र नाही असे वाटून ज्यांच्या अंगी उलट अधिक नम्रता येते, अशी माणसे जगात नेहेमी थोडीच आढळावयाची. आणि जी थोडी आढळतात ती सर्वांत उत्तम असतात. बाकीची माणसे ताठ्याने व वृथाभिमानाने भरलेली असतात. अशा माणसास जो अभिमान वाटत असतो तो आपल्या पराक्रमाने मिळविलेल्या गोष्टींविषयी वाटत नसून केवळ दैववशात् प्राप्त झालेल्या गोष्टींविषयीं वाटत असतो! आणि तेवढ्यावरून ते आपणांस किती तरी मोठे समजतात. एकदर स्त्री जातीपेक्षां आपण फार श्रेष्ठ आहों अशी यांची मूळची समजूत असून, त्या जातीपैकी एखाद्या तरी व्यक्तीवर अधिकार चालविण्याचा हक्क प्रत्येकास प्राप्त होतो. मग काय विचारावे? ज्यांची अंतःकरणे जात्याच कोमल व सदय असतात अशा माणसांना, सदसद्बुद्धि, ममता, व सहिष्णुता इत्यादि गुण शिकण्याची ती शाळाच होते, हे खरे. तथापि याच्या विरुद्ध स्वभावाची जी माणसे असतात, त्यांस, वृथा गर्व, नसता अभिमान, उन्मत्तपणा वगैरे दुर्गुण संपादन करण्याचा मात्र एक तालीमखानाच तयार होतो! घराबाहेर आपल्या बरोबरीच्या इतर पुरुषवर्गीय माणसांशी व्यवहार करितांना या आपल्या दुर्गुणांचा प्रतिरोध होईल, इतर माणसे हे आपले दुर्गुण खास सहन करणार नाहीत, अशी त्यांची पक्की खातरी असते. यामुळें, ज्या बिचाऱ्या माणसांत ते त्याचे दुर्गुण मुकाट्यानें सहन करणे भाग पडते त्यांजवरच ते उमळतात व उचल करितात. पुष्कळ प्रसंगीं बहुधा असे घडून येते की, घराच्या बाहेर जे दुर्गुण त्याला नाइलाजामुळें आवरून धरावे लागतात, त्यांच्या दोऱ्या घरांत आल्याबरोबर तो

एकदम सैल सोडून देतो. आणि तिकडला वचपा इकडे बिचाऱ्या आपल्या अभागी स्त्रीवर काढितो!

५. याप्रमाणे, संसाराच्या पायाची रचना ज्यासंबंधावर केलेली असते तो संबंध, समाजानें परस्पर व्यवहारांत मान्य केलेलीं जी मूलतत्त्वें, त्यांच्याशीच विसंवादी किंवा विसंगत असल्यामुळें, माणसांच्या मनोविकारांस जो कुसंस्कार घडत आहे व जें वळण लागत आहे, त्याचा फारच भयंकर व दुष्ट परिणाम घडत आहे. आणि मनुष्याचा स्वभावच असा कीं, असा हा परिणाम घडलाच पाहिजे. मात्र आपल्या सध्यांच्या अनुभवावरून पहातां, हा संबंध दूर केला असतां किंवा नाहींसा केला असतां, त्यापासून समाजाच्या स्थितींत इतकीं सुधारणा होईल कीं, त्या सुधारणेची कल्पना करणें देखील सध्यां आपल्यास दूरापास्त आहे. बळाच्या कायद्यापासून, ह्मणजे 'बळी तो कान पिळी' या तत्त्वापासून व्यक्तिमात्राच्या वर्तनावर घडणारे दुष्परिणाम दूर करून, त्यांच्या ठिकाणीं न्यायाच्या कायद्यापासून होणारे सुपरिणाम घडवून आणण्याचा प्रयत्न, सुधारणेच्या व शिक्षणाच्या द्वारे चालला आहे, तो सर्व व्यर्थ आहे. कारण, तो सर्व वरचा आहे; मूळ गाभ्याशीं गेलेला नाही. शत्रूच्या प्रत्यक्ष गढीवर हल्ला केला नाहीं, आणि वरून वरून कितीही गोळ्या मारल्या तरी शत्रू कायमच रहाणार! आधुनिक कालीं नीतिसंबंधानें व राजकारणसंबंधाचें सर्वमान्य तत्त्व ह्मटलें ह्मणजे 'गुणाः पूजास्थानं' हेंच होय. मीं अमक्याचा अमुक आहे असे ह्मणणारास आह्मी मानीत नाहीं. तर, मी अमुक एक प्रताप केला, किंवा अमुक एक गुण माझ्या अंगीं आहे असें जो सिद्ध करून दाखवील तोच मानार्ह होय, असें आपण समजतों. ज्याच्या त्याच्या क्रियेप्रमाणें ज्याची त्याची योग्यायोग्यता ठरणें

हेंच न्याय्य आहे, असें आपण ह्मणतो. अधिकार किंवा सत्ता जन्मावर अवलंबून असावी हे योग्य व न्याय्य नाहीं, तर गुणांवर अवलंबून असावी हेंच योग्य व न्याय्य आहे, असें आपण मानितो. नवऱ्याच्या अधिकारासारखा मूळचाच चिरकालीन अधिकार, ह्मणजे एका माणसानें दुसऱ्या माणसावर सत्ता करण्याचा हक्क, समाजानें जर दिला नसता, तर त्याला ( समाजाला ) एका हातानें कांहीं विवक्षित दुष्ट प्रवृत्तींचें लालन करावें व दुसऱ्या हातानें त्याच प्रवृत्तींचें निर्दालन करण्यास उद्युक्त व्हावें, असा प्रसंग आला नसता. शिवाय, इहलोकीं जन्मास आल्या घटकेपासूनच ज्या मार्गानें बालकानें गेलें पाहिजे त्याच मार्गानें जाण्याचें वळण त्यास लागलें असतें. आणि तो मोठा झाल्यावरही तो मार्ग सोडून भलत्याच मार्गानें जाण्याचाही संभव राहिला नसता. परंतु, जोंपर्यंत, बलवानाचा पगडा अबलांवर चालणें हा प्रकार समाजांत धडधडीत व राजरोसपणानें चालू राहील, तोंपर्यंत समाजाच्या सर्व बाह्य क्रिया, 'दुर्बलांस व प्रबलांस सारखेच हक्क आहेत' अशा तत्त्वावर किंवा अशा रोखानें चालविण्याचा यत्न करणें, ह्मणजे छातीवर डोंगर घेऊन पहाड चढण्यासारखेंच होणार आहे. कारण, न्यायाचें तत्त्व, ( ख्रिस्ती धर्माचेंही तत्त्व तेंच आहे, ) माणसांचे मनोविकार जोंपर्यंत उलट दिशेनें जात आहेत तोंपर्यंत त्यांच्या अंतःकरणांत बिंबणारच नाहीं, हें स्पष्ट आहे.

६. आपल्या मानसिक शक्तींचा उपयोग करण्याचें स्वातंत्र्य स्त्रियांस दिल्यापासून होणारा दुसरा एक फायदा आहे. तो हा. पाहिजे ते व्यवसाय करण्याची पूर्ण मुभा जर स्त्रियांस ठेविली, जीं जीं बक्षिसें व उत्तेजनें व्यवहारांत पुरुषांच्यासाठीं मात्र आहेत त्यांत स्त्रियांही विभागिनी केल्या, तर एकंदर मानव जातीचें ज्यांत अत्यंत हित आहे, किंवा ज्या गोष्टी मनुष्यसमुदायास अत्यंत श्रेयस्कर होत, अशा

गोष्टींच्या उपयोगी पडण्यासारखें जे ज्ञान अथवा जी मानसिक शक्ति, ती दुपटीनें वाढली, असें होणार आहे. उत्तम उपदेशक, उत्तम कारभारी, अशासारखी लोकांचें हित करणारी व एकंदर सुधारणेच्या कामास झटणारी माणसें घेतली, तर हल्लीं जेथें एक एक माणुस आहे, तेथें दोन दोन निपजण्याचा संभव आहे. हल्ली कोणत्याही प्रकारचें बुद्धि-सामर्थ्य पाहिलें तरी आपणांत अगोदर फारच कमी आहे. ज्या कामाला बरेंच बुद्धि-सामर्थ्य लागतें, असें हरएक काम उत्तम रीतीनें करणाऱ्या माणसांची आधींच फार कमताई आहे. यामुळे, जगांतील एकंदर बुद्धि-सामर्थ्यापैकीं अर्धे बुद्धि-सामर्थ्य जगाला नाहींसें करून टाकणें, ही हानि खरोखर फारच मोठी आहे. आतां, हें बुद्धि-सामर्थ्य सर्वथा फुकट जात नाहीं, ही गोष्ट खरी. कारण, त्यापैकीं बऱ्याच अंशाचा उपयोग गृहव्यवस्था व स्त्रियांस वर्ज्य केले नाहींत असे जे इतर कांहीं उद्योग, यांत होतो; आणि बाकी राहिलेला अंश कांहीं विशेष व्यक्तींच्या हितास अप्रत्यक्ष रीतीनें कारणीभूत होतो. ह्मणजे, विवक्षित पुरुषांवर विवक्षित स्त्रियांचें जें वजन असतें, त्यासंबंधानें त्या पुरुषांचें हित होण्याचा संभव असतो. परंतु, हे फायदे गणनेत घेतां येत नाहीत. कारण, त्यांचें क्षेत्र अत्यंत संकुचित असतें. मनुष्याच्या बुद्धीची एकंदर एक मोठी रास केली, तर त्या राशीपैकीं निम्मे रास जी हल्ली बंधांत आहे, ह्मणजे अगदीं कुलपांत घातल्यासारखी आहे, ती बंधमुक्त केली तर अर्थात् समाजास उपयोगी पडणारी ही जी नवीन शक्ति तिच्यांतून वर सांगितलेल्या प्रकारानें प्रस्तुतच्या व्यवस्थेतही उपयोगांत येणारी शक्ति मजुरा घालणें वाजवी आहे, हें मी कबूल करितों. तथापि, दुसरा असा विचार केला पाहिजे कीं, स्पर्धेच्या किंवा अहमहमिकेच्या योगानें पुरुषांच्या बुद्धीसही एक प्रकारची स्फूर्ति, किंवा उत्तेजन येणार आहे. हा लहान सहान फायदा होणार आहे काय? कारण, ज्यांस

बुद्धि-सामर्थ्याचीच अपेक्षा ज्यास्त आहे अशा समाजाच्या एकंदर मोठमोठ्या उलाढालींत स्त्रियांपेक्षां आपली उपयुक्तता अधिक आहे, किंवा पुढें सरसावण्यास स्त्रियांहून आपणच अधिक योग्य आहों, असें सिद्ध करून दाखविणें पुरुषांस भाग पडणार आहे.

७. याप्रमाणे मनुष्यजातीच्या बुद्धि-सामर्थ्यांत, विशेषेकरून तिच्या कामाची व्यवस्था चांगल्या रीतीनें लागण्यास अवश्य अशी जी बुद्धि, त्या बुद्धींत ही मोठी भर पडणार आहे. हा जो फायदा व्हावयाचा तो, स्त्रियांस प्रस्तुत मिळत आहे त्यापेक्षां अधिक चांगलें मानसिक शिक्षण मिळण्यापासूनच होणार. आणि त्यांच्या शिक्षणांत सुधारणा व्हावयाची ती पुरुषांच्या शिक्षणाबरोबरच व्हावयाची, हेंही उघडच आहे. सामान्य व्यवहार, सार्वजनिक व लोकहिताचीं कामें व मोठमोठ्या तत्त्वविचाराच्या गोष्टी समजण्याचा अधिकार, समाजाच्या एका विवक्षित वर्गांतील पुरुषांच्या बरोबरीनें त्याच वर्गांतील स्त्रियांसही प्राप्त होईल. इतर माणसांनी जी मोठमोठी कामे अथवा जे मोठमोठे विचार केले असतील ते समजण्यापुरता अधिकार तर ज्यांस आहेच—परंतु स्वतांही मोठमोठी कामें व मोठमोठे विचार करण्याचा अधिकारही ज्यांच्या अंगी आहे, अशा प्रकारच्या स्त्रीपुरुषात्मक उभय वर्गांतील थोड्या निवडक माणसांना आपापली ज्ञानसंपत् वाढविण्यास व आपापल्या बुद्धीस सुधारण्यास व योग्य वळण देण्यास एकसारख्या सोई होतील, व एकसारखींच साधनें प्राप्त होतील. याप्रमाणें, पुरुषांच्या बरोबरीचें शिक्षण स्त्रियांस दिल्याच्या योगानें व एकाच्या शिक्षणांत कालवशात होणाऱ्या सुधारणांचा फायदा दुसऱ्यासही मिळत गेल्याकारणानें, स्त्रियांच्या व्यवसायाचें क्षेत्र विस्तृत होऊन जगाचें बहुत कल्याण होणार आहे. पण हाही विचार एकीकडे ठेविला, तरी स्त्रियांच्या

मार्गांत ठेविलेली ही आडकाठी नुसती दूर करण्यानें देखील शिक्षण-दृष्ट्या अत्यंत उपयुक्त व अत्यंत इष्ट असा परिणाम होणार आहे. मनुष्याच्या विचाराचे व व्यवसायाचे जे जे मोठे विषय आहेत, ज्या ज्या गोष्टी केवळ खासगी संबंधाच्या नसून सार्वजनिक हिताच्या आहेत; असे सर्व विषय, अशा सर्व गोष्टी, पुरुषांचीं कामें आहेत, त्यांत आह्मां बायकांचा कांही संबंध नाहीं, त्यांपैकीं बहुतेक आह्मांस सर्वथा निषिद्ध आहेत,—ही नुसती कल्पना जरी नष्ट झाली, किंवा दूर करितां आली, तरी देखील किती फायदा होणार आहे ? इतर मानवी प्राण्यांप्रमाणेंच आपणही एक मानवी प्राणी आहों, आपले उद्योग आपणांस पहाण्याचा व पसंत करण्याचा पूर्ण अधिकार आहे, मानवी प्राण्यांच्या हिताच्या हरएक बाबतीत लक्ष पुरविण्यास आपल्यालाही हक्क आहे, प्रसंग आहे, उत्तेजन आहे; व्यक्तिविशिष्टमताला जे वजन असते, त्याची जी मातबरी लोक समजतात तशा प्रकारचें वजन व तशा प्रकारची मातबरी माणसांच्या सर्व उलाढालींत आपल्याही मताला द्या ह्मणून ह्मणण्याचा आपणांसही अधिकार आहे. मग आपण त्या उलाढालीत प्रत्यक्ष असलों किंवा नसलों तरी हरकत नाहीं. असें प्रत्येक स्त्रीला वाटणें, आपल्या ठिकाणीं अशा प्रकारचा विश्वास प्रत्येक स्त्रीच्या ठायीं उत्पन्न होणें, एवढ्यानेंच देखील केवढें मोठें कार्य होणार आहे ? एवढ्यानें सुद्धां स्त्रियांच्या बुद्धि-सामर्थ्यास केवढा विस्तार प्राप्त होणार आहे ? त्यांचे नीतिविषयक विचार किती उदात्त होणार आहेत ? त्यांची सदसद्विवेकशक्ति किती प्रसृत होणार आहे ?

८. हल्लीं जगांत अक्कल इतकी खचित सवंग झाली नाही कीं सृष्टीनें दिलेला जो बुद्धीचा गड्डा त्यापैकीं अर्धा भाग आपणांस गरज नाहीं ह्मणून टाकून द्यावा ! तो टाकून न देतां माणसांचे कारभार उत्तम रीतीनें चालवितां येण्यास अवश्य व उपयुक्त अशी जी व्यक्ति-

विशिष्ट बुद्धि तिच्या राशीत जर आणखी भर पडत असेल तर ती अगत्य पडूं द्यावी. माणसांच्या ज्या एकंदर समजुती व जे एकंदर विचार त्यांजवर स्त्रियांच्या विचारांचा अधिक परिणाम होईल असें ह्मणण्यापेक्षां अधिक श्रेयस्कर व हितावह परिणाम होईल असें ह्मटलें पाहिजे. 'अधिक श्रेयस्कर होईल' असे ह्मणण्याचा हेतु एवढाच की, मनुष्याचा जितका इतिहास उपलब्ध आहे त्यांतील अगदीं प्रारंभापासून पाहतां स्त्रियांच्या विचाराचा दाब अथवा स्त्रियांचे वजन एकदर लोकमतावर बरेच असल्याचे आढळून येते. आपल्या मुलांच्या वर्तनावर लहानपणी आईच्या शिक्षणाने होणारा परिणाम, तरुण स्त्रियांनी आपणांस वाखाणावे एतद्‌विषयी तरुणांची उत्कट इच्छा, हे प्रकार सर्वविश्रुत आहेत. ज्या ज्या कालाचा इतिहास उपलब्ध आहे, त्या त्या काली पुरुषांच्या वर्तनावर मोठे महत्त्वाचे परिणाम घडवून आणण्यास स्त्रिया बऱ्याचकारणीभूत झाल्या. एवढेच नाही तर सुधारणेचे पाऊल पुढे पडण्यास मुख्यत्वे त्याच सहाय्यभूत झाल्या. **होमर** ह्मणून ग्रीक लोकांत जो महाकवि होऊन गेला, त्याचे वेळीही अशीच कल्पना होती. **हेक्टर** ह्मणून त्याच्या काव्यांतील मुख्य नायक आहे, त्याच्या वर्तनावर सदरहू काव्यांतील नायिकेच्या हातून सर्वमान्य व महत्त्वाचे असे परिणाम घडवून आणिले आहेत. नीतिदृष्ट्या स्त्रियांच्या संबंधानें पुरुषांवर जे परिणाम घडत असतात ते दोन प्रकारचे घडत असतात. त्यांतला पहिला प्रकार ह्मटला ह्मणजे, पुरुषांची कठोर व निर्दय अंतःकरणे मृदु व सदय करणें! काम, क्रोध, लोभ, मोह, उन्माद अशा उग्र मनोविकारांच्या तडाक्यांत सांपडून अंध झालेल्या पुरुषांच्या हातून व्हावीं तितकीं क्रूर व निंद्यकर्मे झालीं नाहींत व बलात्काराचा किंवा जुलुमाचा अतिरेक झाला नाहीं, असे जेथे जेथें आढळेल, तेथें

तेथें असे समजावें कीं स्त्रियांनीं आपला पगडा व आपलें वजन कांहीं तरी बसविलें खास! ज्यांना युद्धकलेत शिक्षण मिळालें नव्हते, त्यांनी युद्धाहून अन्य कोणत्या तरी मार्गानें आपापल्या तंट्यांचा निकाल करून घ्यावा, हाच पक्ष उत्तम असा सहजींच अभिप्राय दिला. सामान्यतः आपले स्वार्थसाधक मनोविकार यथेच्छ तृप्त करून घेण्यानें ज्यांस अत्यंत पीडा सोसावी लागली व ज्यांची फार मोठी हानि झाली, त्यांनीं त्यांनीं मनोविकाराचा प्रतिरोध करण्यास साधनीभूत होणारा नीतिसंबंधाचा कायदा निघाल्यास त्यास त्यांनीं आपला पूर्ण आश्रय दिला. ख्रिस्ती धर्मापूर्वी जितके धर्म होऊन गेले, त्यापेक्षां ख्रिस्ती धर्म स्त्रियांस अधिक अनुकूल असल्यामुळे, ह्मणजे ख्रिस्तीधर्म स्त्रियांचा अधिक कैवारी असल्यामुळे, उत्तरेकडून आलेल्या लोकांनीं ज्या समयी यूरोपात स्वाऱ्या केल्या त्या समयीं त्यांच्याकडून ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करविण्याच्या कामांत मुख्यतः स्त्रियांच साधनीभूत झाल्या. * **अँग्लो-साक्सन्** व **फ्रँक** लोकांचे धर्मांतर करण्यास प्रथमारंभ, † **एथेल्बर्ट** व ‡ **क्लोव्हिस्** ह्मणून जे त्यांचे पहिले राजे होते त्यांच्या बायकांनी केला, असें ह्मटलें असतां चालेल. स्त्रियांच्या मताच्या योगानें पुरुषांच्या मनावर घडलेल्या परिणामांचा दुसरा प्रकार असा झाला की, शौर्य, धैर्य इत्यादि जे गुण त्यांच्या स्वतांच्या अंगीं नव्हते ते आपल्या संरक्षकांच्या ( पुरुषांच्या ) अंगीं असलेच पाहिजेत, असें समजून स्त्रियांनीं त्या गुणांचें होईल तितकें प्रोत्साहन केलें. सर्व काली, पलटणी लोकांस

---

* या गोष्टीच्या संबंधानें बुद्ध धर्माच्या प्रसाराचा इतिहासही ध्यानांत आणण्यासारखा आहे. विशेषत **किसा गोतमी** व **सुजाता** यांच्या कथा व **अम्बा पाली** या नांवाच्या वेश्येला **गौतमानें** पावन करून **बुद्ध** धर्मांत घेतली, या कथा बोधप्रद असून फार मनोरंजक आहेत.

† हा ख्रिस्ती शकाच्या नवव्या शतकांत होऊन गेला.

‡ हा ख्रिस्ती शकाच्या पांचव्या शतकांत झाला,

अवश्य लागणारे धैर्यादि सद्गुण हे स्त्रियांनीं आपणांस वाखाणावे, अशी पुरुषांच्याठायीं उत्पन्न होणारी जी उत्कट इच्छा, त्या इच्छेची फलें होत. एवढेच नव्हे. तर याचा आणखी पुढे असा परिणाम होतो की, शौर्य, वीर्य, बल इत्यादि उदात्त गुण ज्यांच्या अंगीं आहेत, त्यांस स्त्रिया वाखाणूं लागल्या व त्यांवर स्त्रियांनीं आपली पूर्ण मेहर नजर दाखविली ह्मणजे पुरुषांनीही त्यांची वाखाणणी करावी व त्यांस बहुमान द्यावा, असा प्रकार घडत असतो. नीतितत्त्वाचे उत्पादक हे जे दोन प्रकार, त्यांच्या सयोगापासून वीरकालांतील जें मुख्य तत्त्व ( Chivalry ) ते उत्पन्न झालें.* या तत्त्वाचें मुख्य लक्षण ह्मटले ह्मणजे, युद्धकर्मास लागणारे शौर्यवीर्यादि अत्यत उदात्त असे जे गुण, त्या गुणांबरोबरच सुशीलता, उदारता, आत्मनिग्रह इत्यादि अगदी भिन्न जातीचे गुण उत्पन्न करणें. अर्थात् जीं मनुष्यें युद्धपराङ्मुख व आपलें रक्षण करण्याविषयीं असमर्थ होतीं, त्यांच्या हिताचे संबंधानें हे सत्वगुण युद्धपटु माणसांच्या अंगीं असणे अवश्य होतें. त्या गुणां-

* आपल्या इकडे रामायण, महाभारत वगैरे काव्यांतून व पुराण कथांमधून ज्या कालाचें वर्णन आढळतें त्या कालास ' वीरकाल ' ( Chivalrous times ) असें ह्मणतां येईल. या कालाचें मुख्य दर्शक किंवा लक्षण ह्मटलें ह्मणजे, स्वयंवर ! सुंदर अशा राजकन्यांनीं पार्थासारखे किंवा रामचंद्रासारखे जे प्रतापशाली धनुर्धर वीर, त्यांचा पराक्रम अवलोकन करून व त्यांच्या धैर्यशौर्यादि उदात्त गुणांवर मोहून त्यांच्या गळ्यांत माळ घालावी, व तीही प्रसिद्धपणें—ह्मणजे, अनेक राजकुमारांचा व अनेक वीरांचा फार मोठा समुदाय जेथें जमला आहे, एकमेकांचा पराक्रम पहाण्याविषयीं जे उत्सुक होऊन गेले आहेत, जिच्याकडे सर्वांचे डोळे लागून गेले आहेत, ' ही तरुणी आपणास माळ घालील काय ! ' अशा उत्कंठेनें आपल्या पराक्रमाची परमावधि करण्याविषयीं ज्यांच्या अंतःकरणांत मोठी आतुरता उत्पन्न झाली आहे, अशा प्रसंगीं त्यांतील एखाद्या वीरानें बाकीच्या सर्व वीरांस जिंकून ठरलेला पण पूर्ण करून त्या नायिकेस वरावें व मग सर्व प्रेक्षकांनीं त्या उभयतांचा जयजयकार करावा. असा हा प्रकार ज्या कालीं घडत असे, त्या कालास इंग्रजींत ' वीर-काल ' अशा अर्थाचें नांव आहे. वाल्टर स्कॉट् या नांवाचे जे प्रसिद्ध कादंबरीकार होऊन गेले त्यांनीं केलेल्या टालिसमन्, आयव्हॅनो वगैरे कादंबऱ्यांतून या वीरकालाचीं फार सुंदर चित्रें रेखलीं आहेत.

पैकींच विशेषतः स्त्रियांविषयीं पूज्यभाव व नम्रभाव असणे हा एक होता. आपले रक्षण करण्याचें सामर्थ्य ज्यांच्या अंगीं नव्हते, अशा पुरुषांत व स्त्रियांत मुख्य भेद हा होता कीं, त्यांस बलात्कारानें वश करून न घेतां जे केवळ आर्जव-शक्तीनें, सौम्य प्रकारानें, त्यांचीं अंतः-करणें वश करून घेण्याचा व त्यांची कृपा संपादन करण्याचा यत्न करीत त्यांस मोठमोठ्या देणग्या आपल्या राजीखुषीनें व केवळ मेहर नजर होऊन देण्याची शक्ति स्त्रियांच्या हातांत होती. नेहमी असें आढळतें कीं, कोणची वहिवाट किंवा चाल, मूळ हेतुपासून बरीच सुटलेली असते. याच न्यायास अनुसरून वीरकालीं पडलेला हा प्रघात किंवा ही प्रवृत्ति, मूळच्या उद्देशास अथवा कल्पनेस पूर्णपणें अनुलक्षून नव्हती, हें जरी खरे आहे, तरी हेंही खरें कीं, मानव जातीच्या नीति-विषयक इतिहासांत हा वीरकालीन प्रघात, एका अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीप्रमाणे मानिला पाहिजे. अत्यंत अव्यवस्थित छिन्नभिन्न झालेल्या समाजानें, त्या वेळच्या ज्या ओबडधोबड संस्था होत्या, व त्या वेळची जी एकंदर लोकस्थिति होती, त्यांच्या फार पुढें जाऊन, अशी ही नीतिप्रवर्तक कल्पना निर्माण केली व तीही एका जुटीनें व एका विचा-रानें प्रवृत्तींत आणण्याचा यत्न केला, हें एक ध्यानांत ठेवण्यासारखें उदाहरण होय. आणि यद्यपि या प्रघाताचा मुख्य उद्देश सिद्धीस गेला, असे ह्मणतां आले नाही, तथापि हेंही खरें कीं, तो सर्वथा निष्फळ झाला, असेंही ह्मणतां येणार नाहीं. कारण, ज्या कालीं हा प्रघात रूढ झाला, त्याच्या पाठीमागील सर्व काळावर त्या प्रघाताचा ठसा फारच उत्तम तऱ्हेनें वठला गेला, असें दिसतें.

९. ही वीरकालीन कल्पना ह्मणजे, मानवजातीची नीतिसंबंधानें जी सुधारणा झाली तिजवर स्त्रियांच्या विचाराचा व उद्गाराचा जो परिणाम घडला, त्याची अगदीं सीमाच झाली. तेव्हां आतां यापुढें

जर स्त्रियांची ही परवशतेची स्थिति कायम राहणार असेल तर तो सरदार-बहादुरीचा काळ नाहीसा झाला व त्याजबरोबरच ती उदात्त कल्पनाही नाहींशी झाली, ही गोष्ट खरोखर फार शोचनीय मानली पाहिजे. कारण, त्या वशतेच्या स्थितींत माणसांची मनें नीतिभ्रष्ट करणाऱ्या ज्या गोष्टी त्यांचे परिणाम त्या कल्पनेमुळेच व्हावे तितके बाधक झाले नाहीत. परतु, माणसांच्या एकंदर स्थितींत पुष्कळ बदल झाल्याकारणाने वीरकाली रूढ झालेली कल्पना बदलून, तिच्या ऐवजीं अगदी भिन्न प्रकारची कल्पना बसविणे भाग पडले. तो सरदार-बहादुरीचा व पराक्रमशालित्वाचा काळच असा कांहीं होता कीं, त्या वेळी प्रत्येक वाईट बरी गोष्ट होणे ती एकाच व्यक्तीच्या पराक्रमावर अवलबून असे. ह्मणजे, एखाद्या व्यक्तीच्याठायीं उदारता, सुशीलता, सदयता, इत्यादि सत्वगुण वास करीत असतील तर त्यांचा चांगला परिणाम पुष्कळांवर होई. आणि याच्या उलट तमोगुण असतील तर त्यांचे वाईट परिणाम पुष्कळ संख्येस भोगावे लागत. अशा समाजांत नीतितत्त्वांचा प्रसार व्हावा, ह्मणजे, मनुष्याच्या स्वभावांतील तमोगुणांचा भाग कमी होऊन, किंवा त्यांस सौम्यस्वरूप प्राप्त होऊन, सत्वगुणांचा उदय व्हावा एतद्विषयींचा यत्न, हेंच वीरकालाचे मुख्य लक्षण होते. आधुनिक समाजांत हरएक गोष्टींत—फार काय--युद्धाच्या कामांतही, ह्मणजे पलटणी खात्यांत देखील, निर्णय ठरावयाचा तो एकाच व्यक्तीच्या प्रयत्नावर अवलंबून राहत नसून बहुसंख्येच्या, व संहत प्रयत्नाच्या अनुरोधाने ठरत असतो. प्राचीनकाळी समाजाचा, लढाई करणे हाच मुख्य व्यवसाय होता. तो बदलून, व्यापार कारागिरी, कृषिकर्म वगैरे शांततेचे व्यवसाय समाजांत शिरले. अर्वाचीन समाजास ही जी नवी स्थिति, हें जें नवीन स्वरूप प्राप्त झाले आहे, त्यास उदारता, सदयता वगैरे गुणांची अपेक्षा प्राचीन समाजाहून कमी आहे

असे नाही. परंतु आधुनिक समाज पूर्वीप्रमाणे या गुणांवरच सर्वथा अवलंबून राहिलेला नाही. आधुनिक कालच्या नीतीचा पाया मुख्यत्वे-करून न्याय, दूरदृष्टि, परस्परांची सोय, व उपयुक्तता या गोष्टींवर रच-लेला आहे. प्रत्येकानें दुसऱ्याचे हक्क मानावे, ज्याने त्याने आपापल्या पुरती काळजी घ्यावी, आणि आपापलें हित साधावे, हेच सार्वजनिक नीतीचें मुख्य तत्त्व आजकाल समजतात. पूर्वीच्या त्या सरदार-बहादुरी-च्या काळी सर्व प्रकारचे गुन्हे, कायदेशीर शासनाचा अभाव असल्यामुळे यथेच्छपणाने घडत. मार्गाची गोष्ट करणे, गैर मार्गाने न जाणें अशा संबंधाचा निर्बंध, अथवा दुर्वृत्तपणा टाकून सद्वर्तन करण्याविषयीं उत्ते-जन त्या काळी फारच थोड्यांस असे. जे थोडे लोक सन्मार्गास अनुसरत त्यांस तसे करण्यास स्तुति व पूज्यभाव हीच प्रवर्तक कारणे अथवा साधने होत. परतु नीतीचा पाया खरोखर शासनावर रचलेला असतो. ह्मणजे शासनाच्या भीतीमुळें माणसे नीतीनें चालत असतात. वाईट गोष्ट करण्यापासून माणसास पराङ्मुख करण्याच्या शक्तीवर नीति नेहमी अवलंबून असते. समाजाची सुरक्षितता प्रत्येक व्यक्तीच्या केवळ सदसद्बुद्धीवर सोपविल्याने राहत नाही. चांगली गोष्ट करणें हेंच योग्य आहे, ह्मणून आपण सन्मार्गानें वर्तन करावें असें प्रत्येक व्यक्तीला वाटतच असेल, अशा समजुतीने स्वस्थ बसल्यास लोकांचें रक्षण होणार नाहीं व समाजांत व्यवस्था राहणार नाही. कारण, चांगली गोष्ट, चांगली ह्मणूनच आपण केली पाहिजे हा हेतु थोड-क्याच माणसांच्या अंतःकरणांत बिबलेला असतो. पुष्कळ माणसां-च्या मनावर या हेतूचा मुळींच कांहीं परिणाम किंवा संस्कार घडत नाहीं. आधुनिक समाजास सुधारणेच्या योगानें पूर्वीपेक्षां श्रेष्ठ प्रका-रची संघशक्ति प्राप्त झाली असल्यामुळे प्रपंचांतील व व्यवहारांतील हरएक कामीं घडणाऱ्या अपराधास शासन करण्याचें सामर्थ्य त्याचे

अंगीं आलें आहे. यामुळें, समाजांतील अनाथ व दुर्बल लोकांचें रक्षण कायद्यानें होत असून जुलूम करण्याच्या स्थितींत जे लोक असतात त्यांच्या केवळ सदयतेवर त्यांस अवलंबून रहावें लागत नाही व जीवयात्रा सुसह्य होते. त्या वीरकालच्या कल्पनेचें सौंदर्य व मनोहरत्व ही नष्टप्राय झालीं नसून जशींच्या तशीच अद्यापही कायम आहेत, असें ह्मटलें तरी चालेल. परंतु दुर्बल मनुष्यांचे हक्क व मनुष्याच्या संसारांतील एकंदर सोई पूर्वींपेक्षां अधिक सुदृढ व अधिक निश्चित अशा पायावर अधिष्ठित झाल्या आहेत. किंवा, असें ह्मटलें पाहिजे कीं, या नियमास वैवाहिकसंबंध मात्र अपवादक आहे.

१०. सांप्रतकाळीही नीतिसंबंधानें पुरुषांवर स्त्रियांचें जें पूर्वकाळीं वजन होतें व जो एक प्रकारचा दाब होता तो कमी झाला आहे असें नाहीं. परंतु पूर्वींसारखा इतका उघड व निश्चित प्रकारचा नाहीं. हल्लीं ह्मटलें ह्मणजे, पुरुषांवर लोकमताचा जो साधारण दाब असतो त्या दाबांतच स्त्रियांचा दाब मिसळून गेल्यासारखा झाला आहे. भूत-दयेच्या किंवा अनुकंपेच्या संसर्गानें, व स्त्रियांनीं आपणांस बरें ह्मणावें, त्यांचीं अंतःकरणें आपल्याकडे ओढली जावीं अशी जी पुरुषांची इच्छा असते तिच्या योगानें, अशा दोन्ही कारणांनीं, त्या वीरका-लीन कल्पनेपैकीं जितका भाग अद्यापि कायम आहे, त्यास सजीव ठेवण्याच्या कामांत स्त्रियांच्या मनोभावांचा फार मोठा उपयोग होतो. पुरुषांच्याठायीं एक प्रकारचें पाणी किंवा तरतरी व उदा-रता या गुणांचा परिपोष अद्यापही स्त्रिया करीत आहेत व ती वीरकालीन कल्पनेची परंपरा बऱ्याच अंशानें चालवीत आहेत. या गुणांत किंवा या बाबतींत पुरुषांच्या पेक्षां स्त्रियांचें प्रमाण अधिक आहे. न्यायाच्या कामांत त्यांचे मान पुरुषांच्या पेक्षां कांहींसें कमी

आहे. ही झाली सार्वजनिक संबंधाची गोष्ट. आतां खाजगीच्या संबंधाचा विचार करितां, एकंदरींत स्त्रियांच्या ,सहवासानें पुरुषांच्या मनावर जे संस्कार घडत असतात त्यांवरून असें दिसतें कीं, सौम्य प्रकारच्या गुणांस उत्तेजन मिळतें व कठोरपणाचे, ह्मणजे दृढता, स्थिरता, व निष्ठुरता, इत्यादि प्रकारचे जे गुण त्यांस उत्तेजन न मिळून ते हतवीर्य होतात. संसारकृत्यांत सद्गुणाची परीक्षा होण्याचे जे मोठमोठे प्रसंग येतात त्यांत मुख्य प्रसंग ह्मटला ह्मणजे **स्वार्थ** व **सहनशीलता** या दोहोंचा जेव्हां लढा पडतो तो प्रसंग. अशा प्रसंगीं पुरुषांच्या मनावर स्त्रिया जे परिणाम घडवून आणतात त्यांचे स्वरूप मिश्र प्रकारचें असतें. स्त्रियांना प्रस्तुत जें धर्मसंबंधाचें किंवा नीतिसंबंधाचें शिक्षण मिळतें, त्या शिक्षणापासून त्यांच्या मनावर निश्चित अशा फारच थोड्या गोष्टी ठसलेल्या असतात. पुरुषांच्या ठायीं सद्गुणाचा उदय करण्यास एखादी गोष्ट बरीच कारणीभूत झाली तर ती त्या थोड्या गोष्टींपैकीं असली तर होते. स्त्रिया आपल्या पतीस किंवा आपल्या पुत्रांस असा एखादे वेळीं मनोनिग्रह करण्यास लावितात कीं, त्यांच्या प्रेरणेशिवाय त्यांनीं कधींही तो निग्रह केला नसता. असें कधीं कधी घडतें, नाहीं असें नाहीं. तथापि स्त्रियांच्या प्रस्तुतच्या स्थितीचा व एकंदर शिक्षणाचा विचार केला असतां नीतीचीं ह्मणून जी तत्त्वें त्यांच्या मनावर ठसलीं जातात, त्यांचा समावेश खरी नीति किंवा खरा धर्म यांत फारच थोड्या अंशानें होतो. शिवाय, तीं तत्त्वें मुख्यत्वें करून निषेधात्मकच असतात. अमुक अमुक कृत्यें आपण करूं नयेत, एवढेंच काय तें त्यांस शिकविलेलें असतें. परंतु, आपल्या विचारांस व उद्देशांस कोणती दिशा लावणें योग्य आहे एतद्विषयींचा सामान्य नियम जाणण्या पुरते ज्ञान त्यांस झालेलें नसतें. संसारांतील साधारण वर्तनांत निःस्वार्थता ठेवणें,

ह्मणजे ज्या कामांमध्यें कुटुंबाच्या प्रत्यक्ष हिताचा किंवा कायद्याचा संबंध नसतो, अशा कामांत बुद्धिसामर्थ्य व शरीरसामर्थ्य खर्ची घालणें, या गुणास स्त्रियांच्याकडून उत्तेजन किंवा आश्रय क्वचित्च मिळतो, असें ह्मणणे मला भाग पडत आहे. आणि याबद्दल मला खरोखर दिलगिरी वाटते. पण वस्तुतः यांत स्त्रियांचा तरी काय दोष? त्या विषयांपासून किंवा व्यवसायांपासून होणाऱ्या फलाची कल्पना त्यांस होतच नाही. ज्यांत गुंतून गेल्यामुळें आपल्या कुटुंबाच्या पुरुषांपासून त्यांचा वियोग होतो, व कुटुंबाच्या सुखसमाधानास जे व्यवसाय बाधक होतात, अशा व्यवसायांत किंवा अशा विषयात पुरुष मन घालूं लागले असतां त्यांत स्त्रिया मोडा घालतात, यांत त्या बिचाऱ्यांचा काय दोष आहे? कसेंही असो. एकंदरीत स्त्रियांचे वजन सार्वजनिक गुणाच्या उत्कर्षास वारंवार विघातक होते, एवढी गोष्ट खरी.

११. सार्वजनिक कामांत जेव्हांपासून स्त्रियांच्या व्यवसायास अधिक अवकाश सांपडूं लागला; केवळ आपल्या कुटुंबाच्या अथवा गृह-व्यवस्थेच्या पुरताच आपल्या बुद्धीचा व्यय करावयाचा, हे शास्त्र सोडून देऊन सामाजिक हिताच्या गोष्टीतही आपलें मन घालावे असें वाटूं लागणाऱ्या स्त्रियांची संख्या जेव्हांपासून बरीच वाढूं लागली, तेव्हांपासून सामाजिक नीतीवरही त्यांची बरीच छाप बसूं लागली. अर्वाचीन युरोपियन उलाढाली पैकी अत्यंत महत्त्वाच्या अशा दोन बाबतीत स्त्रियांच्या हालचालींपासून बरेच मोठे परिणाम घडून आले आहेत. त्या दोन गोष्टी कोणत्या ह्मणाल तर—एक युद्धपराङ्मुखता, ह्मणजे लोकांस लढाईचा मनापासून तिटकारा वाटणें; व दुसरी, परोपकाराविषयी व लोककल्याणाविषयीं आसक्ति. या दोन्हीही गोष्टी फारच उत्तम आहेत. नाहींत असें कोण ह्मणेल? परंतु दुर्दैवानें असें घडतें कीं, या सत्वशील वृत्तीस उत्तेजन देण्याच्या कामांत यद्यपि

स्त्रियांचे साहाय्य एकंदरीत महत्त्वाचे आहे, तथापि, विशेष उदाहरणावरून व या वृत्तीला जी दिशा त्या देतात तिच्यावरून पाहतां त्यांचे करणे प्रायः उपायकारक होत नसून उलटें अपायकारक मात्र होतें, असें आढळतें. विशेषेकरून परोपकाराच्या व दानधर्माच्या कामांत हा प्रकार घडत असल्याचें दिसतें. धर्मप्रसार करणे व दानधर्म करणें हे दोन भाग मुख्यत्वेकरून स्त्रियांनी उचलले आहेत. स्वदेशांत राहून धर्मप्रसार करण्याचा यत्न करणें, ह्मणजे धर्मसंबंधानें अधिक द्वेषबुद्धि किंवा वैरभाव वाढविणें आहे, असें मी समजतो. परदेशांत धर्मप्रसार करण्याची खटपट करणें, ह्मणजे कांहीं तरी सांपडेल ती शिकार पकडणें व अंधळ्यासारखें वर्तन करणें यापेक्षां दुसरें कांहीं नाही. दुसऱ्या मनुष्यास कोणत्या तरी साधनांनीं मारून मुटकून आपल्या धर्मांत ओढूं पाहण्यापासून वारंवार जे भयंकर व घातक परिणाम होतात, ते, एक तर अशा धर्मप्रसारकांस समजत नाहीत, असें ह्मटलें पाहिजे; किंवा समजत असूनही बुद्धिपुरस्सर त्यांजकडे ते दुर्लक्ष करितात, असें ह्मटले पाहिजे. वास्तविक पहाता, मुळचा चांगला हेतु तर सिद्ध होत नाहींच. परंतु, सर्व प्रकारें माणसाचा सत्यनाश होतो, असें मात्र या धर्मप्रसाराच्या खटपटींत घडून येतें. त्याचप्रमाणें धर्मादायाच्या संबंधानेंही विचार केला तरी तसाच प्रकार घडतो. धर्म घेणाऱ्या प्रत्यक्ष व्यक्तीवर घडणारे परिणाम व समाजाच्या एकदर हिताच्या संबंधानें घडणारे परिणाम पाहूं जातां, दोहोंमध्यें अत्यंत विरोध मात्र दिसतो. हा प्रभाव स्त्रियांस ज्याप्रकारचें शिक्षण मिळतें त्याचा आहे. त्या शिक्षणानें त्यांच्या बुद्धीवर व्हावे तसे संस्कार घडत नाहीत व त्यांची विचारशक्ति वाढत नाहीं. तर फक्त त्यांच्या वृत्ति, त्यांचे मनोभाव किंवा त्यांचें अंतःकरण यांजवर प्रत्यक्ष घडणाऱ्या परिणामाकडे पहाण्याची मात्र संवय त्यांस लागते. परंतु,

व्यक्तिसमूहावर घडून येणारे दूरचे परिणाम ध्यानांत आणण्याची संवय त्यांस मुळींच लागत नाही. त्यांच्या सदय अंतःकरणास, त्यांच्या अनुकपाबुद्धीस ज्या धर्मकृत्याचा किंवा परोपकाराचा प्रकार पसंत वाटतो, त्याचे अखेरचे परिणाम वाईट असतात, त्याचें पर्यवसान अपायकारक असतें, ही गोष्ट त्यांस कळत नाहीं. आणि कळली तरी ती कबूल करण्यास त्या नाखुप असतात. हा निव्वळ अल्पदृष्टीचा व वेडेपणाचा दानधर्माचा प्रकार दिवसानुदिवस फारच माजत चालला आहे, ही खरोखर दुःखाची गोष्ट आहे. आपली उपजीविका आपण करणे, आपल्या जिवाची काळजी आपण घेणे हे प्राणिमात्राचें मुख्य कर्तव्य आहे. हें कर्तव्य ज्याचें त्याने करावयाचें. तें त्याच्याकरितां आपण करणे, त्याच्या कर्मानुसार त्याला वाईट फळें प्राप्त होऊन तीं त्यास भोगण्याचा प्रसंग आला असतां मध्यंतरी आपण पडणें—अशा या वर्तनाचा एकंदर परिणाम चांगला होतो काय? मुळींच नाहीं. स्वाभिमान-बुद्धि, स्वपराक्रम, आत्मनिग्रह, हे गुण प्रत्येक व्यक्तीच्या व त्याचप्रमाणें समाजाच्या उन्नतीस व उत्कर्षास अत्यंत अवश्य आहेत. परंतु या दानधर्माच्या प्रकारानें त्या गुणांचा मुख्य पायाच खचतो. त्या गुणांचा अगदी बींमोडच होतो, असें ह्मटलें तरी चालेल. मनुष्याच्या ठायी परोपकार-बुद्धि नसावी असें आमचें ह्मणणें नाही. अवश्य असावी. परंतु अपात्रीं दानामुळें त्या साधनसंपत्तीचा व्यर्थ नाश होतो. कारण, उपकार करण्यास जावें तों वस्तुतः अपकार होतो. चांगलें करण्यास ह्मणून जावें तों आपल्या हातून पर्यवसानीं वाईट अशी गोष्ट घडून येते, याचा विचार होत नाहीं. या धर्मादायाच्या बाबतींत विशेषेंकरून स्त्रियांनीं हजारों रुपये दिलेले असतात. आणि अशा या धर्मादायास स्त्रियांकडूनच फार प्रोत्साहन मिळतें. दानधर्माच्या कारखान्यांची व्यवस्था जर

प्रत्यक्ष स्त्रियांच्या हातांत असती, तर त्यांच्याकडून ही चूक झाली नसती. कारण, प्रत्यक्ष त्यांच्या समोर घडून येणाऱ्या गोष्टी त्यांच्या तेव्हांच ध्यानांत येतात. ज्या माणसांचा व त्यांचा निकट संबंध असतो, त्याची मने व त्याचे हृद्गत विचार त्यांस तेव्हांच कळतात. फार काय—या गुणांत त्या पुरुषांस क्वचित मागे टाकतात असे आढळते. तेव्हां, कधी कधी असे घडते की, सार्वजनिक धर्मादायाच्या कामांची व्यवस्था ज्या स्त्रियांकडे सोपविण्यांत येते, त्यांच्या ध्यानांत अपात्री दानापासून होणारे अनिष्ट व अनीतिकारक परिणाम तेव्हांच येतात. फार काय, पुरुषजातीय अर्थशास्त्रज्ञांनी त्या विषयाच्या संबधाने त्या स्त्रियांपासून धडेच शिकावे अशी त्यांची योग्यता असते. परंतु ज्या स्त्रिया आपला पैसा दानधर्मांत घालतात व त्यापासून होणारे दुर्धर परिणाम मात्र कधीही ज्याच्या नजरेस येत नाहीत, त्याना ते परिणाम अगोदर कळण्याचा कितपत संभव आहे बरे? एकदर सामान्य स्त्रियांची जी स्थिति आहे, त्या स्थितीतच जी स्त्री जन्मास आली व त्या स्थितीतच जी तृप्त आहे, तिला स्वातंत्र्याची, स्वावलंबनाची व स्वपराक्रमाची कशी बरे किमत कळावी? कारण, ती आपण स्वतांच जर स्वतंत्र नाहीं, स्वातंत्र्य व स्वावलंबन ह्मणजे काय, हे जर तिला कोणी शिकविलेच नाही, प्रत्येक वस्तु आपणांस दुसऱ्यापासून प्राप्त व्हावी असाच आपला अधिकार आहे, असाच आपला दैवयोग आहे, अशी जर तिची समजूत करून दिली आहे, तर जी जी गोष्ट आपल्या स्वतांस उचित व योग्य ती ती गोष्ट गरीब लोकांस कां उचित व योग्य नसावी? असे तिला वाटते. आपल्याहून जे थोर व श्रेष्ठ त्यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या गोष्टीवरून तिची 'चांगल्या'ची कल्पना झालेली असते. परंतु भिकारी लोक व गरीब लोक स्वतंत्र व बंधमुक्त असतात, आपण

स्वतंत्र व बंधमुक्त नाही, ही गोष्ट ती विसरते. भिकाऱ्यांना व गरीबांना अन्नवस्त्र वगैरे जे जे लागेल ते ते जर आपण त्यांस पुरविलें, त्यांचें त्यांनी मिळविलें नाही, तर आपलें आपण मिळविण्याचें त्यांस कधींच भाग पाडितां येणार नाहीं. प्रत्येकानें आपली काळजी आपणच घेतली पाहिजे. प्रत्येकाची काळजी त्याची त्यानें न घेतां ती दुसऱ्यांनी घेणें हें अशक्य आहे. स्वसंरक्षणास कांहीं तरी हेतु अवश्य पाहिजे. ज्यास शरीरसामर्थ्य असेल त्यानें आपण आपल्याच पराक्रमावर होतां होईल तोंपर्यंत अवलंबून रहाण्यास शिकलें पाहिजे. असें शिक्षण देणें हीच खरी दया व हाच खरा धर्म.

१२. या गोष्टींवरून, स्त्रियांस सामाजिक व राजकीय संबधानें स्वातंत्र्य प्राप्त होऊन त्यांस वरिष्ठ प्रकारचें शिक्षण जर मिळालें, त्यांचीं मनें जर विस्तृत व विशाल झालीं, त्यांच्या मताचा दाब किंवा पगडा ज्या ज्या विषयांत व संबंधांत दिसून येतो त्या त्या विषयाची व त्या त्या संबंधाची व्यावहारिक माहिती त्यांस करून दिली, तर लोकमत बनविण्याच्या कामांत स्त्रियांचा जो भाग असतो तो भाग त्या किती चांगल्या रीतीनें करतील हें दिसून येईल. विशेषेंकरून प्रत्येक स्त्रीचें आपआपल्या कुटुंबांत जें वजन असतें, किंवा जी सत्ता असते, तिच्या द्वारानें आपल्या कुटुंबांत पुष्कळ सुधारणा तिला करतां येणार आहे.

१३. मी लोकांस असें ह्मणतांना ऐकिलें आहे की,ज्या वर्गांतले किंवा ज्या जातींतले पुरुष जात्या मोहास किंवा इतर दुर्गुणास सहज वश होण्यसारखे असतात, अशा वर्गांतील पुरुषास त्याची बायको व त्याची मुलें प्रामाणिकपणानें व सद्वर्तनानें वागण्यास भाग पडतात. कारण, एक तर बायकोचा पुरुषावर थोडा बहुत कां होईना—परंतु एक प्रकारचा दाब असतो. दुसरें असें की, आपल्या बायकापोरांचें बरें व्हावें,

असे त्याला वाटत असते. ही गोष्ट खरी असेल. 'असेल' कां— वारंवार घडत असल्याचें आढळतें. असे पुरुष बहुधा मनाचे दुष्ट नसून मनानें दुर्बळ मात्र असतात. परतु हा जो उपकारक परिणाम आहे, तो स्त्रीपुरुषांच्या समतावस्थेतही कायम रहाणारा आहे. एवढेंच नव्हे तर त्यास उलटी अधिक बळकटी आणणारा आहे. कारण, स्त्रीच्या वजनाचा हा जो हितावह गुण आहे, त्याला स्त्रीच्या दास्याचीच अपेक्षा आहे असें नाहीं. मी तर असें ह्मणतों कीं, उलट स्त्रीपुरुषांचे हक्क सारखे मानिले असतां कमी दर्जाच्या पुरुषांमध्यें आपल्या सत्तेत असणाऱ्या माणसांविषयीं जी अवहेलना करण्याची बुद्धि नेहमीं आढळते ती कमी होणार आहे. बायकोचा दाब किंवा बायकोचें वजन पुरुषाच्या मना- वर असतें. त्याचा उपयोग इतकाच होतो कीं, देशांतील साधारण लोकांची जी बरी वाईट मतें असतात त्यापेक्षां अधिक निकृष्ट प्रकारची मतें नवऱ्याच्या डोक्यांत शिरण्यास प्रतिबंध होतो. परंतु त्या मतां- पेक्षां अधिक चांगली मतें, किंवा अधिक उदात्त विचार नवऱ्याच्या डोक्यांत न शिरण्यासही तोच दाब कारणीभूत होतो. प्रत्येक पुरु- षाची बायको ह्मणजे एक प्रकारें सामान्यलोकमताची व रूढ अस- लेल्या आचारविचारांची साहाय्यकारिणीच होते. बुद्धिमत्तेने आप- ल्याहून कमी अशा स्त्रीशी ज्या पुरुषाचा विवाहसंबंध होतो त्या पुरु- षास अशी स्त्री ह्मणजे आपल्या गळ्यांत एक सततचें लोढणेंच अड- कावून घेतल्यासारखें होतें. कारण, लोकमतानें जो आचार विहित मानलेला असतो तदनुसार त्यास वागावें लागतें. अमुक प्रकारानें वागणें अधिक श्रेयस्कर आहे व योग्य आहे, अमुक रीतीनें वागलें असतां आपल्यास उन्नतावस्था प्राप्त होणार आहे, इत्यादि विचार त्याला बायकोमुळें एकीकडे ठेवावे लागतात. यामुळें त्याची सर्व मह- त्त्वाकांक्षा व्यर्थ होते. आणि अशा प्रकारची शृंखला ज्याच्या हाता-

पायांत अडकलेली असते त्यास स्वैर गति कोठली? उत्तम गुण प्राप्त करून घेणे, उत्तम विचारानुसार वर्तन करणे, हे त्यास सर्वथा अशक्य होते. त्याचे मत एकंदर लोकांच्या मताहून जर भिन्न असले, ज्या सत्याचा प्रकाश इतर जनांच्या अंतःकरणावर पडलेला नसतो, त्या सत्याचा प्रकाश याच्या आत्म्यावर पडलेला असला, अथवा, ज्या गोष्टी सामान्य लोक नुसत्या मुखाने मान्य करितात परंतु तदनुसार वर्तन करीत नाहीत, अशा गोष्टी त्याच्या मनात वारवार घोळत राहून त्याला जर वाटू लागले की, आपण आपल्या विचारानुसार वर्तन केलेच पाहिजे, असे करणे हे आपले उघड कर्तव्य आहे—तरी त्याचा काय उपयोग? कारण, विवाहपाशाने तो बद्ध झाल्यामुळे अशा प्रकारच्या त्याच्या सर्व इच्छा व त्याचे सर्व विचार निष्फळ होतात. मनुष्याची सदिच्छाप्रेरित स्वैरगति जर तेणेंकरून सर्वथा कुंठित होते तर लग्न करून घेणे ह्मणजे खरोखर गळयांत एक लोढणे बांधून घेण्यासारखे नव्हे काय? सुदैवाने त्याच्यासारखीच एखाद्यास सामान्यस्त्रियांपेक्षा विशिष्ट बुद्धीची स्त्री मिळाली तर ती गोष्ट निराळी. परंतु साधारण प्रकार आह्मी वर निर्दिष्ट केल्याप्रमाणेच असतो.

१८. प्रथमतः एक तर पुरुषांस लोकमताविरुद्ध वागल्यामुळे कांही तरी गैरसोय ही आपली सोसावीच लागते; कसा तरी स्वार्थाला चट्टा हा बसतोच व कोणत्या प्रकारचे तरी नुकसान सोसणे त्याच्या कपाळी येतं. मग ते नुकसान, समाजांत त्याचे जे वजन असतें, किंवा जी मानमान्यता असते तिच्या संबंधाचे असो, किंवा द्रव्यसंबंधाचें असो. फार काय, कदाचित प्रत्यक्ष त्याच्या निर्वाहाच्या साधनावरच गदा येण्याचा संभव असतो. अशा प्रकारे हे नुकसान किंवा हानि, पुरुष आपण स्वतः सोसण्यास कबूल असतो. परंतु आपल्या कुटुंबाच्या माणसांवर अशी हानि सोसण्याचा प्रसंग आणण्याचा त्यास मोठाच

विचार पडतो. कुटुंबाची माणसे ह्मणजे अर्थात् त्याची बायको व त्याच्या मुली. कारण, आपल्या मुलांच्या संबंधानें नेहेमी त्यास अशी आशा असते की, माझ्या विचाराप्रमाणेच माझ्या मुलांचे विचार होतील, व चांगल्या कामाकरितां मी स्वतां ज्या गैरसोई किंवा अडचणी सोशीन, त्या माझे मुलगेही सोसतील. परंतु मुलींची गोष्ट निराळी असते. त्यांस चांगली स्थळं मिळणे हे त्यांच्या वर्तनावर अवलंबून असते. त्याची बायको—त्या बिचारीला या अडचणी, या नडी, या गैरसोई ज्या हेतूच्या सिद्ध्यर्थ सोसाव्या लागणार त्यांची कल्पनाही होत नाही. आणि कदाचित् त्या नडी ती सोसण्यास तयार झालीच तर केवळ नवऱ्याच्या जिवाकरितां व तो ह्मणतो ह्मणून होते. याच्या पलीकडे तिचा पल्लाच जात नाहीं. त्याला जो उल्हास, जो आनंद, जी धन्यता व कृतार्थता वाटण्याचा संभव असतो, त्या पैकीं त्याच्या बायकोला सहस्रांश मिळण्याचा संभव नसतो. मात्र ज्या गोष्टींवर किंवा ज्या सुखावर पाणी सोडण्यास तो तयार असतो, त्या गोष्टी व ती सुखें तिचे सर्वस्व होऊन राहिलेली असतात. अशा प्रकारचा परिणाम आपल्या स्त्रीस भोगण्यास लावण्यापूर्वी कितीही स्वसुखनिरपेक्ष व उदार मनाचा पुरुष असला तरी तो बराच घोटाळ्यात पडेल व मागे पुढे करील यांत काय नवल? प्रत्यक्ष प्रपंचांतील सुखाला व सोईला हरताळ लागला नाही आणि जरी फक्त लौकिकाला बाध येत असला, तरी देखील त्याच्या जिवाला जो एक प्रकारचा घोर लागून राहतो व त्याच्या मनास जी अस्वस्थता प्राप्त होते, ती कांहीं सामान्य नसते. ज्याला मुलेबाळे आहेत व बायको आहे त्याला नेहमीं लौकिक संभाळून वागावे लागते.* या प्रबल

*इंग्रजीत लोकमताला किंवा लौकिकाला "मिसेस् ग्रंडी" असें रूपक करून नांव दिलें आहे. सुत्रांतील वाक्यार्थे शब्दशः भाषांतर केलें असतां असें होतें: "ज्याला बायको व मुलें आहेत त्यानें 'मिसेस् ग्रंडी' या शत्रुतुल्य बाईला आपलीं माणसें ओलिस दिलेलीं आहेत असें समजावें." इंग्लिश ग्रंथकारांनीं व कवींनी या मिसेस ग्रंडी बाईचें विनोदा-

लौकिकाविषयीं पुरुष जरी स्वतः उदासीन असला व त्याची विशेष पर्वा करीत नसला, तरी त्याच्या बायकोला लौकिक सभाळणें हें अत्यंत महत्त्वाचें वाटत असतें. पुरुष स्वतां: लोकमताला जुमानणार नाहीं. आपल्या विचारांप्रमाणें ज्यांचे विचार आहेत ते तरी आपणांवर प्रसन्न आहेत एवढेंच समाधान मानून तो स्वस्थ राहील. परंतु, ज्या स्त्रियांचा व त्याचा संबंध आहे त्यांचें समाधान करण्यास त्यास जागाच नसते. जेणेंकरून समाज प्रसन्न राहील, जेणेंकरून लौकिक साधेल अशाच रीतीनें प्रत्येक नवऱ्याची बायको प्रायः आपलें वर्तन ठेवीत असते. निदान अशा प्रकारची तिची नेहमीं प्रवृत्ति असते. या गोष्टीच्या आधारानें स्त्रियांची कधीं कधीं निंदा करण्यांत येते. व अशा प्रकारची ही प्रवृत्ति, स्त्रियांचा स्वभाव किती भितरा व बालिश असतो हें दाखविते, असाही कोणी तर्क लढवितात. परंतु हें ह्मणणें खरोखर फारच अन्यायाचें आहे. जे गर्भश्रीमंत असतात, ज्यांस निर्वाहाकरितां कष्ट करावे लागत नाहींत, अशा लोकांमध्यें स्त्रीचें समग्र आयुष्य ह्मणजे एक नित्य यज्ञच असतो. तिनें आपलें सर्वस्व समाजरूपी राक्षसास वाहिलेलें असतें. समाजाच्या दाबामुळें तिला आपल्या एकंदर नैसर्गिक प्रवृत्ति सतत दाबून ठेवाव्या लागतात. आणि समाजानें ठरविलेल्या धर्मानुसार चालण्यांत जी स्वातंत्र्याची आहुती तिला द्यावी लागते त्या सगळ्याची फलश्रुति काय तर लौकिक! लोकांत अब्रू राहणें व मानमान्यता राखणें! तिची अब्रू किंवा लौकिक व तिच्या नवऱ्याचा लौकिक यांचा अर्थात् समवाय-संबंध असतो. एक दुसऱ्यापासून निराळा करितांच येत नाहीं. तेव्हां, अशा प्रका-

---

-मक वर्णन केलेलें कोठें कोठें आढळतें. त्यांत बहुधा ही बाई मोठी खट्याळ असून विलक्षण लहरी आहे, तिला प्रसन्न ठेवणें फारच कठीण आहे; ती मोठी बालिष्ट व जुलमी आहे; अशा अभिप्रायाचे उद्गार असतात.

रचा, प्राप्त करून घेण्यास व ... ,. ,.. मोठा कठिण असा जो हा लौकिक, त्याची भरपूर किंमत देऊनही कांहीं एक विशेष किंवा वाजवी कारण नसतां ( निदान तिच्या तरी ते ध्यानांत येत नाहीं ) तो जर नष्ट होत असला, तर त्या बिचारीनें काय करावें? लौकिक संपादन करण्याच्या कामांत तिनें आपलें सर्व आयुष्य खर्च केलेलें असतें. आणखी, तिचा नवरा त्याच लौकिकाकरितां आपली लहर, आपला नुसता छंद, आपला निवळ विक्षिप्तपणा जर सोडून देत नाहीं, तर तिनें काय करावें? कारण, जग तर नवऱ्याच्या ह... ि..ा.ा नुसता विक्षिप्तपणाच समजणार! त्याचें ह्मणणें किंवा करणें जगास मान्य नसतें. अशा स्थितींत त्याचे विचारास व वर्तनास त्याच्या बायकोप्रमाणेच जगानें याहीपेक्षा वाईट ह्मटलें नाहीं तरी मूर्खपणाचा शिक्का दिलाच असें समजावें! कांहीं पुरुष फारच चांगले व खऱ्या अंतःकरणाचे असतात. अशा प्रकारच्या साधुवृत्तीच्या पुरुषांस वर सांगितलेल्या प्रकारामुळें फारच जाच सोसावा लागतो. तो कसा तें सांगतों. स्वतंत्र विचार करणाऱ्या व सुधारणा करणाऱ्या लोकांमध्यें विशेष मानमान्यता किंवा प्रतिष्ठा होण्यासारखें बुद्धि-सामर्थ्य जरी अशा पुरुषांच्या अंगीं नसलें, तरी त्यांचीं जीं कांहीं मतें झालेलीं असतात, तीं त्यांच्या स्वानुभवावरून व त्यांच्या मनाची खातरी होऊन झालेलीं असतात. यामुळें, आपल्या मतानुसार वर्तन करणें हें आपलें कर्तव्य कर्म आहे, असें ते समजतात. एवढेंच नव्हे तर आपलीं जीं काय मतें असतील तीं उघड बोलून दाखवून त्या मतांच्या मंडनार्थ व प्रसारार्थ जें कांहीं करावें लागेल, त्यांत आपला काळ, आपले श्रम व संपत्ति समर्पण करण्यास आपण बांधलेले गेलों आहों, असें ते मानतात. त्यांतून आणखी जर अशा पुरुषांची सामाजिक स्थिति यदाकदाचित् अशी असली कीं, ज्यांस लोक विशेष प्रतिष्ठित

किंवा संभावित समजतात, अशा माणसांचा समागम व परिचय करून घेण्याबद्दलचा त्यांचा हेतु निष्फळ होण्याचा प्रसंग असेल, तर अशा पुरुषांची अवस्था दया येण्यासारखी असते. कारण प्रतिष्ठित किंवा सभ्य गणलेल्या समाजांत त्यांचा प्रवेश व्हावयाचा, तो त्या पुरुषांविषयीं त्या समाजाची जी काय कल्पना असेल त्यावर अवलंबून असतो. आणि त्या पुरुषांचे आचारविचार वस्तुतः कितीही निर्मळ व निर्दोष असले तरी, ज्यांच्या हातांत समाजाचें सुकाणूं असतें व जे समाजाचे पुढारी असतात, त्यांस जर त्या पुरुषांचीं मतें व त्यांचे वर्तन नापसंत असेल तर त्या पुरुषांस समाजबाह्य रहाण्याचाच प्रसंग येतो. पुष्कळ बायकांची अशी एक चमत्कारिक समजुत असते ( की, ही समजूत दहा गोष्टी घेतल्या तर त्यांपैकी नऊ गोष्टींत अगदी चुकीची असते ) आपल्या शेजारीपाजारी जे मोठे व सभ्य ह्मणून मानलेले लोक असतात, ज्या लोकांशीं आपल्या दर्जापैकी व आपल्या ओळखीची इतर माणसें मिळून मिसळून वागतात, त्याच लोकांत जर आपल्या नवऱ्याची धर्मविषयक मतें समजांत रूढ असलेल्या मतांहून भिन्न नसतीं, किंवा आपला नवरा राजकारणसंबंधानें सुधारक अशा नूतन पक्षामध्यें मिसळणारा आहे असा जर त्याचा लौकिक नसता, तर आपल्यालाही बरोबरीच्या नात्यानें मिळून मिसळून वागण्यास कांहीं एक अडचण पडली नसती! जॉर्जला ( तिच्या नवऱ्याचें नांव ) अमुक एक काम किंवा हुद्दा मिळत नाहीं, किंवा क्यारोलीनला ( तिच्या मुलीचें नांव ) चांगलें स्थळ मिळत नाहीं; आपल्या दर्जाच्या इतर माणसांस जे मानमरातब मिळतात, त्यांचें जसें आदरातिथ्य होतें, त्या मानपानांस व आदरातिथ्यास इतर लोकांप्रमाणें आपणही सारखेच पात्र आहों असें असून ते आपणांस व आपल्या नवऱ्यास मिळत नाहींत. तात्पर्य,

सर्व विघ्नांचे कारण आपल्या नवऱ्याची मते, असे तिला वाटत असते! प्रत्येक घरामध्ये असा हा प्रकार जारीने चालू असतां, बायकोंनं कदाचित आपले उद्गार बाहेर काढून दाखविले नाहींत तरी ते आंतल्याआंत धुमसत असतात! एकदरीत साधारण लोकांची सभ्यता व योग्यता आज काल पाहू जातां फारच कमी प्रतीची आढळते, यांत कांहीं नवल आहे काय?

१५. अनेक कामांत स्त्रिया अनाधिकारी ठरल्यामुळे स्त्रियांच्या शिक्षणांत व पुरुषांच्या शिक्षणात व त्यांच्या वर्तनांत जो भेद उत्पन्न होतो, त्यापासून दुसरा एक फारच अपकारक परिणाम होतो त्याचाही विचार केला पाहिजे. विवाहित स्थितीची, किंवा वैवाहिक संबंधाची उत्तम कल्पना आहे ती अशी आहे कीं, विवाहपाशाने बद्ध झालेल्या स्त्रीपुरुषांच्या नैसर्गिक प्रवृत्ति, त्यांची अभिरुचि व त्यांचे विचार यांचें ऐक्य पाहिजे, भेद उपयोगाचा नाहीं. स्त्रियांच्या व पुरुषांच्या प्रस्तुत शिक्षणांत जो भेद दृष्टीस पडतो, तो अशा प्रकारच्या ऐक्यास अत्यंत प्रतिकूल आहे. परस्परापासून अत्यंत भिन्न अशा माणसांचा अत्यंत निकट संबंध व स्नेह घडून येईल असें समजणें निवळ भ्रांति होय. विषमता किंवा विसदृशता प्रथम दर्शनी आकर्षक होण्याचा संभव आहे. परंतु, दोन व्यक्तींची अंतःकरणे परस्परांस संलग्न करून ठेवण्याची जी शक्ति आहे, ती सादृश्याच्या ठिकाणी आहे. दोन व्यक्तींमध्यें ज्या प्रमाणाने सारखेपणा अधिक असेल त्या प्रमाणानें परस्परांचे जीवांस सुख देण्याविषयी त्या अधिक समर्थ होतात. जोंपर्यंत स्त्रियांत व पुरुषांत फार मोठा भेद राहील, तोपर्यंत त्या भिन्नतेमुळे उत्पन्न होणारी जन्मभर बोकांडी बसणारी जी कर्मकटकट ती टाळण्याकरितां स्वार्थपटु पुरुषांस, 'हम् करे सो कायदा' या न्यायास अनुसरून सर्व सत्ता आपल्याच हातांत ठेवण्याची गरज

भासते. कारण, तसें केल्याशिवाय प्रत्येक गोष्टीचा निकाल त्याच्या मर्जीप्रमाणे व्हावा कसा? नेहेमी लठ्ठालठ्ठी चालू रहाणार. ही ह्मणणार असें करावें, तो ह्मणणार तसें करावें! माणसें जर परम्परांपासून अगदी भिन्न असलीं तर त्यांस खरोखर एकमेकांविषयीं अगत्य कसें वाटावें! पुष्कळ प्रसंगीं स्वकर्तव्याच्या संबंधानें मोठमोठ्या महत्वाच्या बाबतींत विवाहित माणसांत खराखरा मतभेद पडत असतो. आणि असा प्रकार जेथे घडतो, त्या ठिकाणच्या विवाहकल्पित ऐक्यांत कांहीं खरेपणा असतो काय? आणि हा प्रकार विरळा असतो, किंवा क्वचित् आढळतो, अशीही गोष्ट नाहीं. बहुधा घरोघर असतो ह्मटलें तरी चालेल. विशेषकरून ज्या घरच्या स्त्रीत कांहीं राम ह्मणून आहे, तिच्या घरांत हा प्रकार असावयाचाच. ख्रिस्तीधर्मात **रोमन कॅथलिक** ह्मणून एक जुना पंथ आहे. हा पंथ ज्या देशांत चालू आहे त्या देशांत आह्मी वर सांगितलेली गोष्ट सर्वसाधारण असते. त्या देशांत नवराबायकोंत धर्मसंबंधानें हटकून मतभेद असावयाचाच. कारण, तिला मुख्य पाठिंबा धर्मोपदेशकाचा असतो. आणि धर्मोपदेशक सांगेल तें प्रमाण, अशी तिची समजूत लहानपणापासूनच करून दिलेली असते, किंवा तिच्या एकंदर शिक्षणामुळे ती तशी बनलेली असते. धर्माधिकारी सांगतील तो मार्ग खरा. उपासकांनीं मुकाट्यानें त्यांजवर श्रद्धा ठेऊन चालावें, त्यांच्याशीं वाद करूं नये. अशा प्रकारें आपला धर्माधिकार अप्रतिहतरीतीनें चालविण्याची संवय धर्मोपदेशकांस पडलेली असते. हें त्यांचें खूळ व बंड मोडून टाकण्याकरितां **प्रॉटेस्टन्ट** पंथाचे ग्रंथकर्ते, धर्मसंबंधानें व्यक्तिमात्रास विचार-स्वातंत्र्य पाहिजे अशा मताचें प्रतिपादन करून स्त्रियांच्या मनावर पाद्र्यांचा ( धर्मोपदेशकांचा ) जो पगडा असतो तो दूर करण्याकरितां, किंवा जें साम्राज्य असतें तें ढासळून टाकण्याकरितां, लेखरूप

शस्त्रांनी नेहमी युद्ध करीत असतात. त्यांतला मुख्य उद्देश, हे धर्मोपदेशकांचें साम्राज्य वाईट आहे, त्याचा नाश केला पाहिजे, असाच केवळ नसतो. तर, हे धर्मोपदेशक अजान स्त्रियांस अनुकूळ करून घेऊन नवऱ्या विरुद्ध बंड उत्पन्न करितात, व नवऱ्याच्या अधिकाराशी प्रतिस्पर्धा करणारा असा आपला अधिकार स्थापित करू पाहतात, त्या असह्य अभिमानाचा पाडाव करावा एवढाच हेतु असतो.* इंग्लंडांत एखाद्या धर्मवेड्या बाईनें धर्माविषयीं उदासीन असणाऱ्या पुरुषाशीं लग्न केलें ह्मणजे वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारचा मतभेद दृष्टीस पडतो. परंतु अशा प्रकारें उभयतांमध्यें लढा पडण्याचा प्रसंग टाळण्यास एक मोठी युक्ति करितात. ती कोणची—तर स्त्रीच्या बुद्धीस जितकी जडता येईल तितकी आणण्याचा प्रयत्न करितात! यामुळें असें होतें कीं, मागें सांगितलेली बाई मिसेस ग्रंडी (लोकप्रवृत्त किंवा लोकमत) हिचें चक्र जसें फिरेल तसें प्रत्येक स्त्रीचें मन फिरत असतें—तिला स्वतंत्र विचार किंवा स्वतंत्र मत ह्मणून कांहीं नाहीं—किंवा नवरा

* आमच्या इकडे या गोष्टी किती पण लागू पडतात? हा मजकूर वाचीत असतांना बहुश्रुत व आमच्या इकडील सुधारणेचा आधुनिक इतिहास ज्यांस थोडा बहुत तरी अवगत आहे अशा वाचकांच्या डोळ्यांपुढें किती उदाहरणें उभी राहतील! आमच्या इकडील भट्ट, पुराणिक, जोशीबोवा, देवऋषी, वगैरे मंडळीचें आमच्या बायकांवर केवढें वजन असतें! फार काय, ते वारंवार असें देखील ह्मणून दाखवितात कीं, या कलियुगांत व भ्रष्ट काळांत धर्मबुद्धि कांहीं राहिली असेल तर बायकांतच! त्या बिचाऱ्या आहेत ह्मणून त्यांच्या कारणानें दान, धर्म, व्रतवैकल्यें, आचारविचार कांहीं चालून पुरुषांस मुक्ति मिळण्याचा उगीच दूरचा तरी संभव! त्याचप्रमाणें स्त्रीशिक्षण, विधवांचा पुनरुद्वाह, केशवपन, बालविवाहनिषेध, इत्यादि मोठमोठ्या विषयांच्या संबंधानें सुधारकपक्षीय स्त्रीपुरुषांमध्यें कसा मतभेद होऊन लढा पडतो, हें प्रस्तुतस्थळीं ध्यानीं आणण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें, आमच्या इकडील गुर्जर मंडळींत होऊन गेलेला खऱ्या कळवळ्याचा, खऱ्या शौर्याचा, सुधारक, कैलासवासी करसनदास मूळजी यानें वल्लभ संप्रदायी स्वामीमहाराजाचे डोळे कोर्टासमोर ओढून आणून धर्माच्या नांवावर होणारी कृष्णकारस्थानें जगाच्या नजरेस कशीं पाडिलीं याचेंही स्मरण प्रस्तुतस्थळीं झाल्याशिवाय रहात नाहीं.

जीं मते पसत करण्यास सांगेल तींच मत तिनें पसत करावीं—अशाच प्रकारचें शिक्षण तिला मिळतें. आता अशी कल्पना करू कीं, धर्म संबधानें, अथवा इतर महत्त्वाच्या विषयाच्या सबधानें, नवऱ्याचा व तिचा मतभेद नसून केवळ रुचिभिन्नता आहे तर तीही त्या उभतांच्या दांपत्यसुखास विघातक होणारी आहे. स्त्रीपुरुषांमध्यें मूळचे किंवा प्रकृतिसिद्ध भेद कसेही असोत. ते शिक्षणभेदानें अधिक वाढविल्यापासून पुरुषांच्या विषयवासना कदाचित् वाढतील. परंतु खऱ्या वैवाहिक सुखाची वृद्धि त्यापासून खास होणार नाहीं. विवाहित स्त्रीपुरुष सुशिक्षित, सभ्य व सुशील असल्यास फार झाले तर एकमेकांच्या आवडीनिवडीच्या आड एकमेक येणार नाहींत. तिला वाटेल तशी ती वागेल, याला वाटेल तसा हा वागेल! तिचा मार्ग निराळा याचा मार्ग निराळा! अशा रीतीनें परस्पर परस्परांस विरोध करणार नाहींत. परंतु, लग्न करावयाचें ते अशाच समजुतीनें काय? विवाहपाशानें माणसे बद्ध होण्यास सिद्ध होतात, त्यांनीं उभयतांनीं भिन्न मार्गांनीं वागावें, एकमेकांनीं एकमेकांच्या आवडीनिवडीच्या आड व वर्तनाच्या आड येऊं नये, एवढ्याच आशेवर होत असतात काय? तिच्या मनाचा ओढा एकीकडे व याच्या मनाचा ओढा दुसरीकडे, अशा या प्रवृत्तिभेदामुळें व रुचिवैचित्र्यामुळें त्यांच्या इच्छाही अर्थात् भिन्न होतील. आणि असें झालें ह्मणजे, उघडच गृहव्यवस्थेच्या संबधानें जे जे प्रश्न उत्पन्न होतील त्या त्या प्रश्नांचा समाधानकारक निकाल लागण्यास मारामार पडणार. आतां केवळ ममत्वामुळें, किंवा स्वकर्तव्य जाणून, असा लढा पडण्याचे प्रसंगी तिनें आत्मनिग्रह केला तर ती गोष्ट निराळी. परंतु सामान्यतः असें घडत असतें कीं, ज्यामाणसांचा परिचय तिला करावासा वाटेल तीं माणसे त्याला नकोशीं असतात. याला हवीशी वाटतात तीं तिला नकोशीं असतात. त्या दोघांपैकीं प्रत्येकाला आपल्या आवडीनिवडी-

प्रमाणें ज्या माणसांच्या आवडीनिवडी असतील त्या माणसांशींच सह-वास करावा असें वाटत असतें. यामुळें, एकाला जीं माणसें प्रिय असतील त्याविषयीं दुसरा उदासीन असणार, किंबहुना त्यास खरोखर तीं माणसें अप्रियही वाटतील. असें असून उभयतांच्याही स्नेहांतली अशी कांहीं तरी माणसें असणारच! **पंधरावा लुई** राजा होऊन गेला, त्या वेळीं स्त्रीपुरुषांचा राहण्याचा प्रकार जसा होता तसा हल्लीं नाहीं. ह्मणजे, विवाहित माणसें एकाच घरांत निरनिराळ्या भागांत रहात नाहींत, किंवा त्यांस भेटण्याकरितां येणाऱ्या माणसांच्या निरनिराळ्या यादीही होत नाहीत.* आपल्या मुलांस शिक्षण द्यावयाचें किंवा वळण लावावयाचें तें कोणत्या प्रकारचें असावें या संबधानें उभयतांची मतें भिन्न पडणार. त्यांच्या इच्छा निरनिराळ्या असणार. आपल्या आवडीनिवडीप्रमाणें व आपापल्या मता-प्रमाणेंच आपल्या मुलांचेंही असावें, किंवा व्हावें, असें दोघांपैकीं प्रत्ये-

* फ्रान्सदेशांतील राजा पंधरावा लुई ह्या सन १७१० त जन्मला व सन १७७४ सालीं मरण पावला. ह्मणजे सुमारें दीडशें वर्षांपूर्वीं फ्रान्सदेशांत व त्याचप्रमाणें युरोपांतील इतर देशांत **बंगाली** लोकांच्या स्त्रियांप्रमाणें किंवा मुसलमानांच्या जनानखान्यांतील स्त्रियांप्रमाणें युरोपियन स्त्रियांचीही स्थिति होती, असें दिसतें. निदान हल्लीं आह्मां महाराष्ट्रीयांच्या स्त्रियांप्रमाणें तरी खास होती, असें अनुमान निघतें. पुरुषांची बैठक निराळी, स्त्रियांची बैठक निराळी. पुरुषांस भेटण्यास येणारीं माणसें बहुधा पुरुष जातीय असावयाचीं, व स्त्रियांस भेटण्यास येणारीं स्त्रीजातीय असावयाचीं. प्राय यांनीं त्यांच्याशीं बोलण्याचें कारण नाहीं व त्यांनीं यांच्याशीं बोलण्याचें कारण नाहीं! असा हा प्रकार स्त्रियांच्या अशिक्षित स्थितींत **इंग्लंड, फ्रान्स, स्पेन, पोर्तुगाल** वगैरे यूरोपखंडांतील देशांतही दीडशें किंवा दोनशें वर्षांपूर्वीं होता, असें मानण्यास आधार दिसतो. आणि हें जर खरें असेल तर आमच्या लोकांनीं स्त्रियांच्या सुधारणेविषयीं उदासीन न राहतां ईर्षा बाळगावी, असें अनुमान निघत नाहीं काय? इतर बाबतींत पाश्चिमात्यांनीं जशी सुधारणा केली तशी स्त्रियांच्या स्थितींतही केली. आणि सुधारणा किती हळू हळू होत असते ही गोष्ट ध्यानांत ठेविली असतां १५०-२०० वर्षांचा काल ह्मणजे थोडाच ह्मणण्यास हरकत नाहीं.

कास वाटणार. अशा स्थितीत फार झालें तर दोघांत तडजोड होऊन प्रत्येकाची अर्धी इच्छा तृप्त होणार. व प्रत्येकजण कसें तरी समाधान करून घेणार. बहुधा बायकोलाच हार जावें लागतें व मुकाट्या आपला पक्ष सोडून द्यावा लागतो. त्यामुळें तिच्या मनाला कधी कधी अत्यंत दुःख होतें. आणि तिच्या नवऱ्याचे जे हेतु व विचार असतात त्यांच्या विरुद्ध वर्तणूक, बुद्धिपूर्वक ह्मणा किंवा सहज ह्मणा, तिजकडून घडत असते.

१६. स्त्रियांच्या व पुरुषांच्या मनोवृत्तींत व अभिरुचींत भेद आढळतो हा केवळ शिक्षणभेदामुळें उत्पन्न झालेला असतो. आणि कोणत्याही काल्पनिक स्थितींत हे रुचिवैचित्र्य व हा मनोवृत्तींमधील भेद असणार नाहीं असें मानणें अत्यंत मूर्खपणाचें होणार आहे. परंतु, शिक्षणभेदामुळें हे भेद अधिक वाढतात आणि ते सर्वथा अपरिहार्य होऊन राहतात, हें ह्मणणें अयोग्य होईल असें मात्र वाटत नाहीं. हल्लींची शिक्षणपद्धति जोंपर्यंत आहे अशीच कायम राहील, तोंपर्यंत पुरुष व स्त्रिया यांचे हेतु अथवा आवडनिवडी यांची सांगड कधीच जमून येणार नाही. संसारांत उभयतांचा एक विचार, एखादी गोष्ट करावयाची तर दोघांचीही अनुकूलता, व न करावयाची तर दोघांचीही प्रतिकूलता हेंच वास्तविक ह्मटलें तर खऱ्या सख्याचें लक्षण होय. पण या आशेची नुसती कल्पनाही करणें दोघांस सोडून द्यावें लागतें. आतां एखाद्या पुरुषाला अशा प्रकारचें सख्य प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर तसेंही होऊं शकेल. एखादी मठ्ठ, रेमीडोकी बायको जिला आवड नाहीं, नावड नाहीं, जिला स्वतःचा ह्मणून कांहीं विचार नाहीं, हे कर, तयारी, तें नको, हे कर, ह्मटलें तरीही बापडीची तयारीच ! अशा प्रकारची एखादी बायको केली ह्मणजे झालें ! पण कधीं कधीं हाही अदमास चुकण्याचा संभव असतो. एखादी स्त्री अशी मठ्ठ व मळमळीत असली ह्मणून ती

नेहमी हुकुमात राहीलच असा भरवसा नसतो. बरें, कदाचित् राहिलीच, तर हा का खऱ्या लग्नाचा अर्थ? ते आपले कांहीं तरी! घरांत एखादी मोलकरीण ठेवली किंवा एखादी राख बाळगली तिच्या इतकीच सरासरी तिची योग्यता! आतां याच्या उलट पहा. ह्मणजे, उभयतांही समजूतदार व शहाणी असली उभयतांही प्रेमपाशांनी बद्ध झालेली असली, प्रथमपासूनच परस्परांच्या विचारांत व अभिरुचीत फारसा भेद नसला, कांहीं गोष्टी करण्यामध्यें उभयतांसही सारखाच आनंद घडून येण्याजोगे प्रसंग वारंवार येत असले, ह्मणजे ज्या गोष्टी प्रथम एकालाच आवडत होत्या त्याच गोष्टी एकाच्या सहवासानें दुसऱ्यालाही प्रिय होऊन प्रत्येकाच्या अंतस्थ गुणांचा विकास होतो आणि त्यांचे स्वभाव व त्यांच्या अभिरुचि एकच बनून जातात. हें जें घडतें तें अंशतः प्रत्येकाच्या स्वभावांत सहजगत्या फरक पडत गेल्याच्या योगानें घडतें. परंतु विशेषकरून दोघांचाही स्वभाव खरोखरी उदात्त बनून प्रत्येकाच्या अभिरुचीची व इतर गुणांची भर पडल्यामुळें घडत असतें. असा हा प्रकार रात्रंदिवस ज्यांना एकमेकांचा सहवास आहे अशा दोन मित्रांमध्यें अनेक प्रसंगीं आढळून येतो. हल्लीं स्त्रीपुरुषांस जें निरनिराळें शिक्षण व वळण मिळतें त्याच्या योगानें उत्तम जोडपें जुळवून आणणें जर सर्वथा अशक्य होऊन राहिले नसते तर विवाहित स्त्रीपुरुषांमध्येंही असा प्रकार बराच दृष्टीस पडता. हा शिक्षणभेद जर नाहींसा करून टाकला, ह्मणजे प्रस्तुत शिक्षणपद्धतींत बदल केला तर माणसामध्यें कितीही स्वाभाविक रुचिवैचित्र्य असलें तरी संसारांत जे मुख्य अर्थ साधावयाचे असतात, त्या संबंधानें उभयतांचें एकमत होण्याचा विशेष संभव आहे. आणि अशा तऱ्हेचे जे मोठमोठे अर्थ साधावयाचे असतात, त्या संबंधानें उभयतांचे सारखेच

परिश्रम सुरू असले, एकमेकांना एकमेक साहाय्य करीत असले, व एकमेकांना एकमेक प्रोत्साहन देत असले ह्मणजे बारीक सारीक व क्षुल्लक गोष्टींत जरी रुचिवैचित्र्य असले तरी त्या कांहीं मोठ्या महत्वाच्या गोष्टी नाहींत असें समजून त्यांकडे ते बिलकूल लक्षच देणार नाहींत. हाच खऱ्या व चिरकालीन स्नेहाचा भक्कम पाया होय. आणि याच स्नेहाच्या योगानें प्रत्येकाला नेहमीं असें वाटत असतें कीं, दुसऱ्यापासून सुख प्राप्त करून घेण्यापेक्षां दुसऱ्याला सुख देणें यातच कायतें सुख आहे.

१७. येथपर्यंत नवराबायको सारख्या स्वभावाची व सारख्या गुणाची नसल्यामुळें वैवाहिक सुखास कशी न्यूनता येते याचा विचार केला. परंतु, पुरुषांपेक्षां स्त्रिया बुद्धिमत्त्वादि गुणांत कमी असल्या तर याचा परिणाम फारच वाईट होत असतो. त्याच्यामध्यें सारखे सारखे गुण नसले तरी चिंता नाहीं. कारण, एकांत जर कांहीं चांगले गुण असले तर दुसऱ्यांत दुसरे कांहीं चांगले गुण असतात. आणि असें असणें उभयतांच्याही फायद्याचें आहे. तेणेंकरून उभयतांची सुधारणा होत असते. एकमेकांत जे चांगले गुण असतात ते संपादन करण्याची उभयतांसही इच्छा उत्पन्न होऊन ते प्राप्त करून घेण्याविषयीं त्यांचे प्रयत्न नेहमीं चालू राहतात. आणि अशा प्रकारचे भिन्न भिन्न गुण असले ह्मणजे, त्यांच्या आवडीनिवडीमध्यें भेद न राहतां कालेंकरून त्या एक होतात. या गुणभेदामुळेच एकमेक एकमेकांना अधिक प्रिय होण्याचा कदाचित् अधिक संभव असतो. परंतु, मानसिक शक्तीनें व शिक्षणानें जेव्हां एक दुसऱ्यापेक्षां कमी असतो व दुसऱ्याच्या साहाय्यानें त्याच्या बरोबरीला येण्याचा झटून यत्न करीत नाहीं, तेव्हां त्या उभयतांपैकीं जो श्रेष्ठ असतो त्याच्या बुद्धीचा विकास होण्याला हा दोघांचा संबंध

सर्वस्वी बाधक होतो. ह्मणजे, त्याची दिवसानुदिवस सुधारणा व्हावयाची ती न होतां नेहमीं पिछेहाटच होत असते. आणि, हा प्रकार विशेषेंकरून जी नवराबायको साधारण बऱ्याच सुखासमाधानानें नांदत असतात त्यांमध्ये ज्यांचे नेहमी खडाष्टकच असते त्यांच्यापेक्षांही अधिक आढळून येतो. जे माणूस बुद्धीनें श्रेष्ठ असते, त्या मनुष्यानें आपल्यापेक्षां कमी बुद्धीच्या माणसाचा सहवास केला व त्या एकट्याचाच सहवास व निकट संबध रात्रंदिवस त्यानें ठेविला, तर त्याचें प्रायश्चित्त त्यास भोगावें लागतेंच लागतें! ज्या सहवासापासून मनुष्याची मानसिक उन्नति होत नाहीं, तो सहवास उलट त्याच्या अवनतीस कारणीभूत होत असतो. आणि ज्या मानानें तो सहवास दृढ होत जातो व तो संबध निकट होत जातो, त्या मानानें त्या मनुष्यास अधिकाधिक नीचावस्था प्राप्त होत जाते. एखादा पुरुष खरोखर मोठा बुद्धिमान् असला तरी, त्याच्या नित्यसहवासांतील मनुष्ये जर बुद्धिमत्तेने त्याच्यापेक्षां कमी असली तर बहुधा त्याच्या बुद्धीला क्षीणता प्राप्त होत जाते.* या कारणास्तव, नवऱ्यापेक्षां बुद्धिसा-

---

* सरकारी अधिकाराच्या संबधानें आमच्या विश्वविद्यालयांतलि ज्या उपपदधारी तरुण मंडळीस कुग्रामवास करावा लागतो, त्यांस, निबंधकारांनीं दर्शविलेल्या या गोष्टीचा चांगला अनुभव येण्याचा संभव असतो. हे सरकारी अधिकारी शहाणपणाच्या व ज्ञानाच्या संबधानें इतर सर्व लोकांपेक्षां सहजच श्रेष्ठ गणिले जातात. 'निरस्तपादपे देशे एरंडोऽपि द्रुमायते' ह्मणून जो एक न्याय संस्कृतांत सांगितला आहे तशी गत त्यांची होते अशा मनुष्यास, मूळच्या भाषेत "King of his company" ह्मणजे आपल्या मंडळींतला 'राजा' असें ह्मटलें आहे ते अगदीं बरोबर आहे. कचेरींत होते तो बहुधा लंगोट्यांशीं गांठ! घरीं दारीं शिपाई किंवा चाकर, फार झालें तर कचेरींतील फारडे कारकून, गांवांतील पाटील कुळकर्णी, एखाद दुसरा मारवाडी किंवा गुजराथी हिंगजिरें विकणारा वाणी प्राचीन काळच्या तात्यापंतोजी पेक्षां ज्याची गति फार पुढे गेली नाहीं, असा शाळामास्तर, अशा सारख्या माणसांशीं रावसाहेबांचा नित्यसबंध! मग त्यांच्या ज्ञानाच्या उत्कर्षास व त्यांच्या विचाराच्या उन्नतीस काय तोटा? पाठशाळा सुटल्यानंतर व 'रुपेरी बेडी' चा लाभ होऊन बराच कालपर्यंत तिचा परिचय

मर्थ्यानें जी स्त्री कमी असते तिच्या नित्यसहवासाचा अपायकारक परिणाम तिच्या नवऱ्यावर घडल्यावांचून रहात नाहीं. एकीकडून पहावें तो आपणच काय ते शहाणे, असें त्यास निरंतर भासत असतें. दुसरीकडून पहावें तों असा परिणाम होतो कीं, त्याच्यापेक्षां अधिक क्षुद्र, संकुचित व मर्यादित अशा बुद्धीच्या माणसाचे विचारांचा पगडा हळूहळू त्याच्या मनावर बसूं लागतो. येथपर्यंत ज्या अनिष्ट परिणामांचा निर्देश मीं केला, त्यांहूनहीं हा परिणाम वाईट समजला पाहिजे. कारण, तो दिवसानुदिवस जारीनें वाढत चालला आहे. पूर्वीपेक्षां हल्लीं संसाराची व्यवस्था फार निराळी होत चालली आहे. नित्यव्यवहारांत स्त्रीपुरुषांचा सहवास व समागम पूर्वीपेक्षा सांप्रत अधिक निकट होत चालला आहे. प्रस्तुतकालीं पुरुषांचा संबंध पुरुषांशीं कमी असून आपल्या कुटुंबाशींच अधिक असतो. पूर्वीच्याकाळीं पुरुषांचे बहुतेक व्यवसाय व करमणुकीचे प्रकार पुरुषमंडळींतच असत, व पुरुषांचीच संगति त्यांस अधिक असे. त्यांना आपल्या बायकांचा सहवास फारच थोडा असे. जसजसें सुधारणेचें पाऊल पुढें पडत गेलें तसतसे करमणुकीचे प्रकार व मार्ग बदलत गेले. पूर्वीच्याकाळीं बहुतेक पुरुष ज्या असभ्य व निंद्य प्रकारानें आपली करमणूक करून घेत व विश्रांतीचा काल घालवीत तो प्रकार प्रस्तुतच्या लोकमतास असंमत असल्यामुळें पुरुषांस आपल्या कुटुंबाशिवाय इतर विनोदस्थान व करमणुकीचें साधन राहिलें नाहीं. शिवाय, पतिपत्नीच्या अन्योन्यकर्तव्यसंबंधाची जी आधुनिक कल्पना, ती कल्पनाही पूर्वीच्या कल्पनेपेक्षां बरीच उदात्त असल्यामुळें आजकाल पुरुषाला खरें सुख प्राप्त करून घ्यावें अशी इच्छा असेल, व खरी करमणूक करून घेणे असेल, तर, आपलें

झाल्यावर या गृहस्थाची स्थिति, ज्यास शहरच्या अनेक ज्ञान-वर्धक संस्थांचा व सस्कारांचा फायदा मिळाला आहे, अशा मनुष्याच्या अवलोकनांत आली असतां त्यास ती खरोखर शोचनीय वाटली, तर त्यांत कांहीं आश्चर्य आहे काय !

घर व आपल्या घरचीं माणसें यांजवरच त्यास विशेष अवलंबून राहावें लागतें. त्याचप्रमाणें, एकंदरीनें यद्यपि बरीच निराशेची स्थिति असली तरी, स्त्रियांच्या शिक्षणांत हळूहळू जी सुधारणा होत चालली आहे, तिजमुळें पुरुषांच्या आवडीनिवडी व पुरुषांचे विचार कांहीं अल्प अशानें तरी स्त्रियांस कळू लागून आपल्या नवऱ्याच्या खऱ्या सहचरी होण्यास त्या पात्र होत चालल्या आहेत.* असो.

* मिलसाहेबांनीं ही जी आपल्या काळच्या लोकस्थितीची व पूर्वीच्या काळच्या लोकस्थितीची तुलना केली आहे तशी, कांहीं अशानें आपल्या इकडील लोकस्थितीची ही करितां येईल. कुटुंब ह्मणजे जी आपल्याकडे कांहीं काळापूर्वींची कल्पना होती व जिच्यांत आईबाप, भाऊ, चुलते, चुलत भाऊ, व त्यांच्या बायका, इत्यादि आप्तसंबंधीं माणसांचा समावेश होत असे, ती कल्पना हळू हळू बदलत जाऊन कुटुंब ह्मणजे फक्त एक पुरुष, त्याची बायको व त्याचीं मुलें, असा अधिक संकुचित अर्थ समजण्यांत येऊं लागला आहे. आमच्या पूर्वींच्या करमणुकी ह्मणजे नाचतमाशे पहाणें, शृंगाररसानें ओतप्रोत भरलेल्या बीभत्स लावण्या ऐकणें, अशा प्रकारच्या होत्या. हे करमणुकीचे प्रकार हळू हळू नष्टप्राय होत चालले आहेत निदान आमच्यापैकीं वरिष्ठ व सभ्य मानिलेल्या विद्यासपन्न वर्गांतील पुरुषास तरी हे करमणुकीचे प्रकार दिवसानुदिवस आवडत नाहींत, असें दिसतें. आतां त्यांच्या ऐवजीं कार्ड, बिझीक व 'सपीति' इत्यादि करमणुकींचें प्राबल्य होत चाललें आहे, हें आमच्या ध्यानांत नाहीं असें नाहीं। उच्च वर्गातील स्त्रियांच्या संबधानें पहातां साधारण लिहितां वाचतां येणें, वर्तमान पत्रांतून येणाऱ्या कांहीं कांहीं विषयांची माहिती स्वतां किंवा पुरुषाकडून करून घेणें, वगैरे थोडथोडी सुधारणा स्त्रियांत होत चालली आहे, ही गोष्ट नाकबूल कोण करणार आहे ? अशा आणखीही कांहीं गोष्टी प्रस्तुत स्थळीं वाचकांनी ध्यानांत आणण्यासारख्या आहेत.

प्रस्तुत संबधानें सनातन धर्माभिमानी जगन्मान्य विदुषी मिसेस् आनी बेझंट हिच्या 'Ancient Ideals' ( प्राचीन संस्था ) नांवाच्या व्याख्यानांत "*Woman-hood*" ( स्त्रिया ) या विषयावर एक फार सुंदर व्याख्यान आहे. तें वाचकांनी मुद्दाम वाचून पहावें. त्यांत खाली दिलेलें वाक्य महत्वाचें आहे तें आमच्या हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या स्थितीस उद्देशून लिहिलें आहेः—Shut up into a narrow, lonely, unthinking life, left often superstitious rather than enlightened in their faith, they fail to influence men, for the man puts aside the opinion of women, generally thinking that it is not

एकंदरींत पहातां परिणाम असा घडतो की, प्रस्तुत रूढ असलेल्या प्रकारामुळे पुरुषाला ज्या मनुष्यापासून कांहीच ज्ञान प्राप्त होत नाहीं, अशा माणसाच्या सहवासांत कसे तरी समाधान मानून रहावें लागतें, व दुसऱ्यापासून आपली मानसिक उन्नति व्हावी अशी जी त्याची उत्कट इच्छा असते ती त्यास कशी बशी तृप्त करून घेणें भाग पडते. पुरुषाच्या बरोबरीचे शिक्षण स्त्रीस नसल्यामुळे, व आपल्या बायकोच्या सहवासाशिवाय त्याला तर गत्यन्तर नाहीं, अशी चमत्कारिक स्थिति कालवशात् त्यास प्राप्त झाल्यामुळे एक नवेंच विघ्न उपस्थित झालें आहे. ज्यांच्या कल्पना व विचार आपल्याप्रमाणेच उदात्त असून बुद्धि सामर्थ्यानें जे आपल्या बरोबरीचे आहेत, अशा मित्रांच्या समागमाचा त्याग करणे त्या बिचाऱ्याच्या कपाळी येतें. आणि त्या समागमाच्या ऐवजीं अशा एका मित्राचा समागम किंवा सहवास त्यास प्राप्त होतो कीं, ज्यापासून त्याच्या मनाची उन्नति होत नाहीं, त्याच्या विचाराची गति कुंठित होते व मोठमोठे उद्योग हाती घेण्यास त्यास जसें उत्तेजन मिळावे तसे मिळत नाहीं. आणि याप्रमाणें अनुभवही येतो. प्रायः असें आढळतें कीं, मोठे होतकरू व मोठी उमेद बाळगणारे तरुण गृहस्थ लग्न *केल्याबरोबर सर्व प्रकारें मानसिक उन्नतीला मुकतात.

---

worthy of consideration because of their lack of education".
(पहा पृष्ठे १२७, १२८.)

यांतील सारांश एवढाच आहे कीं, स्त्रिया अज्ञान असल्यामुळें पुरुष त्यांच्या मतास कांहींच मान देत नाहींत.

* प्रसिद्ध सुधारक कै० **करसनदास मुळजी** यांनी आपल्या "**इंग्लंडांतील प्रवास**" नामक ग्रंथांत इंग्रेज लोकांच्या लग्नसंबधाची माहिती देत असतां असें लिहिलें आहेः—

"नंतर नवरा खिन्न होऊन आपल्या अविवाहित मित्रांना शेवटचा सलाम करितो. कारण, त्या दिवसापासून अविवाहित मित्रांस आपल्या घरीं बोलावणे करणें त्यास सोडून द्यावें लागतें."

आमच्या निबंधकारांनीं पुढें जो मजकूर लिहिला आहे, तो समजण्यास हें वर दिलेलें वाक्य उपयोगीं पडेल असें समजून आम्ही त्याचा उतारा येथें दिला आहे.

त्यांची सर्व सुधारणा जेथल्या तेथेच थबकते. त्यांचे पाऊल पुढें पडत नाहीं. आणि त्यामुळे अर्थात् त्याची पीछेहाट होते. बायकोने जर नवऱ्याला पुढे ढकलला नाही, ह्मणजे त्याला पुढे ढकलण्या पुरती अक्कल जर तिच्यांत नसली, तर या राजश्रीना ती नेहमीं मागेच खेचित राहते. ज्या गोष्टींचें अगत्य, किंवा ज्या गोष्टीविषयींची आस्था तिला वाटत नाही, त्या विषयींची आस्था यालाही वाटत नाहींशी होते. ज्या कामांत ती मन घालीत नाही त्या कामांत हाही मन घालीत नाहीं. पूर्वीचे ( ह्मणजे अर्थात् लग्न करण्याच्या पूर्वींचे ) जे त्याचे मोठमोठे विचार असतात, ते चटसारे त्यास गुंडाळून ठेवावे लागतात. फार काय, त्या विचारास जी त्याची मित्र मंडळी अनुकूल होती त्या मंडळीच्या सहवासाची त्यास इच्छाही होत नाहीं. अखेर त्यांचा सहवास त्यास अनिष्ट व दुःसह वाटूं लागून तो त्यांस मुद्दाम टाळूं लागतो. कारण, त्या मंडळींत तो गेला असतां आपली दुरवस्था, अथवा अधःपात त्याच्या ध्यानांत येऊन त्यास मोठी लाज वाटते. त्याच्या मनाच्या, त्याचप्रमाणे त्याच्या अंतःकरणाच्या सर्व उदात्त शक्ति लुप्त-प्राय होतात. ह्मणजे, त्यांची व्यवसायप्रवृत्ति नष्टप्राय होते. हा जो त्याच्यांत बदल होतो तो, कुटुंबपाशापासून उत्पन्न होणाऱ्या नूतन व केवळ स्वार्थसाधक हेतुस अनुलक्षूनच असतो. शेवटीं परिणाम असा होतो की, थोडक्याच वर्षांनी बहुजनसमाजाचे जसे क्षुद्र विचार असतात, सामान्य मनुष्ये जशी केवळ उदरंभर असतात, द्रव्यसंपादन करून होतां होईल तेवढी चैन मारून घ्यावी, यापलीकडे जशी त्यांची कल्पना जात नाही, त्यांतलाच हाही एक बनून राहतो. याच्यांत आणखी त्यांच्यांत कांहीच फरक रहात नाही.

१८. ज्यांचीं मनें सुसंस्कृत झालेलीं आहेत, ज्यांचे उद्देश व ज्यांचीं मते एक आहेत, ज्यांच्यामध्ये उत्तम प्रकारची समता वास करीत

आहे; म्हणजे, उभयतांही ग्राहकशक्तीने व इतर मानसिक गुणांनीं सारखे असून शिवाय एकाचे एका गुणांत वर्चस्व असले तर दुसऱ्याचे दुसऱ्या गुणांत असावे; अशा रीतीने प्रत्येक दुसऱ्याच्या गुणांवर मोहित होऊन दोघेही आनंद पावत आहेत: कांहीं वेळ एकाने मार्गदर्शक व्हावे, तर कांहीं वेळ दुसऱ्याने व्हावे, अशा रीतीने उभयतांही सुधारणेचा अथवा मानसिक उन्नतीचा मार्ग आक्रमण करित आहेत, व तेणेकरून * परस्परास सुख प्राप्ति होत

---

* प्रस्तुत स्थळीं उत्तर रामचरितांतील सीतादेवीस उद्देशून श्रीरामचंद्र व कुश यांच्या उक्तिः—

‘ अद्वैतं सुखदुःखयोरनुगुणं सर्वास्ववस्थासु य-
‘ द्विश्रामो हृदयस्य यत्र जरसा यस्मिन्नहार्यो रसः
‘ कालेनावरणात्ययात्परिणते यत्स्नेहसारे स्थितं
‘ भद्रं प्रेम सुमानुषस्य कथमप्येकं हि तत् प्राप्यते ’ ( पहा अंक १ )

क तावानानन्दो निरतिशयविश्रम्भबहुलः
क तेऽन्योन्यं यत्नाः क्व च नु गहनाः कौतुकरसाः
सुखे वा दुःखे वा क्व नु खलु तदैक्यं हृदययो
\+ + + + + + + + + +

प्रकृत्यैव प्रिया सीता रामस्यासीन्महात्मनः
प्रियभावः स तु तया स्वगुणैरेव वर्धितः ।

तथैव रामः सीतायाः प्राणेभ्योऽपि प्रियोऽभवत्
हृदयं त्वेव जानाति प्रीतियोगं परस्परम् । ( पहा अंक ६ )

व रघुवंशांतील इंदुमतीस उद्देशून अजराजाची उक्ति —

‘ गृहिणी सचिवः सखी मिथः
‘ प्रियशिष्या ललिते कलाविधौ ’

या दोन उक्तींचें स्मरण झाल्यावरून त्या दिल्या आहेत. आणखीही अशा प्रकारच्या दांपत्यसंबंधाच्या अत्यन्त उदात्त कल्पना आमच्या प्राचीन काव्यग्रंथांतून बऱ्याच सांपडतील. त्या शोधून आमच्या निबंधकारांनीं वर दिलेली वैवाहिक संबंधाची जी उदात्त कल्पना, तिजशीं ताडून पहाण्याविषयी आमच्या रसिक वाचकास आह्मी शिफारस करितों.

आहे; अशा स्त्री पुरुषांचा विवाहसंबंध घडून येणे ह्मणजे काय, त्याचें वर्णन करण्याचा मी प्रयत्नच करित नाही. कारण, अशा विवाहसंबंधाची कल्पना ज्यांस करितां येईल, त्यांस त्या वर्णनाची गरजच नाही. आणि ज्यांना त्याची कल्पना करितां येणार नाही, त्यांना ते वर्णन आकाशात भराऱ्या मारणाऱ्या सुधारकाच्या [illegible] भासेल! परतु मी अगदी खात्रीनें सांगतो कीं, विवाहसंबंधाची जी अत्यन्त उदात्त कल्पना ती हीच. जीं मतें, ज्या रूढि, ज्या संस्था या कल्पनेविरुद्ध असतील, ज्यांचा झोक याहून अन्य दिशेकडे असेल अशा सर्व रूढि, अशीं सर्व मतें, आणि अशा सर्व संस्था, कोणत्याही स्वरूपानें किंवा वेषानें पुढे येवोत, तीं सर्व मनुष्याच्या आद्य व वन्य स्थितीचीं अवशिष्ट चिन्हें आहेत, असें समजलें पाहिजे. सामाजिक संबंधांपैकीं अत्यंत महत्वाचा जो हा वैवाहिक संबंध, त्याचें नियमन समतेच्या तत्वानें जेव्हां होईल, आणि जेव्हां प्रत्येक मनुष्यप्राणी अधिकारानें व विद्येनें आपली बरोबरी करणाऱ्या माणसाशीं अत्यंत ममतेनें व सानुकंपबुद्धीनें वागण्याला शिकेल, तेव्हांच मानवजातीच्या नैतिक सुधारणेस खरोखर आरंभ झाला, असें ह्मणतां येईल.

१९. येथपर्यंत, माणसें लिंगभेदानें कांहीं अधिकारांस अपात्र ठरतात व परवशतेस पात्र होतात, ही समजूत दूर झाली असतां, जगास जे फायदे होतील त्यांचें निरूपण झालें. येथपर्यंत ज्या फायद्याच्या गोष्टी सांगितल्या त्यांत सारभूत अशा या दोनच गोष्टी आहेत. त्या कोणत्या तर विचारांचा व प्रवर्तक शक्तींचा जो सांठा त्यांत भर पडणें ही एक. आणि स्त्रीपुरुषांचा जो परस्परसंबंध त्यांत सुधारणा होणें, ही दुसरी. परतु, सर्वांत महत्त्वाचा फायदा सांगावयाचा राहिला. तो हा कीं, मानव जातीपैकीं निम्या भागाचें दास्यविमोचन होऊन त्याच्या सुखांत मोठीच भर पडणार आहे. हा

फायदा ह्मणजे सामान्य नव्हे. दुसऱ्याच्या इच्छेप्रमाणे चालणे आणि आपल्या इच्छेप्रमाणे चालणे, अशा दोन प्रकारच्या स्थितींत फारच अंतर आहे. मनुष्यमात्राला पहिल्या प्रथम अन्न व वस्त्र या दोन गोष्टी अत्यंत अवश्यकतेच्या आहेत हे खरे. तथापि, या दोन गरजा भागल्या ह्मणजे त्या नंतर पहिली गरज ह्मटली तर स्वातंत्र्याची. जोपर्यंत माणसे बेबंद असतात, तोपर्यंत त्यांना अनियंत्रितस्वातंत्र्यात, ह्मणजे, ज्या स्वातंत्र्यांत कोणत्याही प्रकारची आडकाठी नाही अशा स्वातंत्र्यांत, रहाण्याची इच्छा असते. परंतु कर्तव्यकर्म ह्मणजे काय, व सदसद्विवेक-शक्तीची किती योग्यता आहे, हे जों जों मनुष्यांना कळू लागते तों तों त्या स्वातंत्र्याचा उपभोग घेत असतांना आपले वर्तन या वरील दोन तत्त्वांस अनुसरून ठेवण्याविषयी त्यांची प्रवृत्ति अधिकाधिक होत जाते. असे जरी असले तरी, स्वातंत्र्याची इच्छा त्यांची कमी होते असे नाही. त्याचप्रमाणे, कर्तव्य व विचार-शक्ति या दोन मार्गदर्शक तत्त्वांच्या ऐवजी दुसऱ्याची इच्छा हाच आपला कायदा असे धरून चालण्यास मनुष्य कधीच राजी होत नसतात. उलट ज्या लोकांत विचारशक्ति विशेष वाढलेली असते, व ज्या लोकांत सामाजिककर्तव्याची कल्पना फार बलवत्तर असते, अशाच लोकांचा व्यक्ति-स्वातंत्र्याविषयी विशेष कटाक्ष असतो. आणखी त्यांचे असे ह्मणणे असते की, प्रत्येक व्यक्तीला स्वकर्तव्याच्या संबंधाने जे कांही वाटेल, व त्याच्या सद्सद्बुद्धीला जे कायदे व सामाजिक निर्बंध पसंत पडतील तदनुसार वागण्याची त्याला पूर्ण मुभा असली पाहिजे.

२०. व्यक्तिस्वातंत्र्य मनुष्याच्या सुखाला किती अवश्य आहे, हें ज्याला समजण्याची इच्छा असेल, त्याने आपल्या सुखाच्या संबंधाने स्वातंत्र्याची किंमत आपण किती समजतो, या गोष्टीचा विचार अवश्य केला पाहिजे. कोणताही मनुष्य आपल्या स्वतःबद्दल विचार

करीत असला, व तोच मनुष्य दुसऱ्या लोकांविषयी विचार करीत असला, तर या दोन प्रकारच्या विचारांत नेहेमी पुष्कळ अंतर आढळते. आह्मांस आमच्या इच्छेप्रमाणे वागण्यास स्वातंत्र्य नाहीं, आमच्या कामाची व्यवस्था आमच्या इच्छेनुसार होत नाही, अशी दुसऱ्यांची कुरकुर एखाद्या परक्या मनुष्याने ऐकिली असतां तो त्यांस विचारतो, "कायहो बोवा, तुमची दुःखे व अडचणी आहेत तरी कोणकोणत्या? तुमचे खरोखर काय नुकसान झाले आहे? आणि तुह्मी आपल्या कामाची अव्यवस्था झाली आहे असे ह्मणतां ती कोणत्या बाबतींत?" आणि या प्रश्नाला त्याला योग्य व समर्पक वाटेल असे उत्तर मिळाले नाही, ह्मणजे तो त्यांच्या कुरकुरीकडे दुर्लक्ष करतो. मग तो ह्मणतो. 'या लोकांच्या तक्रारी विनाकारण व केवळ काल्पनिक आहेत. हे लोक असे आहेत कीं, त्यांच्याशीं कोणी कसाही न्यायाने व योग्य प्रकाराने वागला तरी त्यांचा संतोष ह्मणून व्हावयाचा नाहीं.' परतु तोच मनुष्य आपल्या संबंधाने विचार करू लागला असतां त्याचे पहाणे अगदीं निराळ्या दृष्टीचे असते. ह्मणजे, प्रत्यक्ष जेव्हां त्याच्यावर प्रसंग येतो, त्या वेळेस, त्याचा कारभार पहाण्यास जर दुसऱ्या कोणाची योजना केली असली, व त्याचा कारभार कितीही जरी चोख व निर्दोष असला, तरी त्याला त्यापासून समाधान होत नाहीं. कारण, निर्णायक अधिकार त्याच्या हातांत नसणे, हेच एक त्याला सर्वांत मोठे दुःख वाटत असते. आपल्या कारभाराची अव्यवस्था होत आहे कीं काय, या प्रश्नांत तो मुळीच शिरत नाही. ही गोष्ट व्यक्तिमात्राची झाली. परंतु राष्ट्राचाही प्रकार तोच असतो. आपल्या स्वातंत्र्यावर पाणी सोडून आपल्याकरितां दुसरा जर कोणी आपला कारभार मोठ्या कुशळपणानें व नेकीनें करण्यास सिद्ध असेल, तर या

गोष्टीला कोणत्या स्वतंत्र देशांतील मनुष्य राजी होईल बरे? ज्या कारभारांत आपला मुळीच संबंध नाही, असा कारभार परके लोक उत्तम प्रकाराने चालवितील असे जरी त्यास वाटले, तरी त्याच्या असेही मनांत येईल की, सार्वजनिक कामें—मग ती वेडी वांकडी कां होईनात—ज्यांची त्यांनी चालविण्यांत एक प्रकारची नीति-संबधाची जबाबदारी ज्याची त्याजवर राहून जो कांही एक चांगला परिणाम होत असतो, त्याचाही विचार अवश्य केला पाहिजे. तात्पर्य या मुद्याच्या संबधानें जें कांही पुरुषांना वाटत असतें, तेंच स्त्रियांसही वाटतें, याविषयीं त्यांनी खात्री बाळगावी. प्रसिद्ध **ग्रीक** इतिहास-कार **हिरॉडोटस्** याच्या काळापासून तो आज कालपर्यंत, स्वराज्या-पासून, अथवा अनियंत्रित शासन-पद्धतिपासून मनुष्याच्या मनावर घड-णारे जे उदात्त संस्कार, मनुष्याच्या मानसिक शक्तींना प्राप्त होणारी जी तरतरी, मनुष्याच्या मनोविकारांना व बुद्धीला विषयभूत होणारे जे मोठ मोठे व उदात्त हेतु, स्वसुख-निरपेक्ष अशी सार्वजनिक हिता-विषयींची आतुरता, व त्याजपासून उत्पन्न होणाऱ्या स्वकर्तव्यविषयक शांत व गंभीर अशा कल्पना, नीतिसंबंधानें, अध्यात्मसंबधानें व सामा-जिकसंबंधानें व्यक्तिमात्राच्या अंगीं प्रायः येणारी किंवा प्राप्त होणारी उदात्तता, वगैरे गोष्टी जशा पुरुषांच्या संबंधानें खऱ्या आहेत, तशा स्त्रियांच्या संबधानेंही खऱ्या आहेत. या वर सांगितलेल्या गोष्टी व्यक्तिसुखाला अवश्य नाहींत काय? बालदशा सुटून यौवनदशा प्राप्त होण्याच्या प्रसंगी, आपणावर प्रीति करणाऱ्या वडील माणसांच्या दाबां-तून मुक्त होऊन पुरुषत्वाची जी प्रौढदशा, त्या दशेत प्राप्त होणाऱ्या ज्या जबाबदाऱ्या, त्या अंगावर येत आहेत अशा प्रसंगीं, प्रत्येक पुरु-षाला काय वाटत असते, या गोष्टीचा ज्याचा त्यानेंच विचार करावा. अशी कल्पना करूं कीं, एखाद्याच्या डोक्यावर मोठा बोजा दिला

आहे, किंवा त्याला दोऱ्यांनी जखडून टाकिले आहे. अशा स्थितींत यद्यपि त्यास कांहीं विशेष शारीरिक दुःख होत नसलें, तथापि त्याची स्वैर गति कुंठित झाली असल्यामुळें त्यास चैन पडणार नाहीं हें उघड आहे. त्या स्थितीतून जर तो दैवयोगानें सुटला तर त्याला जें कांहीं वाटेल, त्याप्रमाणेच स्वातंत्र्य प्राप्त झालेल्या प्रत्येक पुरुषास वाटत नाहीं काय? भार-मुक्त झाल्यावर त्यास विशेष हुशारी वाटून आपणांस जणूं पूर्वीपेक्षां दुप्पट ताकद आली आहे असें त्यास होत नाहीं काय? अशा स्थितीची इच्छा स्त्रियांस नसेल, असें पुरुष समजतात कीं काय? परंतु, हाच तर मोठा चमत्कार आहे कीं, ज्याचा त्याला आपल्या स्वतांचा मात्र अभिमान मोठ्या महत्वाचा वाटतो. त्यास जी कांहीं महती वाटते ती स्वतःच्या संबंधा पुरतीच. दुसऱ्याच्या संबंधाची गोष्ट असली ह्मणजे मग त्याला स्वाभिमान ह्मणजे काय तो कळतच नाहीं! मनुष्याच्या ठिकाणीं स्वाभाविक जे मनोविकार आहेत, त्यांपैकीं स्वाभिमानाचा अथवा स्वातंत्र्येच्छेचा आपल्या वर्तनावर फार मोठा परिणाम घडतो, असे जर कोणीं सांगूं लागला, तर तो त्याचें ह्मणणें ऐकत देखील नाहीं. याचें कारण कदाचित् असें असेल कीं, प्रत्येक पुरुषास आपल्या स्वतांच्या वर्तनावर स्वाभिमानापेक्षा इतर मनोविकारांचाच पगडा अधिक आहे, असें मानण्यांतच भूषण वाटत असतें. आणि स्वाभिमान व मानहानि या [illegible] आपल्यावर किती प्राबल्य असतें, ही गोष्ट बहुधा त्याच्या ध्यानांत येतच नाहीं. परंतु, आपण अशी पक्की खात्री बाळगावी कीं, या मनोवृत्तीचा पगडा स्त्रियांच्या मनावर थोडा असतो असें नाहीं. स्वाभिमानाची जी अत्यंत नैसर्गिक व सहज प्रवृत्ति ती दाबून ठेवण्याविषयीच त्यांना शिक्षण मिळालेलें असतें. तथापि, त्यांचें जे अंतस्थ स्वरूप तें तसेंच कायम राहून त्यांस निराळे

बाह्यस्वरूप प्राप्त होते. ज्या मनुष्यांत तरतरी व धमक असते त्याला जर स्वातंत्र्य नसेल तर त्याचा प्रयत्न नेहमीं आपले वर्चस्व दुसऱ्यावर व्हावें एतद्विषयीं असतो. आपली आपल्यावर सत्ता चालविण्यास मिळत नाही अशी स्थिति जर त्यास प्राप्त झाली तर दुसऱ्यास आपल्या कक्षांत ठेवण्याचा प्रयत्न मनुष्य करीत असतें. कोणत्याही मनुष्यप्राण्याच्या स्वातंत्र्याचा अपहार करून त्यास परावलंबी करून ठेवणें, ह्मणजे दुसऱ्याच्या इच्छेप्रमाणेंच वागण्यास त्यास भाग पाडणे होय. ज्या ठिकाणीं स्वातंत्र्याची आशा नाहीं, परतु दुसऱ्यावर वर्चस्व ठेवण्याची आशा आहे, त्या ठिकाणी दुसऱ्यावर वर्चस्व राखणे किंवा दुसऱ्यावर सत्ता चालविणें, एतद्विषयींच मनुष्याच्या मनांत फार प्रबल इच्छा उत्पन्न होते. ज्यांची कामें त्यांस करू न देतां त्यांत दुसरे ढवळाढवळ करूं लागले तर तीं माणसें त्यांच्यांत कांहीं राम असल्यास त्या गोष्टीचा प्रतिकार करितात, व उलट दुसऱ्याच्या कामांत नी आपला हात शिरकावून आपले हेतु सिद्ध करून घेतात. आणि या [illegible] स्त्रियांना नट्टापट्टा करावासा वाटतो. शरीरसौंदर्य व वस्त्रालंकार यांची विलक्षण हाव त्यांस सुटते. आणि त्यापासून द्रव्यनाश, अनीति वगैरे अपाय ससारांत उत्पन्न होतात. स्वातंत्र्याची इच्छा व अधिकाराची इच्छा ( ह्मणजे अर्थात् दुसऱ्यावर आपली सत्ता असावी, आपणांस वाटेल तसें दुसऱ्यांस वागवितां यावें एतद्विषयीं इच्छा ) या दोन इच्छामध्यें निरंतर विरोधभाव असतो. या दोघांचें नेहमीं वांकडें असतें. ज्या ठिकाणी स्वातंत्र्य मुळींच नसते त्या ठिकाणीं सत्तेचा अभिलाप फार उत्पन्न होतो. बऱ्या वाईटाचा विचार एकीकडे ठेवून दुसऱ्यावर आपला पगडा जेणेकरून बसेल अशी कांहीं तरी युक्ति काढण्याची इच्छा प्रबल होते. दुसऱ्यावर सत्ता चालविण्याची ( ह्मणजे दुसऱ्यास परतंत्र करण्याची ) इच्छा, ही

मनुष्य जातीस खरोखर हीनत्व आणणारी व नीतिभ्रष्ट करणारी आहे. प्रत्येक व्यक्तीचें सत्तेशिवाय चालते, अशी स्थिति जेव्हां येईल तेव्हांच ही दुष्ट प्रवृत्ति नष्ट होईल. आणि सत्तेशिवाय चालतें असे केव्हां होईल, तर आपापल्या कामांत प्रत्येक व्यक्तीला पूर्ण स्वातंत्र्य असणे, एकानें दुसऱ्याच्या आड कधीही न येणे, हे तत्त्व जेव्हां स्थापित होईल तेव्हां.

२१. आपापल्या मानसिक शक्तीचा ओघ पाहिजे त्या विषयाकडे लावितां येण्याची मुभा असणें, ही गोष्ट व्यक्तिसुखास साधनीभूत होत असते. त्याचप्रमाणे, त्या मानसिक शक्तींची स्वैरगति निरुद्ध झाली, ज्याला ज्या कामाची हौस ते काम करू देण्याचा त्याला प्रतिबंध केला, तर ही गोष्ट त्याच्या खऱ्या सुखाच्या आड येते. कारण, मनुष्यमात्रास स्वाभिमान अथवा स्वप्रतिष्ठा स्वभावतःच चिकटलेली आहे. अर्थात् स्वाभिमानानें स्त्रियांसही सोडलें नाहीं. व्याधि, दारिद्र्य व पापकर्म ही नेहेमीं मनुष्याच्या सुखाला विघातक होतातच. परंतु, या तिन्हींचाही जरी अभाव असला तरी, ह्मणजे आरोग्य आहे, संपत्ति आहे, पुण्यांश आहे, वर्तन शुद्ध आहे, तथापि आपल्या प्रखर अशा मानसिक शक्तींच्या व्यापारास योग्य स्थळ नाही, तर यासारखी मनुष्याच्या सुखाला मोठी विघातक दुसरी गोष्ट नाही. ज्या स्त्रियांच्या मागें कुटुंबाचा व्याप असतो, (तोही जोंपर्यंत कायम असतो तोंपर्यंत) त्यांच्या मानसिक शक्तींना तो व्याप पुरा होतो. दुसऱ्या व्यापाची गरज लागत नाही. परंतु ज्या स्त्रियांची मुलें मृत्यूने हिरावून नेली असतील, अथवा त्यांजपासून दूर कोठे जाऊन पडली असतील, किंवा त्यांची लग्नें होऊन ती स्वतंत्र बिऱ्हाड करून राहिलीं असतील, अशा स्त्रियांनी काय करावे? त्याना कांही तरी व्याप पाहिजे की नको? ज्या पुरुषांचें सर्व आयुष्य उद्योगधंद्यांत गेले असे पुरुष, जो

थोडा द्रव्यसंचय त्यांनी केला असेल त्याजवर अवशिष्ट राहिलेले आयुष्य खुशाल आनदानें विश्रांतींत घालवूं, अशा आशेने उद्योग धंदा सोडून देतात. परंतु पुढे थोडक्याच काळांत, जुन्या व्यवसायांच्या ऐवजीं कांहीं नवीन व उत्साहजनक असे व्यवसाय करण्याचें सामर्थ्य त्यांचे अंगीं नसल्यामुळें त्यांचें ते निरुद्योगी आयुष्य त्यांस कंटाळवाणे होऊन त्यांचे ठायीं निरुत्साह व उदासीनता उत्पन्न होतात व ते अकालींच निजधामास जातात. अशी शेकडो उदाहरणे आढळतात. असें आहे तरी, बिचाऱ्या भाविक व सर्वथा योग्य अशा पुष्कळ स्त्रियांची स्थिति अगदीं पुरुषांप्रमाणेंच असतां त्यांचा मात्र कोणी विचार करीत नाही. समाजाच्या ऋणांतून जरी त्या मुक्त झाल्या, ससार केला, मुलाबाळांची रात्रंदिवस काळजी वाहिली, पोरींना नवरे मिळाले, सुना घरी आल्या, व्यवस्था पहाण्याला जोपर्यंत घर होतें तोंपर्यंत घरची व्यवस्था त्यांनीं पाहिली, शेवटीं जो एकच व्याप त्यांच्यामागें होता, जो एकच व्यवसाय त्या शिकल्या होत्या, तोही सुटला. मग त्यांनीं काय करावें? काम करण्याची धमक किंवा कुवत तर अद्याप अंगांत कायम आहे. पण उद्योग नाहीं. अशी त्यांची स्थिति होते. कदाचित् तिच्या एखाद्या लेकीनें किंवा सुनेनें आपल्या नवीन थाटलेल्या ससाराची व्यवस्था पाहाण्याकरितां तिची नेमणूक केलीच तर तिचें मोठें नशीब! स्त्रियांचें सामाजिक कर्तव्य ह्मणून जगानें जो व्याप त्या बिचाऱ्यांच्या मागें लावून दिलेला असतो, तो पतकरून ज्यांनी आपलें कर्तव्य इमाने इतबारें बजाविलें, त्यांच्या वृद्धदशेत त्यांची अशी अवस्था व्हावी हें त्यांचे दुर्भाग्यच नव्हे काय? अशा स्त्रियांना व ज्या स्त्रियांच्या मागें विवाह न झाल्यामुळें, ससाराचा पाश लागला नाही, अथवा विवाह होऊन ज्यांस अपत्य झाले नाही, किंवा ज्यांचे पति मृत होऊन ज्यांनीं नवीन संबंध केला नाहीं—त्यांपैकी पुष्कळ स्त्रिया योग्य व्यवसायाच्या

अभावामुळे व त्यांच्या प्रवर्तक शक्तीचा विकास न होऊ दिल्यामुळें आपापल्या ठिकाणी रात्रंदिवस झुरत असतात व आपले कंटाळवाणें आयुष्य कसे तरी लोटीत असतात—अशा स्त्रियांचे मुख्य कर्तव्य ह्मटलें ह्मणजे बहुधा दानधर्म करणें व हरि हरि करीत बसणे! अशा स्त्रियांचा धर्म ह्मणजे व्रत वैकल्यें करणे. प्रवृत्तिमार्गापेक्षां प्रायः निवृत्तिमार्गाचाच भाग त्यांत अधिक असतो.* प्रवृत्तिमार्गोपैकीं कदाचित् दान करणे एवढाच प्रकार धरितां येईल. दानधर्माच्या कामात स्त्रिया जात्या फारच दक्ष असतात, हे खरें. परंतु धर्मकृत्यांची व्यवस्था योग्य प्रकारें करितां यावी, दानसंबधानें युक्तायुक्त व पात्रापात्र विचार करण्याचे सामर्थ्य यावें, दानाच्या योगानें

* प्रस्तुत स्थळीं आमच्या इकडील गतभर्तृकांची आठवण वाचकांस झाल्याशिवाय रहाणार नाहीं. आमच्या इकडील स्त्रियांपैकीं सौभाग्यवती असल्यास बहुधा वृद्धपणी यांच्या मागें व्रतवैकल्यांचा लकडा लागलेला असतो. विधवा असल्यास तरुण व वृद्ध अशा दोन्ही अवस्थेतील स्त्रिया या व्रतवैकल्याच्या सपाट्यांत सांपडतात. एकदा बिचारीचा पति मृत झाला कीं, 'हें करूं नको, तें करू नको, हें खाऊं नको, तें नेसू नको, इंथ बसू नको, तिथे जाऊं नको' असा नको नकोचाच धर्म तिच्या मागें लागतो. त्यामुळें कित्येकांना आपला जीवही नको नकोसा होत असेल! विधवा स्त्रियांची दुःखें वर्णन करण्याचें एक तर हे स्थळ नाहीं आणि दुसरें आजपर्यंत रा. सा. कद्री यांच्यासारख्या सदय अंतःकरणाच्या व कट्ट्या लेखणी बहाद्दरांनी या कामीं आपली लेखणी झिजविली परंतु आमच्या कठोर हृदयांच्या व मठ्ठ झालेल्या लोकांच्या बुद्धिमंदिरांत त्यांच्या शब्दांचा प्रवेश होईल तेव्हांना! आमच्याकडे असे एकेक 'महामहोपाध्याय' आहेत कीं त्यांना 'स्त्रियांचें मुंडन पाहून दुःख होत नाहीं,' 'स्त्रियांना मुख्य अलंकार काय ते केश आहेत' असें वाटत नाहीं, तर उलट असें वाटतें कीं, स्त्रियांचें मुंडन जर न केलें तर 'यथेच्छ विहार करणाऱ्या लोकांना' लागलीच 'मोकळीक' देण्यासारखें होईल! (पहा केसरी ता. १७ डिसेंबर १८८९). केवळ शब्दपांडित्यांत व मीमांसेच्या पोकळ 'घटपटादि खटपटीत व शुष्क वादात ज्यांचें आयुष्य गेलें व जुन्या समजुतींची पुटेंची पुटें बसून ज्यांची हृदयें व ज्यांच्या बुद्धि नूतन संस्काराला सर्वथा अस्पृश्य व अपात्र झालीं आहेत, अशा लोकांशीं वाद करण्याचें सोडून द्यावें, यांतच अधिक शहाणपणा आहे, असें बऱ्याच समंजस लोकांस वाटूं लागलें आहे.

विपरीत परिणाम अथवा अपाय होऊं नये, असा हेतु असेल तर, एखाद्या चतुर कारभाऱ्यास जें शिक्षण, जी अनेक प्रकारची सिद्धता, जें ज्ञान व विचारशक्ति वगैरे गुण लागतात, त्याच गुणांची अपेक्षा धर्मकृत्यांची व्यवस्था पहाणाऱ्या स्त्रियासही असते. धर्मकृत्यांची व्यवस्था ज्यास उत्तम प्रकारें करितां येते, त्याच्या अंगी राज्यकारभारास लागणारे बहुतेक गुण आहेतच, असे समजावें. या व दुसऱ्या अनेक संबधानें (विशेषेंकरून बालकांच्या शिक्षणसंबंधानें) स्त्रियांच्या मागें जी कर्तव्यें लावून दिलीं आहेत, तीं कर्तव्यें त्याजकडून योग्य रीतीनें होत नाहींत. याचें कारण जीं कामें करण्याविषयीं त्यांस प्रतिबंध आहे (आणि या प्रतिबंधामुळे समाजाचें खरोखर फार मोठें नुकसान होत आहे) तीं कामें करण्याचें सामर्थ्य अंगीं आणणाऱ्या शिक्षणाचा पूर्ण अभाव. ह्मणजे, तीं त्यास चांगलीं करितां येतील, अशा प्रकारचें शिक्षण नसणें. प्रस्तुत ठिकाणीं एका गोष्टीचा उल्लेख केल्याशिवाय मला रहावत नाहीं. काय चमत्कार! स्त्रिया अमुक कामास अनधिकारी किंवा अपात्र आहेत, असें प्रतिपादन करणारे लोक, प्रतिष्ठितपणानें व सरळ मार्गानें वाद करण्याचें सोडून देऊन, जी गोष्ट त्यांस आवडत नाही तिची नुसती टर उडविण्याचा व नुसता उपहास करण्याचा मार्ग स्वीकारितात! स्त्रियांची कर्तृत्वशक्ति व त्यांचा पोक्त उपदेश यांचा राजकारणांत कधी कधीं फार उपयोग होण्याचा संभव आहे, अशी एखाद्यानें सूचना केल्याबरोबर, ही थट्टेखोर व विनोद प्रिय मंडळी कोटिक्रम कसा करितात तो पहा! ते ह्मणतात:—"वा! खाशी युक्ति! वीस वर्षांच्या आंतील वयाच्या, कोंवळ्या, लुसलुशित अविवाहित पोरी, अथवा बावीस किंवा तेवीस वर्षांच्या विवाहित तरुणी, आपल्या घरांतील दिवाणखान्यांतून उचलाव्या आणखी पार्लमेन्ट गृहांत किंवा कारभारी मंडळांत अचानक नेऊन सोडाव्या!

मग राज्याचा बंदोबस्त काय विचारतां! *" पण ही उपहास करणारी मंडळी एक गोष्ट सर्वथा विसरतात. ती ही की, पार्लमेन्टसभेत आपल्या तर्फे प्रतिनिधि ह्मणून, किंवा मोठ्या जबाबदारीची राज्यकारभाराचीं कामें करण्यास ह्मणून, जे पुरुष निवडले जातात, ते तरी इतक्या अल्पवयाचे निवडले जातात काय? ही गोष्ट, ज्यांस थोडा तरी सारासार विचार आहे, त्यास देखील कळेल की, अशी जबाबदारीचीं व विश्वासाचीं कामें जर स्त्रियावर सोपविलींच तर विवाहाच्या मागें किंवा विवाहित स्थितीच्या मागे असणारे जे पाश, त्यापासून ज्या स्त्रिया मुक्त आहेत, किंवा ज्यांस आपल्या बुद्धिसामर्थ्याचा उपयोग सार्वजनिक कामांत करण्याची इच्छा आहे (हल्लीही लग्न करून संसार थाटण्यापेक्षां

* आमचे इकडेही अनेक 'काळ,' 'वैभव' इत्यादि पत्राचा अवतार प्रस्तुतसारख्या विषयाचा यथेच्छ उपहास करण्या कारितांच होय. पांचवी राष्ट्रीय सभा झाली त्या वेळी पुरुषांप्रमाणें कांहीं स्त्रियाही प्रतिनिधि ह्मणून आल्या होत्या मुंबईस सभेच्या बैठकी होण्यापूर्वी व त्यानंतर वर्तमान पत्रांत यासंबधाने जे कांही लेख आले त्यांपैकी प्रस्तुत स्थळीं प्रतिष्ठित व लोकमान्य अशा दोन पत्रांतील उताऱ्यांचा संग्रह आमच्या वाचकांकरितां येथें करणे इष्ट दिसतें

केसरी—२४ डिसेंबर १८८९—

" शिकंदराबादेच्या लोकांनीं रा. त्रिंबकराव कानरान यांच्या पत्नीस आपल्या तर्फे मुखत्यार निवडून पाठविले आहे. तसेंच मद्रासेकडील एक स्त्री डेलिगेट येणार आहे. आणखी कांही स्त्रिया राष्ट्रीय सभेचे सभास्थान अलंकृत करणार का नाही तें कळत नाही. वास्तविकपणें हा अपूर्व प्रकार पाहून लोकांचें मत कसें काय बनतें हें सांगतां येत नाही. पण स्त्रीशिक्षणाचा प्रसार चालू ठेवावयाचा इतकेंच नाहीं तर तो वाढवावयाचा असेल, स्त्रियांना दिवसानुदिवस त्यांच्या योग्यतेप्रमाणे कामें व अधिकार ही द्यावयाचीं असतील तर अशा प्रकारचे प्रसंग येणारच. हा प्रकार केवळ अपूर्व मानून तेवढ्याकरितांच नाक मुरडणें ठीक होणार नाही. पंडिता रमाबाई सारख्या स्त्रिया असल्या सभेंत आल्या तर त्या सभेला एक प्रकारची विशेष शोभा खचित येईल. आता डेलिगेट होऊन येणाऱ्या स्त्रियांस डेलिगेटांत जागा मिळते किंवा नाही,—वास्तविक पहातां त्यांना जागा कां मिळू

जी कांहीं प्रतिष्ठेची कामें करण्याविषयीं समाजानें त्यांस मोकळीक दिली आहे तीच त्या पतकरितात) अशाच स्त्रियांवर सोपविली जातील. जी कामें आपण करावीं अशी त्यांस इच्छा होईल ती करण्याविषयीं आपले ठिकाणीं पात्रता यावी या हेतूनें ज्यांनी आपल्या तारुण्याचा ऐन बहर अभ्यास करण्यांत घालविला आहे; अथवा विशेषकरून, आपल्या कुटुंबांत राहून ज्यांनीं व्यवहारज्ञान व शासनदक्षता संपादन केली आहे, अशा चाळीस किंवा पन्नास वर्षांच्या गतभर्तृका, किंवा सभर्तृका स्त्रिया, योग्य अभ्यासानें, पार्लमेंट सभेंत बसण्यास किंवा जबाब-

---

नीय हें आह्मास सांगतां येत नाहीं आणि मिळाल्यास त्या तेथें मोनव्रत स्वीकारतात अगर आपले विचार इतर सदस्यांना कळवितात इत्यादि गोष्टी जाणण्याविषयीं लोक आतुर होतील"

राष्ट्रसभेंत सात आठ स्त्रिया प्रतिनिधि ह्मणून आल्या होत्या. ह्या वेळीं 'सामाजिक परिषद' किंवा समाजसुधारकांची सभा भरली होती त्या वेळीं गतभर्तृकांच्या असमत केशवपनसंबंधाचा प्रश्न निघाला असतां **पंडिता रमाबाईंनीं** व **मिसेस गांगोली** बी. ए. अशा दोन स्त्रियांनीं भाषणें केलीं ती ऐकण्याविषयीं जमलेला समाज अत्यन्त आतुर होता व तीं भाषणेंही फार श्रवणीय झालीं, पकल्या गोष्टी येथें नमूद करून ठेवणें इष्ट दिसतें.

सुधारक ६ जानेवारी १८९० —

"तारीख २७ रोजीं **कायदे कौन्सिल सुधारणा** या मसुद्याचा विचार झाला. पुढें आणिलेल्या मसुद्यांत ६ कलमें होतीं * * * त्यांतील तिसऱ्या कलमांत 'पुरुष" या ठिकाणीं 'मनुष्यें" असा शब्द घालावा अशी मिसेस गांगोली यांनी सूचना केली होती ती बरोबर आहे असें आह्मांस वाटतें कायदे करणाऱ्या मंडळींमध्यें स्त्रिया बसू लागण्यास जरी अजून अनंत अवकाश आहे तथापि कायदे करितांना कोणत्याही सद्गुणी व समंजस मनुष्यास तेथें जाण्यास जाणून बुजून हरकती ठेवणें, आह्मांस समंजस दिसत नाहीं चांगला परिणाम व्हावा अशी इच्छा जागृत ठेवणें असेल तर स्त्रियांना पुरुषाबरोबर लढाई करण्यास जागा ठेवणें हें उचित नाहीं. विदुषी रमाबाईसारख्या अनुभवी स्त्रिया बाहेर ठेवून विद्यालयांतून बाहेर पडलेल्या बालकांस कायदे करण्याकरितां आंत घेणें, हें 'शुक्नीस' जमत नाहीं."

दारींची राजकारणाचीं कामें करण्यास पात्र व अधिकारी होणार नाहींत काय? **यूरोप** खंडांतील बहुतेक सर्व देशांतून खासगी कामांत व राजकीय कामांत हुशार, अनुभवी व व्यवहारदक्ष अशा स्त्रियांची सल्लामसलत व साहाय्य यांचा अनेक प्रसंगी आपणास उपयोग झाला आहे, असें मोठमोठ्या लोकांनी, कबूल केल्याचीं व त्यांच्या गुणांचें ग्रहण केल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. सार्वजनिक कामांत किंवा राजकीय कारभारांत अशा कांहीं महत्त्वाच्या बाबी आहेत कीं त्यांत स्त्रियांची बरोबरी करणारे पुरुष क्वचितच सांपडतील. या बाबींत खर्चाच्या संबंधाची काटकसर ही एक बाब होय. प्रस्तुत स्थळीं समाजाला स्त्रियांच्या बुद्धिसामर्थ्याची अपेक्षा आहे कीं काय, या गोष्टीचा आपण विचार करीत नाहीं. तर, आपले आयुष्य व्यर्थ जात आहे, आपलें जीवित निष्फळ होत आहे, असें वाटून स्त्रियांनी उदासीन व हताश होऊन बसणें, हें योग्य आहे काय? एवढ्याच गोष्टीचा आपणास विचार कर्तव्य आहे. कांहीं स्त्रियांस विवाह करून संसार करणे हा जो एकच व्यवसाय समाजाने विहित मानिला, तो कधीच प्राप्त झाला नाही.* कांहीं स्त्रियांस एक वेळ तो प्राप्त झाला होता परतु पुढे नाहींसा झाला, अशा हजारो स्त्रिया, आपल्या ठिकाणीं व्यवहारदक्षता असूनही विवाहाशिवाय अन्य व्यवसाय करण्याचा प्रतिबंध समाजानें केल्यामुळे निरुत्साह व निराश होत्सात्या आपलें जन्म व्यर्थ असें समजून आयुष्याचे दिवस लोटीत असतात, या गोष्टीचा विचार आपले मनांत येऊ नये काय? मनुष्यप्राण्याच्या सुखाला अत्यंत महत्वाची व आवश्यक अशी जर कांहीं एक गोष्ट असेल तर ती ही आहे कीं, ज्याचा त्याला आपला व्यवसाय करण्याचा पूर्ण उल्हास वाटणें.—या गोष्टीची उणीव असल्यामुळें, ह्मणजे ज्याला जो धंदा नेहमीं करावा लागतो तो करण्या-

---

* आमच्या प्रमाणें यूरोपियन् लोकांत प्रत्येक मुलीचें लग्न झालेंच पाहिजे असा प्रकार नाहीं, ह. गोष्ट येथें वाचक नी ध्यानांत ठेवावी.

विषयीं त्यास उत्साह नसल्यामुळे, जीवितसाफल्यास अवश्य अशा इतर सर्व गोष्टी जरी त्यांना अनुकूल आहेत असे दिसते, तरी वर सांगितलेल्या एका गोष्टीच्या उणीवेमुळे पुष्कळ माणसांचे जन्म फुकट गेल्यासारखे होतात. बाह्य उपाधि आपल्या स्वाधीन करून घेण्याचे चातुर्य समाजाच्या ठिकाणीं अद्यापि आलें नाहीं, या कारणानें मनुष्यांचे जन्म निष्फळ व्हावे, ही गोष्ट सांप्रत अपरिहार्य आहे. हे जरी खरें असलें तरी समाजानें निदान आपण होऊन तरी मनुष्यांचे जन्म निष्फळ करण्यास प्रवृत्त होऊं नये, इतकेंच माझें ह्मणणें आहे. आईबापाच्या अदूरदर्शित्वामुळें, किंवा तरुण माणसांस जगाचा अनुभव नसल्यामुळें, आवडता व्यवसाय प्राप्त होण्यास अवश्य अशा अवांतर गोष्टींच्या प्रतिकूलतेमुळें व नावडता असा व्यवसाय प्राप्त करून देणाऱ्या गोष्टींच्या अनुकूलतेमुळें वगैरे कारणांनीं शेकडो माणसांस एकादा धंदा आपल्या इच्छेविरुद्ध व कसाबसा तरी करण्यांत आपलें आयुष्य घालवावें लागतें. जे धंदे त्यांनीं मोठ्या खुपीनें, सुखासमाधानानें व चांगल्या प्रकारें केले असते, असे दुसरे पुष्कळ धंदे करण्याची त्यांस समाजानें आपलेकडून पूर्ण मोकळीक दिली असूनही असा परिणाम पुरुषांच्या संबंधानें होतो. मग प्रत्यक्ष कायद्यानें, व कायद्याच्याच बरोबरीच्या ज्या लोकरूढि, त्या रूढींनीं, ज्या स्त्रियांचा व्यवसायमार्ग संकुचित करून टाकिला, त्या स्त्रियांवर केवढा जुलूम होतो, याचा विचार आपणांस अवश्य केला पाहिजे. ज्ञानविहीन समाजांत, वर्ण, जाति, आणि धर्म व परवश झालेल्या देशांत राष्ट्रजनता ( nationality ), ह्मणजे त्या देशांत जन्म प्राप्त होणें, या गोष्टींचा परिणाम जसा कांहीं पुरुषांस बाधक होतो, तसाच लिंगभेद एकंदर स्त्रीवर्गास बाधक होतो, हे ध्यानांत आणिलें पाहिजे. बहुतेक सर्व प्रतिष्ठेची कामें करण्याची स्त्रियांस एकदम बंदी! जीं कामें

दुसऱ्यांस ( पुरुषवर्गापैकीं खालच्या वर्गास ) करितां येत नाहींत किंवा जी कामें आपणांस उचित नाहींत असें त्यांस वाटत असेल, तेवढीं कामें मात्र करण्याची पूर्ण मुभा पुरुषांनीं स्त्रियांस दिली आहे. आपलें आयुष्य व्यर्थ गेलें* असें वाटून किती स्त्रिया दुःखाग्नीनें पोळल्या जातात, याची कल्पना थोड्याच लोकांस असेल! कारण, वर सांगितलेल्या गोष्टींमुळें उत्पन्न होणाऱ्या ज्या यातना किंवा दुःखें ज्यांस सोसावीं लागतात त्यांची कोणास दयाच येत नाहीं. जों जों स्त्रियांस अधिकाधिक शिक्षण मिळत जाईल, जों जों त्यांचीं मनें अधिक ज्ञानसंपन्न व सुसंस्कृत होत जातील, तों तों त्यांच्या विचारांत आणि बुद्धिसामर्थ्यांत व समाजानें त्यांच्या व्यवसाय–प्रवृत्तीला जेवढा अवकाश ठेविला आहे, त्यांतील विसंगतपणा अधिक होऊन व ती फूट जास्त जास्त वाढत जाऊन आह्मी वर निर्दिष्ट केलेला अपायकारक प्रकारही जोरावत जाणार, हें उघड दिसत आहे.

१२. मानवी जातीपैकीं अर्धा भाग अनधिकारी व अपात्र ठरविण्यात आल्यामुळें त्या अपात्रतेच्या योगानें त्या भागास जो अप्रत्यक्ष अपाय घडत आहे व जी इजा पोंचत आहे ती अशीः— एक तर अत्यन्त उत्साहजनक व उन्नतिप्रद अशा प्रकारच्या व्यक्तिसुखाचें वाटोळें होत आहे. दुसरें, त्या सुखाच्या ऐवजीं खिन्नता, निरुत्साह व जीवाचा अत्यन्त तिरस्कार उत्पन्न होऊन त्याचा कंटाळा यावा व

---

* प्रस्तुत ठिकाणीं प्रसिद्ध संगीताचार्य कै० रा. अण्णा किर्लोसकर यांनीं केलेलें एक गोड व हृदयद्रावक पद्य आहे, त्याची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं ह्मणून त्याचा संग्रह 'परवशतेच्या,' वाचकांकरितां येथें करण्याची परवानगी मागतों. तें पद्य येणें प्रमाणें —

**व्यर्थ आह्मी अबला ॥ खचित बाई ॥ व्यर्थ ॥ ध्रु० ॥**
**वागविती नर पशुसम आह्मां ॥ मान नसे कसला ॥ ख० ॥ १ ॥**
**स्वातंत्र्याचा लेश नसे कधीं ॥ बंदिवास ठरला ॥ ख० ॥ २ ॥**
**नर नारी सम शास्त्र ह्मणे परी ॥ अनुभव नच आला ॥ ख० ॥ ३ ॥**

असमाधान प्राप्त व्हावें, असा परिणाम घडत आहे. अशा रीतीनें आपल्या समोर उघड उघड घडणाऱ्या या अनर्थांचा विचार केला म्हणजे खरोखर असें वाटते कीं, या आधीच दोषप्रचुर व कष्टमय अशा इहलोकच्या वसतींत उपलब्ध होणाऱ्या ज्या अनंत अडचणी त्यांशी झुंज घेण्याच्या कामांत मनुष्यास जे जे धडे शिकले पाहिजेत त्यांत एक फारच महत्वाचा आहे. सृष्टि आपण होऊन जे अपाय, ज्या अडचणी व जी संकटे मनुष्यप्राण्यावर आणिते, त्यांत एकानें आपल्या मत्सरबुद्धीनें व दुराग्रहानें दुसऱ्यास विनाकारण प्रतिबंधात ठेवून त्या संकटांत आणखी भर घालूं नये. त्यांना जी भीति वाटत असते ती पोकळ असते. ज्या दुष्परिणामाची निष्कारण भीति त्यांना वाटत असते, ते परिणाम तर घडत नाहींतच. पण उलट भलतेच व त्यांच्या कल्पनासृष्टींत घोळत असलेल्यापेक्षांही अधिक वाईट परिणाम घडून येत असतात. आपल्या कर्मापासून किंवा वर्तनापासून प्रत्यक्ष घडणारा वाईट परिणाम ज्याचा त्यास सोसावा लागणें, हे ठीकच आहे. परंतु याशिवाय इतर रीतीनें मनुष्याचे वर्तन-स्वातंत्र्य नियंत्रित करण्याच्या हरएक प्रकारानें मानवी सुखाचा मुख्य झराच वाळून जातो. आणि मानवजातीपैकी प्रत्येक व्यक्तीला आपले आयुष्य किंवा आपला जीव ज्या ज्या कारणामुळें इतका प्रिय व मूल्यवान वाटत असतो, त्यास सर्व प्रकारें कमीपणा येऊन त्याचे गुणाला जबर धक्का बसतो. तो इतका की लोकांस त्याची कल्पना देखील होणे अशक्य आहे.

समाप्त

# उपसंहार.

देवि **परवशते**! तुझा माझा आज वियोग घडणार ह्मणून मला वाईटही वाटत आहे व चांगलेही वाटत आहे! **मृच्छकटिक** नाटकांतील **शकारास** जशी **वसंतसेना** तशी तूं मला हवीशी पण वाटतेस आणखी नकोशी पण वाटतेस! अथवा, शापविमूढ झालेल्या पांचव्या अंकांतील **दुष्यंतास** जशी **शकुंतला** घ्यावीशीही वाटेना व टाकावीशीही वाटेना, तशाच प्रकारची कांहीं चमत्कारिक स्थिति तुझ्यासंबंधानें सांप्रत माझ्या मनाचीही झाली आहे. देवि! तुझें उदात्त व मोहक स्वरूप प्रथमच माझ्या दृष्टीस पडल्यास आज फार वर्षे, ह्मणजे जवळ जवळ वीस वर्षे झालीं! तेव्हां मी नुकताच कोठें वरिष्ठ विद्यामंदिरांत प्रवेश केला होता, त्या दिवसापासून तुला आपलीशी करावी, अशी मनांत उत्कट इच्छा होती. परंतु तूं पडलीस परजातीय! तुझें जन्म स्वातंत्र्यप्रिय व पराक्रमशाली **इंग्रेजांच्या** सर्वैश्वर्यसंपन्न देशांत झालेलें! तेव्हां मज गरीब ब्राह्मणाला तूं कशाची वश होतेस! असे मनांत येऊन पुष्कळ दिवस तुला आपलीशी करण्याचा माझा यत्न शिथिल पडला. परंतु कांहीं केल्यानें तुझा नाद सुटेना. राहून राहून पुनः मन तुजकडे ओढे. शेवटीं तुजवर जबरदस्तीनें **महाराष्ट्र** पोषाख चढवून कशी बशी तरी पण तुला आपल्या गोतांत आणून सोडावयाची, असा निश्चय करून कंबर तर बांधिली! परंतु देवि! या कृत्यांत तूं किती आडकाठ्या आणिल्यास! किती आढेवेढे घेतलेस व किती तरी माझे हाल हाल केलेस! रागानें व संतापानें तुझें पुनः नांव घ्यावयाचें नाहीं, असें ह्मणून तुला कांहीं दिवस मी अगदीं विसरून गेलो. तथापि पुनः येऊन तुझ्या विनवण्या केल्या आणि तुझ्या

पायां पडून व अनेक प्रकारें तुझें आर्जव करून शेवटी तुला मराठीण तर बनविली! परंतु मूळची तूं पडलीस परदेशची! त्यांतून संपन्न भाषेंतली! यामुळें तुझें उदात्त व तेजःपुंज स्वरूप माझ्या गरीब गण-गोतांतल्या माणसांस जितके स्वकीय व प्रिय भासावें तितके भासत नाहीं, या गोष्टीस माझा तरी काय इलाज! देवि! तू मनानें फार खोल, गंभीर व मानी असून गांवढ्यांतल्या एखाद्या सटवाईप्रमाणे सामान्य जनाच्या नवसास सहज पावणारी नाहीस! तूं संपन्न देशांतील असून तुझ्या अंगावर अलंकार पाहिले तर फारच थोडे! तूं जात्या स्त्री असल्या-मुळें स्त्रियांच्या व परवशजनाच्या संकटाला धांवण्या शिवाय दुसरा कोण-ताही व्यवसाय तुला सुचत नाहीं, यांत काय आश्चर्य! असो. आज बहुत वर्षे तुझ्या कठिण आराधनेंत व सेवेंत जो बरा वाईट काळ मीं घालविला व कशी बशी तुला प्रसन्न करून घेतली, ती तूं माझ्या स्वदेशबांधवांना व भगिनींना परदेशस्थ असूनही स्वजनाप्रमाणें कल्याणप्रद हो, एवढेंच तुजपाशीं मागणें मागून मी आतां अंशतः आनंदानें व अंशतः कष्टानें तुझा निरोप घेतों!

पुणें. १८९०　　　　भाषान्तरकार.

## पुरवणी.

[ मि. जॉन् मोर्ले यांचा अभिप्राय ].

(1) The little book on the *Subjection of Women* though not a capital performance like the *Logic* was the capital illustration of the modes of reasoning about human character set forth in his *Logic* applied to the case in which the old metaphysical notion of innate and indelible differences is still nearly as strong as ever it was, and in which its moral and social consequences are so inexpressibly disastrous, so superlatively powerful in keeping the ordinary level of the aims and achievements of life low and meagre. The accurate and unanswerable reasoning, no less than the noble elevation of this great argument; the sagacity of a hundred of its maxims on individual conduct and character, no less than the combined rationality and beauty of its aspirations for the improvement of collective social life, make this piece probabely the best illustration of all the best and richest qualities of its author's mind, and it is fortunate that a subject of such incomparable importance should have been first effectively presented for discussion in so worthy and pregnant a form.

It is interesting to know definitely from the Autobiography, what is implied in the opening of the book itself, that a zealous belief in the advantages of abolishing the legal and social inequalities of women was not due to the accident of personal intimacy with one or two more women of exceptional distinction of character. What has been ignorantly supposed in our own day to be a crotchet of Mr. Mill's was the common doctrine of the younger

proselytes of the Benthamite school, and Bentham himself was wholly with them ( Autobiography p. 105 and 244 ) ; as, of course, were other thinkers of an earlier date, Condorcet, for instance. In this as in other subjects Mr. Mill did not go beyond his modest definition of his own originality the application of old ideas in new forms and connections ( p. 119 ) or the originality which every thoughtful mind gives to its own mode of conceiving and expressing truths which are common property ( p. 254 ). Or shall we say that he had an originality of a more genuine kind which made him first diligently acquire what in an excellent phrase he calls *plenary possession* of truths, and then transfuse them with a sympathetic and contagious enthusiasm ?

It is often complained that the book on Women has the radical imperfection of not speaking plainly on the question of the limitations proper to divorce. The present writer once ventured to ask Mr. Mill why he had left this important point undiscussed. Mr. Mill replied that it seemed to him impossible to settle the expediency of more liberal conditions of divorce, first ,without hearing much more fully than we could possibly do at present the ideas held by women in the matter ; second, until the experiment of marriage with entire equality between man and wife had been tried ! People who are in a hurry to get rid of their partners may find this very halting kind of work, and a man who wants to take a new wife before sunset, may well be irritated by a philosopher who tells him that the question may possibly be capable of useful discussion towards the middle of the next century. But Mr Mill's argument is full of force and praiseworthy patience '!

*John Morley.*

---

[ मि. फ्रेडरिक् हारिसन् यांचा अभिप्राय. ]

( 2 ) Mr. Frederic Harrison in the Nineteenth Century says :—

" I turn now to the last of his completed works, the Subjection of Women (1869) in many ways the most eloquent of his works, the most characteristic and perhaps that which has had the most direct and immediate effect. Like the Liberty, it was written many years before it was published and was to a great degree a joint production. His biographer, Prof. Bain, very justly calls it— ' the most sustained exposition of Mill's life-long theme, the abuses of power.' And Mr. John Morley calls it ' the best illustration of all the best and richest qualities of its author's mind.' It is fortunate, he adds, that a subject of such incomparable importance should have been first effectively presented for discussion in so worthy and pregnant a form.

The form is, indeed, pregnant and in every sense worthy of a scheme which touches us all home, and reaches so far and wide. It is one of those very rare examples of a short treatise on a weighty topic, packed with accumulated thought and fused with ardent conviction. In four short chapters it condenses a scheme of social ethics. It is in its passionate logic the most notable result of this ripest, loftiest, most inspiring part of his life. And its practical effect on legislation, manners and opinion has no doubt been greater than any thing which Mill gave to his generation. The law has already been amended on many points which draw down his indignation and satire. A great number of the disabilities of women arising from prejudice, habit or torpor have been

practically removed. At least there remains no legal or moral bar to the aspiring women except in one or two exceptional cases. Literature, art, medicine, science, law, the Universities, athletics, sport, political agitation, the public service, are now practically open to women.

---

(3) From Mr. Grant Allan's novel "The Woman Who Did."

"The future is to the free. We have transcended Serfdom Women shall henceforth be the equals of men, not by levelling down, but by levelling up; not by fettering the man, but by elevating, emancipating, unshackling the woman."

***

—"It is hard to be a free soul in an enslaved community. No unit can wholly sever itself from unsocial organism of which it is a corpuscle."

***

"Sooner or later, I am sure, if you begin by educating women, you must end by emancipating them."

***

"It is the emancipation, not the mere education that most appeals to me."

---

(4) From Tennyson. (The Princess).

"For woman is not undeveloped man,
"But diverse: could we make her as the man,
"Sweet Love were slain: his dearest bond is this,
"Not like to like, but like in difference.

" Yet in the long years liker must they grow ;
" The man be more of woman, she of man ;
" He gain in sweetness and moral height,
" Nor lose the wrestling thews that throw the world;
" She mental breath, nor fail in childward care,
" Nor lose the child-like in the larger mind ;
" Till at the last she set herself to man,
" Like perfect music unto noble words ;
" And so these twain upon the skirts of Time,
" Sit side by side, full-summ'd in all their powers,
" Dispensing harvest, sowing the To-be,
" Self-reverent each and reverencing each,
" Distinct in individualities,
" But like each other ev'n as those who love :
" Then comes the statelier Eden back to men :
" Then reign the world's great bridals, chaste and
calm :
" Then springs the crowning race of human kind.
" May these things be !"

" At last

" She rose upon a wind of prophecy
" Dilating on the future ; 'every where
" Two heads in council, two beside the hearth,
" Two in the tangled business of the world .
" Two in the liberal offices of life,
" Two plummets dropped for one to sound the abyss
" Of science, and the secrets of the mind :

"Musician, painter, sculptor, critic, more:
"And everywhere the broad and bounteous Earth
"Should bear a double growth of those rare souls,
"Poets, whose thoughts enrich the blood of the
world."

*
* *

"The Woman's cause is Man's: they rise or sink
"Together, dwarf'd or god-like, bound or free:
"For she that out of Lethe scales with man
"The shining steps of Nature, shares with man
"His nights, his days, moves with him to one goal,
"Stays all the fair young planet in her hands—
"If she be small, slight-natured, miserable,
"How shall men grow?"

---

(5) *Annie Besant* on "*Womanhood*" (See "*Ancient Ideals*," p. p. 111, 112).

"Husband and wife are not thought of as two, but they are thought of as one. Husband and wife are not thought of as separate, they are thought of as united. Husband and wife are not thought of as capable of division, they are but two halves, constituting an entire, a single whole. Just as in the Deva and Devi one Divine life is manifested, so in the husband and wife the perfect type of humanity is shown forth. There is no idea of possible antagonism. There is no idea of possible

rivalry. Man and Woman, husband and wife, are two halves of the complete Man, of the complete Human Life-that perfect Union, that true Unity, gave the Hindu Ideal of Marriage."

---

(6) भर्तृभ्रातृपितृज्ञातिश्वश्रूश्वशुरदेवरैः
बन्धुभिश्च स्त्रियःपूज्याः—

याज्ञवल्क्यः

(7) सर्वाश्रमानुपादाय स्वाश्रमेण कलत्रवान् ।
व्यसनार्णवमत्येति जलयानैर्यथार्णवम् ॥
यामाहुरात्मनोह्यर्धं श्रेयस्कामस्य मानिनि ! ।
यस्यां स्वधुरमध्यस्य पुमांश्चरति विज्वरः ॥
यामाश्रित्येंद्रियारातीन्दुर्जयानितराश्रमैः ।
वयं जयेम हेलाभिर्दस्यून्दुर्गपतिर्यथा ॥
न वयं प्रभवस्तांत्वामनुकर्तुं गृहेश्वरि ! ।
अप्यायुषा वा कार्त्स्न्येन ये चान्ये गुणगृध्नवः ॥

श्रीमद्भागवत. ३-१४.